# प्रस्तावना.

—— ०·——

'स्फुटसंग्रहा'च्या या पहिल्या भागात एकंदर ३२ लेखक आले आहेत. यापैकीं १ ला नमनादाखल घातलेला 'हेरंबस्तोत्र' हा मध्व-मुनींचा असून २ रा गोसावीनंदनाचा आहे. मध्वमुनि व गोसावीनंदन हे दोघेही १७ व्या शतकात विद्यमान होते. मध्वमुनींची हकीकत महाराष्ट्र-चरित्रकारानीं अगदीं भिन्न भिन्न अशी दिलेली आढळते. तरी ती निर-निराळ्या लेखकानीं जशी दिली आहे तशीच येथें देतों:—

**महिपतिबोवा** ताहराबादकर—यानीं आपल्या '**भक्तिलीलामृता**'चे शेवटीं या साधु पुरुषाचें चरित्र दिलें आहे. महिपतिबोवा म्हणतात—मध्वमुनि हा जनस्थानचा म्हणजे नाशिकचा राह-णारा. यास पांडुरंगाचा साक्षात्कार होता. हा उत्तम कीर्तन करी. मुंबईंत कान्होजी आंग्रे म्हणून सरदार होता. तो प्राकृत कीर्तन ऐकत नसे; परतु मध्वनाथाचें कीर्तन ऐकून त्यानें आपला हट्ट सोडला. मध्वमुनींचे (१) लक्ष्मण, (२) यादोपंत नगरकर व (३) अमृतराय हे शिष्य होत. आपल्या वृद्धापकाळीं मध्वनाथ हे 'सेंदुरवाडे' (?) येथें राहत आसत.

**राजारामबुवा** आपल्या ग्रथात म्हणतात—मध्वनाथाचा जन्म निरा-नदीच्या तीरीं '*कळबोली*' (?) *या गावीं* झाला. हे आश्वलायनशाखी ब्राह्मण. याचा जन्म शिवरात्रीस झाला म्हणून आईबापानीं याचें नाव 'महादेव' असें ठेवलें. महा-देवाची पाचवे वर्षी मुंज झाली. पुढें यानें जांभुळवनात श्री-दत्ताची तपश्चर्या केली. तेव्हा दत्तानेंच यास अनुग्रह दिला व

नांव मध्वनाथ ठेवलें. मध्वमुनीचा जन्म शके १६६९, शुक्ल संवत्सर, माघ कृ. १४ स झाला.

**नरहरि ढुंढिराज मालू** हा आपल्या 'भक्तकथामृत' ग्रंथांत म्हणतो—

मध्वमुनि हा नाशिक येथें राहणारा. याच्या बापाचें नांव नरहरि, व आईचें नांव द्वारावती. या जोडप्यास नवसासायासांनीं एक पुत्र झाला. त्याचें नांव त्यांनीं त्र्यंबक असें ठेविलें. सातारकर **शिवाजी** महाराजांचे जवळ हा कांहीं दिवस होता. यास प्रारंभीं त्र्यंबक गोसावी असेंच म्हणत. यानें त्रिसा-मोरोचा आश्रित अंबाजीपंत या नांवाचा होता, त्यास अनुग्रह देऊन त्याचें नांव अमृतराय ठेविलें व त्यास परमार्थमार्गास लावलें. हा त्र्यंबक गोसावी 'शेंदुरवादे' (?) या गांवीं रहात असे. या ठिकाणीं मध्वाचार्यांची व याची गांठ पडली. आचार्यांनीं याचें पुढें 'मध्वमुनि' असें नांव ठेवलें; व तेव्हांपासून हा मध्वमुनि याच नांवानें प्रसिद्ध आहे.

मध्वमुनीचा समाधिकाल शके १६५६, विरोधी संवत्सर, मार्गशीर्ष शु. १, असा अलीकडील शोधक लोक मानतात.

वर दिलेल्या हकीकतींत अनेक असंबद्ध व अविश्वसनीय गोष्टी आहेत; परंतु त्या मुळांतल्याप्रमाणेंच येथें नमुद केल्या आहेत. मध्वमुनींचे वंशज औरंगाबादेकडे व पैठणाकडे अजून आहेत असें ऐकतों; तरी त्यांचेकडून माहिती कळेपर्यंत यासंबंधें जास्त विचार करणें तहकूब ठेवणें बरें. महाराष्ट्र-काव्याच्या हितचिंतकांपैकीं कोणीं सदर्हू माहिती कळविल्यास तिचा उपयोग अवश्य करून घेऊं.

सर्व महाराष्ट्र ग्रंथकारांत मध्वमुनीची रसवंती अति रसाळ म्हणून महशूरच आहे. यांची पदें व 'धनेश्वरचरित्र' म्हणून एक लहानशी पाउणशें ओव्यांची गोष्ट प्रसिद्ध आहे. ही धनलोभ्याची हकीकत फार गोड आहे व

ही अप्रसिद्ध असें समजून ती छापण्याविषयी अनेक शोधकांनीं आम्हांस सूचनाही केल्या आहेत. परंतु हिची एक शिळेवरची छापील प्रत आमचेच संग्रहीं आहे. यामुळें ही पुन्हां 'महाराष्ट्रकवीं'त तूर्त तरी घेतली नाहीं. मध्वमुनीची आणखी कांहीं कृति उपलब्ध झाल्यास त्याबरोबर हीही छापूं.

पुढील संग्रहांतला २ रा लेखांक गोसावीनंदनाचा आहे. गोसावीनंदन हा तंजावराकडला राहणारा. आनंदतनय व रघुनाथपंडितांचा समकालीन. कोणी म्हणतात, याचा जन्म अरणीस झाला. याच्या आईचें नांव नागाई व बापाचें नांव गोस्वामी. गोस्वामीवरूनच यास गोसावीनंदन हें नांव पडलें; अथवा त्यानें घेतलें. याचा 'ज्ञानमोदक' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. याखेरीज 'सीतास्वयंवर' अष्टकें, स्तोत्रे आणि पदें महाराष्ट्रांत चोंहीकडे आढळतात. याचे गणपतीचे श्लोक ज्यानें ऐकले नाहींत असा एकही भाविक सांपडणार नाहीं.

लेखांक ३, ४, ५, ६, ७ व ८ या सर्व संतमालिका आहेत. असल्या सतमालिका अथवा संतस्तवनें हीं महाराष्ट्रांत पुष्कळ आहेत यात सशय नाहीं. यांचा कवींचा काल ठरविण्याकडे उपयोग पुष्कळ होण्यासारखा आहे; परतु अनेक वेळां या निव्वळ यादीवजा असल्यामुळें असा उपयोग करून घेतांना फार चौकस असलें पाहिजे. पुढें दिलेल्या सहा संतमालिकापैकीं लेखांक ३ ही उद्धवचिद्घनाची; ले. ४, जयरामसुताची; ले. ५, शिवरामाची; ले. ६, रंगनाथ निगडीकराची; ले. ७ उद्धवसुताची; व ले. ८ ही शेवटची सिद्धचैतन्याची आहे. या सहा महाराष्ट्र साधूंपैकीं उद्धवसुत, व सिद्धचैतन्य यांची माहिती विशेषशी नाहीं. उद्धवसुताचें 'रामदासचरित्र' म्हणून एक लहानसें प्रकरण आहे. याचा कालही रामदासानतर लागलाच समजावा. हा रामदासतुकारामा-

नंतरच्या साधुसंतांचा उल्लेख बिलकूल करीत नाहीं. तसेंच सिद्धचैतन्य हाही उद्धवसुताचाच समकालीन असला पाहिजे. सिद्धचैतन्य हा प्रसिद्ध 'चैतन्य' परंपरेपैकीं आहे यांत संशय नाहीं. यानें आपल्या संतमालिकेंत चिद्धनस्वामीचा उल्लेख केला आहे. परंतु चिद्धनाचा शिष्य जो उद्धवचिद्धन त्याचा उल्लेख सिद्धचैतन्य करित नाहीं.

उद्धवचिद्धनासंबंधें नरहरि धुंडिराज माद्द हा पुढीलप्रमाणें हकीकत देतो:—

....कथा। उद्धवचिद्धनाची ऐकें आतां.। नांदुर ग्राम गंगा बोधिता।
प्रसिद्ध आहे लोकांत; ।। तेथें कचोपंत ब्राह्मण,। कांतेलागीं भीमा
नाम,। तिचे उदरीं दोघेजण। 'उद्धव' 'चिद्धन' असती हे. ।।

श्रीहरिभक्तपरायण मथुरानाथ गोसावी, संस्थान तीर्थ पाटांगणकर यांचे सांगण्यावरून रा. राजवाडे हे उद्धवचिद्धन हा धारूरचा राहणारा, याचे उपनांव कोकिळ व हा रामदासस्वामींचे वेळीं हयात होता अशी माहिती 'ग्रंथमाले'च्या १९०३ च्या मे महिन्याच्या अंकांत सांगतात; व पुढें एका अंकांत हा रामदासापेक्षां वराच लहान असावा असें लिहितात. रामदासाचा ज्याशीं संबंध होता अशा एका उद्धवबावाचें चरित्र दासोदिगंबर या नांवाच्या कवीनें आपल्या 'संतविजय' ग्रंथांत लिहिलें आहे. यांत या रामदासांकित उद्धवाला 'उद्धवचिद्धन' असे कोठेंही म्हटलें नाहीं. तेव्हां त्या चरित्रांत दिलेली माहिती येथें देण्याचें कांहीं एक कारण नाहीं. उद्धवचिद्धनाचीं कांहीं प्रकरणें 'काव्यसंग्रह'कारांनीं छापलीं आहेत. त्यांत 'अनुभवशतक' या प्रकरणाचे शेवटीं गुरुपरंपरेचे पुढील दोन श्लोक आहेत. हे श्लोक उद्धवचिद्धनाची गुरुपरपरा नीट माहित नसल्यामुळें छापावे तसे छापले गेले नाहींत. कारितां ते पुन्हा माझे जवळील 'अनुभवशतका'च्या पोथीवरून येथें देतो.

श्रीदत्त जो तो शिवरूप झाला, । गोपाळ, आत्मा, तुळसीहि, बोला ॥
श्रीकृष्णद्वैयपदासि ध्याता । चैतन्यता पूर्णप्रकाश आतां ॥ ९९ ॥
श्रीचिद्घनीं स्नेहसुधाप्रसादें । चळूनिया वर्धत पूर्ण बोधें ॥
आम्हांप्रेमोदधि पूर्ण झाला । पूर्णोदकीं उद्धवही विराला. ॥ १०० ॥

ही उद्धवचिद्घनाची परंपरा राजारामबुवांच्या ग्रंथांत 'काळचैतन्य' या कवीचें चरित्र सांगतांना आली आहे. ही त्या ग्रंथाधारें पुढें देतों—



उद्धवचिद्घनानें आपल्या लेखांक ३ या संतमालिकेंत शेवटीं ( ओ. ७५ पहा. ) हीच परंपरा दिली आहे. या ठिकाणीं अनुक्रमांत थोडा फेर आहे, परंतु एकंदरीनें नांवें हींच आहेत. हीच परंपरा, या चैतन्यपरंपरेंतल्या उद्धवचिद्घनापासून–उद्धव, आत्माराम, शंकर व माधवदास असा–चौथा पुरुष जो माधवदास त्यानें आपल्या 'अलक्षनिधान' नामक ग्रंथांत दिली आहे. तेव्हां ही अनेक ठिकाणच्या पुराव्यांनीं सिद्ध झालेली व उद्धवानें आपण स्वतःच दिलेली परंपरा निःसंशय खरी मानण्यास हरकत नाहीं.

या परंपरेपैकीं अनेक कवींनीं मराठींत ग्रंथरचना केली आहे. यापैकीं उद्धवाचा गुरु जो चिद्घनस्वामी याचा राघवस्वामी नांवाचा आणखी एक शिष्य होता. यानें सुमारें चार हजार ओंव्यांचा 'संदेहहरण' नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. याचे शेवटीं राघवस्वामीनें,

शके सोळाशें अकरावरी, । प्रमोदनाम सवत्सरीं, ।
आश्विन शुक्ल, गुरुवासरीं, । विजयादशमी सुदीन. ॥

असा ग्रंथसमाप्तीचा काळ दिला आहे. व हा ग्रंथ झाल्यावर—'मग उद्धवासि कृपा पूर्ण । लाधली स्वामींची.' असें माधवदास म्हणतो.

यावरून उद्धवचिद्घनाचा काळ शके १६११ नंतरचा होय, हे निश्चयात्मक झालें, असें समजलें पाहिजे.

उद्धवचिद्घनासंबंधींची महिपतिबोवांनीं दिलेली माहिती प्रसिद्धच आहे. या पुण्यपुरुषाची आणखी थोडीशी हकीकत वर सांगितलेल्या त्याच्याच परंपरेंतल्या माधवदासानें दिली आहे. व ही सांगतांना 'जयाच्या कीर्तनाचा डंका । चोहों देशीं विराजे भजनाशिक्का । उभी शंकरदेवता देखा । कीर्तनामाजी.' असें म्हटलें आहे. आणि 'बहुत केला वाग्विलास । भक्तमालिका वर्णिली विशेष' अशी त्याच्या सरस्वतीची स्तुति केली आहे. उद्धवचिद्घनाचा

श्रीक्षेत्रकाशी येथें मठ असून या परंपरेंतील सर्व पुरुषांचे ग्रंथ तेथें आहेत असें ऐकतों.

उद्धवचिद्घनाचे नंतरची 'संतमालिका' जयरामसुताची आहे. जयरामसुत हा वडगांवकर जयरामस्वामींचा शिष्य नव्हे. याचा गुरु जयराम कोणी निराळा पुरुष असावा. याचा एक द्रौपदीचा धांवा प्रसिद्ध आहे. याचे आणखीही बरेच कटाव असले पाहिजेत. यापुढील दोन्ही मालिका शिवराम व रंगनाथ निगडीकर यांच्या आहेत. रंगनाथस्वामींची माहिती पूर्वी ( महाराष्ट्रकाव्य ग्रंथ ४, प्रस्तावना यांत ) आलीच आहे. शिवराम हा प्रसिद्ध आनंदसांप्रदायी पूर्णानंदाचा शिष्य व निजानदाचा गुरुबंधु जो शिवराम तो नसून, त्याहून भिन्न समजावा. '**काव्येतिहाससंग्रहकारां**'नीं व '**काव्यसंग्रहकारां**'नीं शिवरामाचीं कांहीं प्रकरणें छापिलीं आहेत. त्या प्रकरणापैकीं कांहींचा कर्ता जो शिवराम तो व हा शिवराम एकच होत. याची परंपरा गणेनाथाचे मार्फत शिवदिनकेसरीच्या परंपरेशीं मिळती असावी असें या काव्यांतील उल्लेखांवरून वाटतें.

संतमालिकांनंतर ले. ९ हें 'कपोताख्यान' त्रुटितच सांपडल्यामुळें त्याचा कर्ता कोण हें ठाऊक नाहीं. १० वा लेखांक **वापुवामनाचें** '**सुदामचरित्र**' हा आहे. वापु हें कवीचें नांव व वामन हें गुरूचें नांव. हा वामनाचेच वेळीं म्हणजे शके १५९५ चे सुमारास विद्यमान होता, हें उघड आहे. हा सातारप्रांतातील राहणारा, असें ऐकींव माहितीवरून कळतें.

लेखांक ११ ते २० हे सर्व निरंजनमाधव ऊर्फ बनाजी या कवीचे आहेत, याचा 'ज्ञानेश्वरविजय' हा ग्रथ प्रसिद्ध आहे. मोरोपंतादि महाराष्ट्रकवींप्रमाणें यालाही पेशव्यांच्या घराण्याचा आश्रय होता. यांत छापलेल्या प्रकरणांखेरीज आणखीही काहीं प्रकरणें या कवीचीं आम्ही लवकरच छापणार आहों, तीं छापून झाल्यानंतर याची माहिती देण्यास ठीक

पडेल. २१ व्या लेखांतील सुरस 'प्रल्हादचरित्र' **त्र्यंबक** या कवीचें आहे. हा **ना**शिकचा राहणारा. प्रसिद्ध मध्वमुनींचा शिष्य. असें सांगतात कीं याचें मूळ राहणें पैठणास असे, परंतु मध्वनाथाचा उपदेश घेतल्यानंतर हा श्रीक्षेत्रनाशिक येथें राहूं लागला. हा सतराव्या शतकाच्या चतुर्थपादांत विद्यमान होता.

या पुढील लेखांक २२ ते ३० हे **वीरेश्वराचे** आहेत. व लेखांक ३१ व ३२ हे **नरहरितनयाचे** आहेत. हे दोन्ही कवि तंजावर प्रांतांतले राहणारे. यांचेसंबंधीं कांहीं एक माहिती उपलब्ध नाहीं.

---

## ( १ ) गणेशाष्टक

सकळां आधीं पूजा करिती जन ज्याचा,
ज्याच्या नामें नासति विघ्न सकळांचीं,।
भजतां वारी जो भक्तांचें भवत्रासें,
त्याच्या चरणीं निश्चळ राहो मन माझें ॥ १

शुंडादंडें करितो खंडण दैत्यांचें,
दंताघातीं दृढ सहागी सुजनांचें,।
माथां शेंदुर वरि दूर्वांकुर साजे,
त्याच्या चरणीं निश्चळ राहो मन माझें ॥ २

ज्याचें आखु वाहन शोभे रणरंगी,
देवासांगें जो असुरांचें बळ भंगी ।
येवो वाचे चवदा भुवनें जो गाजे
त्याच्या चरणीं निश्चळ राहो मन माझें ॥ ३

ज्याच्या कानीं चंचळतेचा बहु वारा,
ज्याचे कंठीं शोभत मुक्ताफळमाळा,।
हातीं पाशांकुशवैभव साजे
त्याच्या चरणीं निश्चळ राहो मन माझें ॥ ४

ज्याच्या पोटीं चवदा भुवनें ही वसती,
वदती शास्त्री ज्याला लंबोदर ह्मणती,।
मांडि कासे पीत पितांबर साजे,
त्याच्या चरणीं निश्चळ राहो मन माझें ॥ ५

ज्याच्या ऊरू जानू वर्तुळ पोटरिया,
ज्याच्या चरणीं पुष्कळ घुळघुळ घागरिया,।
थयथय शब्दें नाचतसे जो निजचार्ये,
त्याच्या चरणीं निश्चळ राहो मन माझें ॥ ६

ज्याच्या सत्ते शंकर जाले त्रिपुरारि
ज्याच्या सत्ते विष्णु भवभंजनकारी ।
ज्याच्या सत्ते ब्रह्मा भुवन ही करिता,
ज्याच्या सत्ते शेष शिरी धरणा धरितो,।
ज्याच्या सत्ते गिरिजा महिषासुर मारी

ज्याच्या सत्ते मन मुक्तीसी अधिकारी,।
ज्याच्या सत्तेवांचुनि कांहीही नुमजे,
त्याच्या चरणी निश्चळ राहो मन माझें. ॥ ७

विघ्नईशा, विघ्नविनाशा, विबुधेशा,
शेंदुर वाहे. हेरंबा तूं जगदीशा, ।
भक्ताधीना, भक्तवत्सला, गणराया,
सिद्धीबुद्धीप्राणनाथ, वंदूं पाया,
आज्ञा द्यावी मध्वमुनीश्वरकविवीरें
हेरंबस्तोत्र जपाया मत्तमयूरें. ।
अर्चन करितां सिद्धीसह जो गण नाचे,
त्याच्या चरणीं निश्चळ राहो मन माझें. ॥ ८

## ( २ ) गंगाष्टक.

निवास शंभुमस्तकीं । मनास तो प्रशस्त की ॥
प्रसिद्ध देव आगमीं । नमीन माय गौतमी ॥ १

अपूर्व नीर वाहनें । सुधेसमान भासतें ।
मुनींद्र देव संगमी । नमीन माय गौतमी ॥ २

तनू भिजे तुझ्या जळें । तरीच भाग्य आगळें ॥
वदें चरित्र काय मी । नमीन माय गौतमी ॥. ३

तरी अखंड वाहती । जितेचि मुक्त पावती ॥
वरिष्ठ मोक्षलक्ष्मी । नमीन माय गौतमी ॥ ४

तुझें स्वरूप देखिलें । तयासि सर्व फावलें ॥
जगांत तू पराक्रमी । नमीन माय गौतमी ॥ ५

जनामि ज्ञानहीं नसे तुझ्याच चिंतनीं वसे ॥
पडेचिना भवभ्रमीं । नमीन माय गौतमी ॥ ६

अंबा, तुला न गाइलें । मनीं कदा न ध्याइलें ॥
ममापराध हे क्षमीं । नमीन माय गौतमी ॥ ७

गोसाविनंदनाचिया । पठेल अष्टकास या ॥
रमेल तो सुखाश्रमीं । नमीन माय गौतमी ॥ ८

# ( ३ ) संतमालिका.

'( उद्धवचिद्घनकृत )[१]

ॐनमो सद्गुरु चिद्घन । गणेश सारजा रूप आपण । भक्तमालिका स्मरण । करो ह्मणून आठविले ॥ १ ॥ तरी आठवाचाही आठव । स्वयंप्रकाश गुरुदेव । ईं जाणोनिया स्वयमेव । बोले गौरव शब्दांचे ॥ २ ॥ एरव्हीं संपूर्ण अंबरी । मघे वर्षति पृथ्वीवरी । धारा वर्षति त्याच्या सरी । केशापरी मोजाव्या ॥ ३ ॥ जंव होय तृषा हरण । तंव चातक करी धारापान । तैसे हरिभक्तांचें स्मरण । किंचित् करी यथामती ॥ ४ ॥ करितां भक्तांचें स्मरण । स्वयें तद्रूप होई जे आपण ॥ जैसे हरि वेद संपूर्ण । श्रवणीं ऐकोनि बोलतसे ॥ ५ ॥ मुळीं ब्रह्मा भक्त थोर । तैंचालागीं हंस अवतार । सनक, सनंदन, सनत्कुमार, । भक्त अंतरंग हरीचे ॥ ६ ॥ आदिनाथ शंकरयोगी, । जो निजपदीं परम सयोगी । गरुड, शेष, निजांगी । जाले हरिसंगी तन्मय. ॥ ७ ॥ लक्ष्मी करी चरणसेवा । वेद सदा वर्णिती देवा, । सोऽहंनिया अहंभावा, । निरायेवा झोंबती ॥ ८ ॥ ब्रह्मनिष्ठ तो नारद, । जयासि कीर्तनीं अगाध बोध, । तैसाचि तो प्रल्हाद, । तुंबर हरीसी आवडता ॥ ९ ॥ अढळपदीं ध्रुव निश्चळ, । जो कां उत्तानचरणाचा बाळ । जयापासुनि सृष्टी सकळ । ऋषी तोचि कश्यप; ॥ १० ॥ आदिकवि व्यास, वाल्मिक, । अंतरनिष्ठ, शुक, शौनक । वसिष्ठ, विश्वामित्रादिक, । कपीलादिक, सर्वर्षि; ॥ ११ ॥ अगस्ती, भारद्वाज, गौतम, । अत्री, ऋषिश्रेष्ठ परम, । दत्त, दुर्वास आणि सोम, । जनमेजय नृपनाथ; ॥ १२ ॥ विदेही जनक, परीक्षिती । हरिश्चंद्रसिर्खा चक्रवर्ती, । रुक्मांगद धर्ममूर्ति, । जयांची कीर्ती सत्यनिष्ठ; ॥ १३ ॥ मयूरध्वज श्रियाळ, । अंबरीषादि भूपाळ, । बळीचा जाला द्वारपाळ । स्वयें गोपाळ आपण ॥ १४ ॥ युधिष्ठिरादि धर्ममूर्ति । भक्त प्रेमळ द्रौपदी सती । अनसूया आणि अरुंधती, । नळदमयंती अहिल्या, ॥ १५ ॥ सावित्री आणि सत्यवती, । सीता, तारा, सरस्वती, । मंदोदरी आणि पार्वती, । वृंदा, भक्तिसी तत्पर ॥ १६ ॥

---

१ या संतमालिकेच्या आधारास तीन प्रती मिळाल्या. पैकीं दोन प्रती एकाच मूळाच्या नकला आहेत. व एक स्वतंत्र आहे. या संतमालिकेंतील कांहीं ओव्या क्षेपक असाव्या असें वाटतें. ५९ पासून ७८ या ओव्या फक्त एकाच प्रतींत आहेत २ जया. ३ परमार्थ परम हरिभक्त. ४ सांडूनिया ५ भक्ति हरिपदीं भोगती. ६ सिद्धपुरुष. ७ हे राजे किती तत्त्वनिष्ठ.

गणिका बोभायेलि सुकाते । स्मरण घडलें अवचितें । तिसी वैकुंठ केलें सगते । निजसुखातें पावली. ॥ १७ ॥ कुब्जा कुरूप दासी, । कामाचारें व्यभिचारासी । गोपिका भोगिती चित्सुखासी, । रासविलासी हरिरूपा ॥ १८ ॥ वेणुनादें तल्लीन गाई । खेळमेळीं गोपाळ विदेही । यादव सख्यपणे पाही । हरिपदीं तल्लीन. ॥१९॥ भयभावें तरला कंस, । वैरभावें मोक्ष दैत्यास, । सेवकपणें वानरांस, । जाला वास सचितपदीं. ॥ २० ॥ भीष्म आणि बिभीषण । हे हरीसी अनन्यशरण, । विदुर भक्तीचें निधान । पृथक वर्ण पूजी हरी. ॥ २१ ॥ देवकी आणि यशोदा । हे सदा भजती गोविंदा, । नंद वसुदेव सदा । विष्णुपदा ध्यातसे. ॥ २२ ॥ पराशर पुंडलीक । अक्रूर भक्त सात्विक, । सुदामा सुदेव दारुक । व्याधादिक हरिभक्त. ॥ २३ ॥ उद्धव प्रीतिपात्र गहन, । तैसाचि निजसखा अर्जुन । त्यासी उपदेशिलें महज्ञान । गीता व्याख्यान भगवंतें ॥ २४ ॥ व्यासकृपा संजयासी । गीताश्रवण कुरुवृद्धासी । शिशुपाल करूनि द्वेषासी । हरिरूपासी पावला ॥ २५ ॥ दृढ वैरी राक्षस रावण । स्वरूपीं जाला निमग्न, । कबंध तगले वेधे मन । जे स्मरण करिताचि. ॥ २६ ॥ जडभरत पूर्ण ज्ञानी, । मार्कंडेय श्रेष्ठ मुनि, । जैमिनी कविशिरोमणी, । दास जनीं हनुमंत. ॥२७॥ जयविजय द्वारपाळ, । उपमन्यू ब्राह्मणाचा बाळ ॥ दूध मागतां तात्काळ । दिला सकळ क्षीरसिंधू ॥ २८ ॥ गजेंद्रहस्ती केवळ पशु । नक्रें शोनितां अतिसायासु । स्वयें येऊनि त्यां परेशु । वैकुंठवासु त्या दोघां. ॥२९॥ भगीरथ भक्तपती । तेणें आणिली भागीरथी, । तारावया त्रिजगती । अगाध कीर्ति जयाची. ॥३०॥ द्विजकुळामाजी चांडाळ । जो बोलिजे अजामीळ, । नारायण स्मरे बाळ । स्मरतां तत्काळ उद्धरला. ॥ ३१ ॥ कृतीं, त्रेतीं, द्वापारांत, । पुराणप्रसिद्ध वैष्णवभक्त, ॥ आतां झाले कलियुगांत । जगविख्यात, ते ऐका ॥ ३२ ॥ मच्छिंद्र, गोरक्ष, गहिनी, । भर्तृहरि पूर्णज्ञानी, । जालंधर महामुनि, । जसवंत, जनीं निजश्रेष्ठ. ॥३३॥ सदानंद, रामानंद, । कबीर, रोहिदास, गोपिचंद, । शंकराचार्य अगाध, । महींमुद्गल, भारती. ॥ ३४ ॥ पिप्पा आणि जाट धना, । काजीद पठाण, न्हावी सेना, । बाबा आणि नानक सदना, । शाहाहुसेन फकीर, ॥३५॥ सुरदास, नरसी नागर, । हरीसिंग वाणी गुजर, । मुकुंदचंद, साळ्या कबीश्वर, । आणि सोनार नरहरी, ॥ ३६ ॥ खपटी आणि चौरंगी । हरी अगाध प्रसिद्ध जगीं, । मृत्युंजय राजयोगी, । मुधयासंगी परब्रह्म॥३७॥ चांगदेव, नामदेव, । निवृत्तिदेव, ज्ञानदेव, ।

---

१ वेणुनादें तल्लीन। गाई गोपाळ विदेही पूर्ण । विदेही यादव संपूर्ण। हरिपायीं ते निःसंदेह झाले. २ पुत्रमोहें ३ जयदेव ४ मुरुद्दान ५ बाबा नानक आणि सजना ६ मुलुकदास, मगकवीश्वर ७ हठ्यासि अवघड प्रसिद्ध जगीं.

हे प्रत्यक्ष देवाधिदेव । सोपानदेव, मुक्ताबाई. ॥३८॥ चैतन्याश्रम हरिहर भारती, । पर्डवाळ सिद्ध नागेशमूर्ति, । नारायण वेदमूर्ति,। त्रिजगती प्रसिद्ध. ॥३९॥ श्रीधरस्वामि, अनन्ताश्रम, । मुकुंदराज भक्तोत्तम, । महामुद्गलभट सप्रेम, । भक्त निस्सीम, हरीचे ॥ ४० ॥नरसिंह नागा, खेचर विसा। गोराकुंभार, बहिरापिसा,। माळी सावता, कमाल कैसा, । आणि परमा भागवत, ॥ ४१ ॥ कृष्णभट याज्ञवल्की,। कृष्णदास मुद्गल, विवेकी, । केशवस्वामी, नामा पाठकी, । जयासी श्रीमुखें उपदेश. ॥ ४२ ॥ परमभक्त चोखामेळा, । जेणें तारिलें अंत्यजकुळ, । जोगया, स्वामि गोपाळ । भक्तप्रेमळ कान्हया. ॥ ४३ ॥ भानुदास, कूर्मदास, । लोलिंबराज भक्त सुगम, । चांदबोधलो, माधवदास, । आणि शेखफरीद, ॥ ४४ ॥ एकनाथ, जनार्दन, । मुकेश्वर, शाहुसेनें, । जयाचेनि स्मरणेंकरून। होती पावन जडजीव. ॥ ४५॥ नारा, वीठा, गोंदा। नामयाचा सुत महादा,। जयाचेनि संगें गोविंदा, । प्रेम सदा येतसे. ॥ ४६ ॥ बापुजी गोसावी महानंत, । निपटनिरंजन जीवन्मुक्त, । साळ्या रसाळ स्वानंदभरित, । प्रेम अद्भुत कीर्तनी. ॥ ४७ ॥ मालोपंत नरहरी, । जयराम शांति निर्विकारी, । नृसिंहसरस्वती मस्करी, । चराचरी हरिभक्त. ॥ ४८ ॥ हसी आणीक कर्माबाई, । राजकन्या मिराबाई, । जनी दासी नामयापायी, । भक्त नवाई अगाध. ॥ ४९ ॥ रेणुकानंदन विठ्ठलभक्त, । दत्तअनुग्रही दासोपंत, । श्रीपतिदास योगिनाथ, । पंवाडे प्रसिद्ध जयाचे. ॥ ५० ॥ एकलिंग, भैराळ, सिद्ध, । लिंबराज, शेखमहंमद, । दामाजीपंत अगाध, । रोहीदास चर्मक. ॥ ५१ ॥ सामा कसाब, जमाल अजगरी, । सजण पठाण, मुकुंद सारंगी, । राणाई, गोणाई, ममतावा सुंदरी, । गंगाधर, आत्रा, बहिणा ते, ॥ ५२ ॥ सुमती आणि कमलाकर, । पद्माकर, शामा कानार, । चिन्मयानंद, बर्वलिंग धीर, । प्रेमळ भक्त हरीचे. ॥ ५३ ॥ पूर्णानंद, परमानंद, । भगवंतभट, ब्रह्मानंद, । काशीचा गुरव, अनंतभट अगाध, । आणि सुदेव काईत, ॥ ५४ ॥ नरसिंह मेहता, तुळशीदास, । विठ्ठलपुरंदर, आंनोबा विशेष। कान्होपात्रा पैं नाम तीस । केला वास हरिपदीं. ॥ ५५ ॥ जोगा विश्वंभर लीलया, । सच्चिदानंद बावा, दीक्षित आपया, । भक्तराज पाठक कान्हया, । बंका, दादो पिंजारी, ॥ ५६ ॥ लतिबशहा मुसलमान, । रामदास भक्तपूर्ण, । राघवचैतन्य, केशवचैतन्य, । बाबाचैतन्य, तुकोबा. ॥ ५७ ॥ केशवराज ज्ञानसागर, । बोधला कलियुगीं भक्त धीर, । मल्हादबावा, संतोबा पवार । भावार्थपर हरिभक्त. ॥ ५८ ॥ गोसावीनंदन, स्वामी वामन, । पंडितराज विख्यात जाण, । गणेशनाथ आणि नारायण । तुकोबाचे

१ वड्याड २ आणि तैसा भक्त. ३ कळिया. ४ चांदबोधक. ५ भक्त अभिधान. ६ प्रेमें सदा क्रीडत. ७ जयासि. ८ वैजनाथ. ९ पूर्ण भक्त हरीचे

निजपुत्र. ॥ ५९ ॥ दत्तानुग्रहित परमानंद । तयापासोनि गंभिरानंद । ≍ ≍ ≍ ≍ ≍ ≍ ≍ ब्रह्मानंद निजमूर्ती. ॥ ६० ॥ सच्छिष्य सहजानंद । दत्तानुग्रहित परमानत । तयाचा भक्त आनंद । पूर्णानंद पूर्णरूप ॥ ६१ ॥ चिद्गनानंद, तन्मयानंद । मुक्तानंद, शिवानंद, । कृष्णानंद, केशवानंद, । अमृतानंद, गुरुदास्य ॥ ६२ ॥ अद्वयानंद, उमानंद,। अखंडानंद, परमानंद,। पुंडलिकानंद, विश्वानंद । आनंदानंद निजभक्त. ॥ ६३ ॥ ऐसे संत भिन्नभिन्न । परि स्वरूपें नारायण । म्हणोनियां स्मरण । केलें पूर्ण सद्भावें. ॥ ६४ ॥ हस्तामल, कविमंगळ, । गोविंदाश्रम नित्य निर्मळ, । जयमुनिदास कलिकाळ, । गोकुळदास पैं आले, ॥ ६५ ॥ हेमाडपंत गणेशभक्त । पिशाच्च चैतन्याचे लिळांत । बिभीषण उपदेशी मलुकदास । जो कां बुद्धीपात आणिला. ॥ ६६ ॥ भक्तिभावें तपोराज । विद्यानगरी रामदास । कर जोडोनि शामदास । चित्तीं काज भेटीचे. ॥ ६७॥ रमावल्लभ निरंतर । काकभट, मादोळकर, । सहजबोध, तिमा जोशर । चिंचवडकर मोरया, ॥ ६८ ॥ तिनागड, संतिदास, । महादु, येकनाथ, गोपाळदास, । आकाजी, गोड उदास । चंद्रपुरी वास जयाचा. ॥ ६९ ॥ शिवपंडित, जनपंडित । विद्याधर, रघुनाथपंडित । तान्हाजी अचडकर, अवाभक्त, । मारकोनाथ, लखमाप्पा. ॥ ७० ॥ जैसें सुवर्ण साचार । सुवर्णापासोनि अलंकार । झालिया अनेकीं अनेकाकार । परि ते समग्र सुवर्ण. ॥ ७१ ॥ तैसे भक्त भिन्नाभिन्न । परि स्वरूपीं एक नारायण । म्हणोनि तयाचें स्मरण । केलें पूर्ण सद्भावें. ॥ ७२ ॥ निर्गुण निराभास । जेथून उद्भवला सर्वप्रकाश । म्हणे वैशंपायन म्हणती व्यास ॥ जो सकळांचा आदिगुरु ॥ ७३ ॥ नारायणाचा ब्रह्मा अनुग्रहित । ब्रह्मा अत्री उपदेशित । अत्रीपादप्रसाद । अवधूत दत्तात्रय गहन ॥ ७४ ॥ दत्तापासोनि शिवचैतन्य, । गोपाळ, आत्मारामचैतन्य, । तुळसीकृष्ण, अद्वैतकृष्ण, । चिद्गनचैतन्य, महाराज ॥७५॥ पूर्णचैतन्य, सहजचैतन्य, । चिद्विलासचैतन्य सप्रेम अगाधचैतन्य । महाभक्त, ॥ ७६ ॥ अद्वयानंदचैतन्य । नरसिंहचैतन्य । एकलिंगचैतन्य । महाचैतन्य, भक्तराज ॥७७॥अखंडचैतन्य । कोमळचैतन्य,। विश्वचैतन्य, मद्गचैतन्य । उल्हासचैतन्य, तत्स्वरूप ॥७८॥ ऐसी अपार भक्तमाळा । जो नित्य घाली हरिचे गळां । तो परम प्रिय गोपाळा । पावे सोहळ्या भक्तीचा. ॥ ७९ ॥ जयांचीं नामें उच्चारितां । भागला शेष त्वरिता । सिणली सरस्वती लिहितां । हरिभक्त न वर्णवे. ॥ ८० ॥ हे भक्तनामावळी । जो नित्य स्मरे प्रातःकाळीं । तयाचे पातकाची होय होळी । क्षणमात्रही न लागतां. ॥८१॥ सिद्धी पावती मनोरथ । इच्छिलें तें हरि देत । स्वयें होऊनी नित्य मुक्त । पद शाश्वत पाविजे. ॥ ८२ ॥ यालागीं मी हीनदीन । आठवले केलें स्मरण । बाचे यदविनो श्रीचिद्गन । झाला निमग्न उद्धव ॥ ८३ ॥

## (४) ॥ संतमालिका ॥

( जयरामसुतकृत. )

हरि जन हे हरिगुरुभजनें, जन तारुनि आपण तरले । निजभक्तिसुखें अव तरले ॥ ध्रु० ॥ तारक मार्ग दाविती लोका । बोधें हरिती भवभयशोका । जे समासागरी नौका । नामें त्यांची पावन ऐका ॥

ब्रह्मा, शंभु, कुबेर, प्रभंजन, इंद्र, चंद्र, यम, भास्कर, पावक, वाक्पती, वरुण, वसिष्ठ, पराशर, वाल्मिक, व्यासमहाकवि, गौतम, विश्वामित्र, अगस्ति, भार्गव, ऋषभदेव, सनकादिक, नारद, कपिल, दाल्भ्य, कश्यप, आस्तिक, शुक, वामदेव, श्रुतदेव, शमिकी, जडभरथ, दलभ्यो, याज्ञवल्क्य, भृगु, भरद्वाज, उपमन्यु, कदर्यु, पुंडलीक, मुनि मुद्गल, कवि हरि, अंतरिक्ष, पिप्पलायन, वीरहोत्र, प्रबुद्ध, चमेस-कर भाजन, द्रुमिळ, अत्री, मैत्रेय, सूत, शौनक, ब्रह्मद्रुष्वा, मार्कंडेय, अशीत, देवल, दुर्वास, देवद्विज, सुदेव, संजय, जैमिनी, वैशंपायन, सत्यव्रत हरिश्चंद्र, इक्ष्वाकु, आदल, नळ, चंद्रहास्य, मुचुकुंद, मुनि, ध्रुव, अंबरीष, पृथु, लक्ष्मण, गुहक, भरथभक्त, रुक्मांगद, धर्मांगद, अंगद, सुग्रीव, बिभीषण, जांबुवंत, हनुमंत, सुदामा, जनक, बळी, प्रल्हाद, अजामिळ, गणिका, गरुड, गजेंद्र, पिंगळा, विदुर, व्याध, गंगासुत, अर्जुन, धर्म, भीम, सहदेव, सुभद्रा, नकुळ, पृथा, गोपाळ, गोपिका, उद्धव, यदु, अक्रूर, परीक्षिती, शेष, शिशुपाळ, जटायु, जानकी, शर्वाणी, शबरी, अनुसया, सरस्वती, भागीरथी, यमुना, मैत्री, कमळजा, अहिल्या, अरुंधती, मंदोदरी, त्रिजटा, देवहुती, पांचाळी, रुक्मिणी, ऋषिपत्न्या, चंद्रावळी, उग्रसेन, वसुदेव, देवकी, कुब्जा, नंद, यशोदा, ॥ १ ॥

हरिजन हे हरिगुरुभजनें० इ०

पुराणप्रसिद्ध श्रीआनंदी याचा जाणें । जाले नित्य मुक्त निजज्ञानें । धाले बोधसुधारसपानें । त्यजिले कामक्रोध अभिमानें । त्यांची परिसावीं अभिधानें ॥

श्रीशंकराचार्य जगद्गुरु भाष्यकार, श्रीधर, मधुसूदन, हस्तामलक, मुकुंदराज, नृप जईतपाळ, जोतिरानंद, मत्स्येंद्र, मीन, गोरक्ष, भर्तृहरी, सदानंद, गहिनी, चौरंगी, परमहंस, कृष्णद्वैपायन, महामुद्गल, नारायण, श्रीनिवास, जयदेव, निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान, चांगया, मुक्ताई, रेवणसिद्धेश्वर, मरळसिद्ध, जालंदर, अच्युत, दामोदर, सारंगसरस्वती, सतिदास, नवलक्षसालया, नीसर, चर्पटी, चांदबोधला, विरम, गोपीचंद, कानीफ, मुक्ता, मैनावती, मृत्युंजय, माला, नरहरी, वत्स, वसा, परमानंद, विसोबा खेचर, नामदेव, हरि-

---

१ बक दाल्भ्य. २ चमसाश कर ३ मध्यात्मी तारा

देव, विठोबा, नाग, गोंदा, महादा, परसा, शिंपी कार गोविंद, सावता, चोखामेळा, पैसा वाहिरा, नरसमिहता, जनमित्रनागा, पुरंदर विठ्ठल, नाग कुंभाल, सेना न्हावी, कूर्मदास, हरिदास, कान्हया, मलुकदास, रोहिदास, त्रिलोचन द्विज, नरहरि सोनार, लतिफ, धनाजाट, हरिवल्लभ, दामा, रामानंद, उदासी, नानक, सहजानंद, कबीर, कमाल, किशोर, सखा सुरदास, मुधैया, तुळशीदास, पिपाजिराज, रामदास, यशवंत, वाजिद, शाहुसेन, शाहेउसमान ? माधव, प्रेमानदा, मदलसा, कान्होपात्रा, मिरा, हरिरुपा जनी, वहिणी, करमाई, ॥ २ ॥

हरिजन हे हरिगुरुभजनें० इ०

कोणी नलनिष्ठ गुरुभजनी । योगी वीतरागी रत सगुणी । भाविक नामकीर्तनी मौनी । सज्जन श्रवण करवदे श्रवणी ।

कनकदान, अज्ञान, सिद्ध नागेश, रेणुकानंदन, मौनी, भानुदास, विख्यात जनार्दन, येकनाथ गुरुभक्त, पुरुषोत्तम, लीलाविश्वंभर, चिंतामणी, मुद्गल कृष्णदास, अवधूत दिगंबर, दामोपंत, रमावल्लभ, लोलिंगराज, संतोष मिंवरा, गंगाधर, कवीर, मुरारि, शांतलिंग, श्रीकृष्णयोगिया, कृष्णदास जयराम, तुकावा, रामदास, आनंदमूर्ति, मल्लारि, पूर्ण, शिवराम, बोधला, रघुपति, शेष, निरंजन, केशव, विश्वनाथ, वामन, विठ्ठल कवि, रंगनाथ, कल्याण, चंदनसी, मानपुरी, रुक्मणा, चिद्गन, रामकृष्ण, वासुदेव, माधव, तुकयाबंधु, कुमर नागवण, मध्यमुनेश्वर, निपट निरंजन, पढरिनाम प्रल्हाद, माधुजयराम, कोंशी, गोतावीनंदन, राघवचिद्गन, श्रीधर, गुरुगोपाळ, अनंत, महत अनें बहुमत जगी किति गुप्त प्रगट जडमूढ पिशाच्यहि बालोन्मत्त विदेह निरंकुश वणिले हरिभक्त चतुर्विध मुक्त विरक्त मुमुक्षु उपासक सर्व झाले भगवत्पर जाति विनाति ह्मणूचि नये मग पावन हे सुरुतीविरुतीवाण गात असे जयरामसुताची वाणी ॥ ३ ॥

हरि जनहे हरिगुरुभजनी० इ०

---

१ मलिकदास. २ जयवंत ३शाहुशमन ४ केशव. ५ राघवचिद्गन, केशवचिद्गन, श्रीहरि नारायण रामकृष्ण श्रीधर

# ( ५ ) मंत्रमालिका.

## ( शिवरामकृत )

जो कां निर्गुण निर्विकार । निरामय निष्प्रपंच साकार । परि जगजीवन सर्वाधार । कर्णतसे सगुणरूपें जगदोद्धार । कृतत्रेत द्वापार । वेष धरोनी अपार । भवाब्धि पावर्तील जे । नामें यांचीं परम पावन । ऐका श्रवणें । चित्सुखसदनें । श्रीआदिनाथ, समर्थ दिगंबर दत्तात्रय, पराशर, कुमार, अंबरीष आणि रुक्मांगद, ध्रुव, प्रल्हाद, विदुर, शुक, नारद वसिष्ठ, वामदेव, पृथु, आंगद, उद्धव, अक्रूर, सनकादिक ऋषी, जनक विदेही, ज्ञानपूर्ण शशि, भीष्म प्रतापी, क्षेत्रधर्मनि सीम याज्ञवल्क्य, दुर्वास, कपिलमुनी, कवि वाल्मिक, अगस्ती, जैमिनी, शिबी, कश्यप, कौंडण्य, शिरोमणी अयोध्याधीश आत्माराम, सुमंत्र सखा आणि राजा धर्म, भीम, अर्जुनवीर, पराक्रमी परम नकुल, सहदेव, परीक्षिती, गौतम, हरिश्चंद्र, मयुरध्वज, रावण, दधिचऋषी, निजभक्त बिभीषण, पुण्यश्लोक तो भरत सुलक्षण, वालितनय, नळ, नीळ, सुग्रीव, जांबुवंत, अनिसैनिक अतिउत्कृष्ट वनिंच वनचर, भरद्वाज, गर्गाचार्य, भगीरथ, धौम्य, सुदामा, संजय, पुंडरिक, यशी आणि धनंजय, अहिल्या, द्रौपदी, वैदेही, तारा, मंदोदरी, अनुसूया मूळमाया हे सती, ऐशा ह्या हो अनंत विभूती जेथें, श्रुती मौन्य पावती तेथें, दुर्मति दुर्बळ मंदमती, मी काय वर्णो महिमा न कळे अति पूर्ण परात्पर माहेर सुंदर तो करुणाकर नामरूपीं हा भरला । नारायण कमलाक्ष जगपालन हा अवतरला ॥ १ ॥ सांप्रत आतां कलीयुगांत । जो कां ब्रह्म मूर्तिमंत । .. ... ... . । जिवन्मुक्त विचरत शांत जनांत । मुकुंदराज आणि जयत्पालनृप, मीन, मछेंद्र, गोरख, जनी, गैनीनाथ, जालिंद्रनाथ, कानिफा, गोपीचंद, माता मैनावती, सिद्ध पुरुष नाथपंथी आणि गैनी, निवृत्ती, नामदेव, सोपान, मुक्ती आणि चांगदेव, तो कनकदास, हरिकथार, पुरंदर विठ्ठल, जनतारक श्रीमत्परमहंस शंकराचार्य, जयदेव, मह मुद्गलभट्ट, स्वामी नामदेव, मुग्धेश, मिराई, मृत्युंजय, चांजीत पठाण, धनाजाट, तो कूर्मदास, धागा, रोहिदास, सेना न्हावी, भाव भक्त चोखामेळा, जयराम, तुकोबा, रामदास, आनंदमूर्ती, निजरंगनाथ, केशवस्वामी, वडवाळसिद्ध नागेश, सावता, सुरदास, पिपा राजपत्र, भानुदास, जनार्दन, येका, कृष्णदास, मुद्गल, मुकेश्वर, मानपुरी लोलीनराज, जोतिरानंद, तो नरसीमेहता, दासोपंत, विसोबा खेचर, नृसिंहसारथी, नरहरी माळी, कान्हो पाठक, अच्युताश्रम, गुरुपेन्हर बाबा, निजराज जो मौनीबाबा, निरंजन स्वामी, सच्चिदाश्रम, अच्युत भारती, हस्तामल, हो मुकुंद गोंदडा, सेख महंमद, कान्होपात्रा, वामन

स्वामी, तुळशीदास, सत्यामळ, गयेनी, गुप्तनाथ, उद्बोध केशरी, प्रगट गुप्त बहु, असख्यात सौख्यांत निमग्न झाले । स्मरण करिति जे तरिति तरति, अतिकुमति त्यजनिया मुक्तिपावन स्वजन धाम परिपूर्ण काम हें नामरूप शिवराम वन्दानदकंद गोविंद परमात्मतयाशि स्वलिला नारायण कमलाक्ष जगपावन हा अवतरला ॥ २ ॥

---

## ( ६ ) संतनामावळी

ॐ नमो परब्रह्म पूर्णकामा । । नित्य निरामय निर्गुणा । । क्षीराब्धिशायी नारायणा । । आनदघना । अविनाशा । ॥ १ ॥ मगलमणिनिधाना । । त्रिजगदखिलपालना ! । मज्जनघनचद्रना । । आराध्यलिंगा । ॥ २ ॥ शरणागतप्रतिपालन । कृपावया हेंचि कारण । ह्मणवूनि करिसा अवतरण । युगायुगीं निश्चयें ॥ ३ ॥ जगदोद्धारणालागीं । अवतरसी युगायुगीं । महानुभाव सत जगीं । प्रगट करिसी निज रूपें ॥ ४ ॥ ज्यांचें केलिया नामस्मरण । पावोनि सायोज्य निर्वाण । पनरपि जन्म-मरण । नाश करणें स्वहित ॥ ५ ॥ त्या भक्ताची नामाभिधानें । काही बोलो यथाज्ञानें । कृपा करोनि विद्वज्जनें । द्यावी अवधान श्रवणार्थी ॥ ६ ॥ व्यास, आबरीष, रुक्मागद, । विदुर, उद्धव, ध्रुव, प्रल्हाद । वसिष्ठ, वामदेव, नारद, । पृथु, अगद, अक्रूर, ॥ ७ ॥ सनक, सनदन सप्तर्षि । शुक, भीष्म तेजोराशी, । जनक विदेही निश्चयेसीं, । याज्ञवल्का, उपमन्यु ॥ ८ ॥ दुर्वास, कपिल महामुनि, । वाल्मीक कवि पूर्ण ज्ञानी, । अगस्ति, बृहस्पति, जैमिनी । जे चिद्रुपी विराजती ॥ ९ ॥ विश्वामित्र, पराशर । गरुड भक्त, हनुमत वीर । मार्कंड ऋषीश्वर, । गधर्व, तुबर जवळीक, ॥ १० ॥ मयूरध्वज, माधाता । शिबी, परीक्षिति, बिभीषण ध्याता, । रावण भक्त तत्त्वता, । शरण उमाकाता सर्वस्वे ॥ ११ ॥ मचकुंद नळा, पुडलीक, । लक्ष्मण, भरत पुण्यश्लोक, । नळ, नीळ, जांबुवतादिक, । मुख्य सैनिक सुग्रीव, ॥ १२ ॥ भारद्वाज, गर्गाचार्यो, । भगीरथ, सुदामा, सजयो, । जगद्गुरु दत्तात्रेयो, । हस्तामलक चिद्भानु, ॥ १३ ॥ अहल्या, द्रौपदी, जनकतनया, । तारा मंदोदरी, अनुसूया, । पार्वती, अरुधती मूळमाया, । स्मरणें भवभया नाशिनी ॥ १४ ॥ ऐशा अनतान्या अनत विभूति । कवण जाणे कैशा किती ? । जेथें मौनावती श्रुति, । तेथें मदमति काय बोलों ? ॥ १५ ॥ तृणांकुर पर्जन्यधारा, । असंख्य गगनींच्या तारा । सिंधुजीवन उर्वीभारा । काय पामरा गणवती ? ॥ १६ ॥ एक एक रोमाग्रा केवढा । अनत ब्रह्मांडाची माळ । ऐसा व्यापक लक्ष्मीलोळ । भक्तवत्सल परमात्मा ॥ १७ ॥ त्या भक्तांचीं नामें । वाचे उचारू सप्रेमें । मोक्षदायक उत्तमोत्तमें । परम सभ्रमें करुनिया ॥ १८ ॥ आता कलियुगीं सांप्रत । जें परब्रह्म मूर्तीमंत । तें चमदेही जीवन्मुक्त । साधु सत विचरती ॥ १९ ॥

कृतीं, त्रेतीं, द्वापारीं, । अनंत युगीं, अनंत अवतारी, । भगवद्भक्त नानापरीं । बोलिले वेसरां स्मरले ते ॥ २० ॥ मुकुंदराज मुनीश्वर । विवेकसिंधूचा कर्तार, । जयत्पाल नृपवर । योयोनि पहिार केला. ॥ २१ ॥ मीन, मच्छिंद्र, गोरक्षी जाति । चुटी (?) जालींद्र, कानिफा सती । गोपीचंद, मैनावती, । नाथपंथी सिद्धगुरु ॥२२॥ रावल, चर्पट, चौरंगी, । हृदयानंद अच्युत सारंगी, । नागार्जुन, जगन्नाथ वेगीं । शरण पांडुरंगीं निचा, तो ॥ २३ ॥ गैना, निवृत्ति, ज्ञानेश्वर, । सोपान, मुक्ताई, अवतार । ब्रह्मा विष्णु महेश्वर, । मूळमाया हे चवथा. ॥ २४ ॥ चांगदेव वटेश्वर, । मिगराई आणि कुंभार, । कनकदास, पुरंदर, । ऐसा खेचर विसा, तो ॥ २५ ॥ श्रीशंकराचार्य परमहंस, । नामदेव, तुळशीदास, । जनजसवंत, सुयश, । मृत्युंजयस्वामी तो ॥ २६ ॥ कूर्मदास, नरहरी सोनार, । धागा, रोही, गोरा कुंभार । चोखामेळा महार, । निरंतर भक्तिमुक्त ॥ २७ ॥ गोणाई, राजाई, जनी, । महादा, नारा, विठा, गोंदा ज्ञानी, । नामयाचे पुत्र कलत्र जनीं । हें सज्जनीं जाणिजे ॥ २८ ॥ जगमित्र नागा, सुरदास, । विपा रजपूत महापुरुष, । विष्णुदास, माधवदास । राघवदास, नित्यानंद, ॥ २९ ॥ सावता माळी भक्तराज, । नरसी मेहता घेऊनि पेज, । माउ घेतली हें चोज । अधोक्षजें दासविलें ॥ ३० ॥ दासोपंत, जनार्जनार्दन, । विठा रेणुकानंदन, । बहिरापिसा, कृष्णारण्य (?) । भानुदास पूर्ण पूर्णत्वें ॥ ३१ ॥ जयदेव, महामुद्गलभट, । वाजींद पठाण, धना जाट, । मेना न्हावी, भक्तश्रेष्ठ । भू वेकुंठ पैं केलें ॥ ३२ ॥ जनार्दन, एकनाथ, । रमावल्लभ, मालोपंत, । गोंदडी, मुकुंद महंत, । आणि अनंतदेव तो ॥ ३३ ॥ नामा महादेव, कान्हा पाठक, । मुकेश्वर, लतीफ देस, । ज्योतिरानंद अलोलिक, । भक्त सम्यक जाणती ॥ ३४ ॥ अच्युताश्रम, सतोषाश्रम, । गुह्याश्रम, पुरुषोत्तम, । नरसी, भारथी, नारायणाश्रम, । मौनीबावा, याकुब, ॥ ३५॥ लोलिंबराज, जगदारण्य, । निरंजन हरि नारायण, । निरंजनस्वामी ब्रह्मपरायण, । मंगलमूर्ति प्रत्यक्ष. ॥ ३६ ॥ सतीदास, वेडा नागा, । तालुघर, परमानंद जोगा, । परसा भागवत, पांडुरंगा । सन्निध सर्वदां राहिला ॥ ३७ ॥ सय्यद महमद, कोमडयया (?) । कान्होपात्रा, नवलाख साळया, । रामानंदीं गेलां विलया, । मूळ माया हे समूळ ॥ ३८ ॥ चोभा साळया रसाळ, । नरहरी, एकनाथ, मेंगळ, । शिवराम, अनंत, गोपाळ, । वदू त्रिम्मळ, अक्रूर ॥ ३९ ॥ अज्ञानसिद्ध नागेश, । प्राणदास, मलूकदास । नमन दामाजीपंतास, । निरंतरस्वामी दिवाकर ॥ ४० ॥ सोनाजी आणि सोदू, । नानक, पिंजारी दादू, । शहाहुसेन, परमानंदु, । वडवाळसिद्ध नागेश ( ? ) ॥ ४१ ॥ केशवस्वामी, नागार्जुन, । चांगा, बोधला, जगदारण्य, । संतोबा पोवार, आपण । वैराग्य पूर्ण धगधगीत ॥ ४२ ॥

मदानंद, गमानंद, । अमलानंद, गभीगनंद । मल्हानंद, सहजानंद, । पूर्णानंद गुरुवर्य ॥ ४३ ॥ नीलकंठ, शांतलिंग, । जयराम, श्रीकृष्ण, अभंग । गोपाळस्वामी नि संग, । गुरुभक्त साम्य सर्वस्वें ॥ ४४ ॥ आत्मबोध, सहजबोध, । अनंतबोध, अगाधबोध, । गभीरनाथ प्रसिद्ध, । चिंतामणी सर्वदा ॥ ४५ ॥ बाबाजी चैतन्य स्वयंप्रकाश । तुकोबा तोचि भक्तकळस, । शिवाजी गुरव, प्रेमरसू । सेवोनि समरसू झाला ॥ ४६ ॥ केशवस्वामी, लिंगबोध, । रामीरामदास प्रसिद्ध, । वामनस्वामी शुद्ध बुद्ध, । अगाधबोध बोधला ॥४७॥ काशीराज ··· ··मुनी । विश्वनाथस्वामी पूर्ण ज्ञानी, । माधवराज रघुनाथभजनी, । आनंदमूर्ति गुरुभक्त ॥ ४८ ॥ श्रीकृष्ण तुळशी अद्वय, । चिद्गनागम कृष्णमय । उल्हास चैतन्यसांप्रदाय, । ऐसें आचार्य चालती॥४९॥ हे जीवन्मुक्त संतमाळा । असंड घालावी गळां । दिव्य जाली संतमाळा । ह्मणऊनि हेंयामात्र गुफली ॥ ५० ॥ संतमाळा वैजयंती । संतीं केली साधुसंतीं । अर्पूनियां भगवती । संसारगुफी वारिली ॥ ५१ ॥ स्मरण करितां प्रातःकाळीं । दोष दहन होय होळी । स्मरतां संतनामावळी । स्वानंद जवळी नित्य वसे. ॥ ५२ ॥ अनंत पुण्यें असतील गांठी । तरी संतमाळा शोभेल कंठीं । वैकुंठीहूनि उठाउठी । श्रीकृष्ण जगजेठी उडी घाली ॥ ५३ ॥ माझिया भक्तांचीं नांवें । मा ऐकेन प्रेमभावें । ह्मणूनियां माधवें । उडीनें यावें श्रवणार्थी. ॥ ५४ ॥ प्रगट गुप्त असंख्यात । जीवनवासी समाधिस्थ । न्यूनभावें प्रणिपात । नमन दंडवत तयांसि ॥ ५५ ॥ सहजीं सहज पूर्ण रंग । निजानंदें निःसंग । अक्षय अज अभंग । संतमाळा सांग त्याचेनि ॥ ५६ ॥

---

## ( ७ ) संतमालिका.

आतां वंदु संतसज्जन । जे उद्धरती हीन जन । तया संतांचें महिमान । सांगतां नये बोले ॥ १ ॥ संत रूपेंचे सागर । ज्ञान वर्षिते जळधर । भाविकांसि परपार । पाववती कृपेनें ॥ २ ॥ संत परब्रह्म साकार । दिसती परि निराकार । जैसि जळाचि जळगार । तोयाचि सत्य जाणिजे ॥ ३ ॥ संतांचिये संगतीं । जिव उद्धरिले येणें किती । ह्मणोनि संतांची संगती । धरिती विवेकी असंड ॥ ४ ॥ ते संत कोण कोण । ऐक तयांचें नामाभिधान । श्रवण भजन करितां, दहन । पातकें होति तयांचि ॥ ५ ॥ मछिंद्र, गोरक्षक, गिनिनाथ, । जे अवतार मूर्तिमंत । ज्ञानदेव, निवृत्तिनाथ, । सोपानदेव, मुक्ताबाई ॥ ६ ॥ मुकुंदराज महासमर्थ । केला विवेकसिंधु ग्रंथ । त्या विवेकसिंधुचा अर्थ । संतसज्जन जाणती. ॥ ७ ॥ नागनाथ, चांगभट विसा, । रेणुकानंदन, जान तैसा । जे भावडती महेशा ।

अनगापामुनि ॥ ८ ॥ नामदेव, चांगदेव, । विठा, नारायण, महादेव, । भगवताचे प्रिय सर्व । मकराज मनेश ॥ ९ ॥ जनाबाई, मिराबाइ, । विनरले हरिपाईं । त्याचा महिमा वर्णू काई । हरिहर वर्णिती ॥ १० ॥ कबीर, कमाल, सुरदास, । नरसिमेहता, रोहिदास, । गोराकुंभार, मालुदास, । निज प्राण हरिचे ॥ ११ ॥ महाराज जनार्दन, । येकनाथ अवतार पूर्ण । दामाजिपताचें आख्यान । असे ठाउक सर्वांसि ॥ १२ ॥ नरहरि सोनार, पटरिसि । चोखामेळ हा परियेसि । तुकोबावरि देहुसि । माणकोजि बोधला ॥ १३ ॥ श्रीमत् रामदासस्वामिसमर्थ । जेणें चाढविला परमार्थ । मारुतिअवतारचि निश्चितार्थ । विश्वकार्यार्थ होतसे॥१४॥ हे जाणुनी अन्य सत्रे मन । उद्धवसुत करि नमन । संतसेवेचें महिमान । मुखें बोलावेंसें नाही ॥ १५ ॥

---

# ( ८ ) संतमालिका.

उठोनिया प्रातःकाळीं । जपा संतनामावळी । स्मरतां किल्मिष अवघें जाळीं । देव पाहि आइसि ॥१॥ केशव, अत्रि, कपिल मुनी, । व्यास, वशिष्ठ, नारदमुनी, । कौंडण्य, मार्कंडेय, कौशिक मुनि । महाज्ञानी महापुरुष ॥२॥ अगस्ति, गौतम, वाल्मिक मुनि, । भारद्वाज, शुक, जमदग्नि, । विभांडक, गर्ग, शृंगमुनि । चिन्मयभुवनीं गतले॥ ३॥ नळ, प्रल्हाद, हरिश्चंद्र, । श्रीयाळ, जनक, रुक्मांगद, । ध्रुव, उपमन्य, गोपीचंद, । महामंदें डुलती ॥ ४ ॥ जागधना, मलुकदास, । कबिर सतिप, कुर्मदास, । सेचराविसा, सुरदास, निजपदासि पावलें ॥ ५ ॥ वडवाळसिद्ध, नागनाथ, । मुकुंदराज, जडभरत, । चक्रेश्वर, निवृत्तिनाथ । पुरला द्वैत सर्वांचा ॥ ६ ॥ जगमित्र नागा, ज्ञानेश्वर, । सोपान, फोनेरि गगाधर, । गिसोबा खेंग, शुकसागर । मल्लानंदें हेलावे॥७॥ नामदेव, चांगाकोठ्या, । नरहरि सोनार, सांवतामाळी, । गोरा, विठो लावुनी गळा । हृदयकमळीं आलिंगिनो ॥ ८ ॥ मुक्तभट, मुक्ताबाई, । भानुदास, मिराबाई, । एका जनार्दनाचे पाई । आऊबाई, निरंजनि ॥ ९ केशव स्वामि, निंबराज, । चोखा, तुका, मोजगज, । रामदासा मंत्रविज । उपदेशिले रघुवीरें ॥ १० ॥ पाठकनामा, मन्मथ आया । प्राण गोपाळ मृत्यजया । बहिणी, वाणि, जनी, साळया, । देवराया रातले ॥ ११ ॥ नरहरि, मल्लो, जयराम, । मैना, घागा, सिवराम, । सरला अलरिचा काम । मेघःशाम, कृष्णदास, ॥ १२ ॥ सहजानंद, वामानंद, । याज्ञवल्कि, पूर्णानंद । जन पाइत, शेखमहमद, । नम्पर पद पावले ॥१३॥ तुळसि, नानाक मळा, । मानपुरि, शिवलिंगपाला, । हरिदास कान्हयाला । टेकिले पाईं गोविंद ॥ १४ ॥ रमावल्लभ, दास भोळा, । रेणुकानंदन विठपाला, । चिन्मये, माधो, दत्तोबाला, ।

वर्षाव केला कृपेचा ॥ १५ ॥ वामन, चिद्दन, गोसाविनंदन, । लोला मुद्गला, नान सेन, । नारा, महादा, भगवतानें । आपुले हातें कुरवाळिले ॥ १६ ॥ अज्ञान सिद्ध, नाथ प्रसिद्ध । मुक्तेश्वर, मैराळ सिद्ध, । मार्कंड, रंगोबा प्रसिद्ध, । ठाउका आहे सतासि ॥ १७ ॥ महत्कार्जुन ब्रह्मचारी, । प्रत्यक्ष वेद जैसे चार । काये सांगुं त्याचि थोरी । जन्मवरी गुरुसेवा ॥ १८ ॥ सतमाळेचें भूषण । हा मिरवा नारायण, । भक्तासाठीं जगजीवन, । नाना वेष धरित असे ॥ १९ ॥ सतमाळा ज्यांच्या कंठीं । सत निरूप ज्याचे दृष्टी । सतवर्णनीं ज्यांचा मिठी । मुक्तिभेटी येतील ॥ २० ॥ सत मेवा जयासी घडे । काळ येऊन पाया पडे । त्रिभुवनींच ज्ञान घडे । येणें न घडे जन्मासी ॥ २१ ॥ सिद्ध चैतन्य सता शरण । सत माझे जाव प्राण । चिन्मये मूर्ति त्यांचें देन । उणें कोठ असेना ॥ २२ ॥

---

## ( ९ ) कपोताख्यान.

आरंभीं नाम ज्याचें रमणिय स्मरतां, सर्व विघ्ना हरीतो, ।
जो कां सर्वांतरात्मा, जगजनक विधी, शूळपाणी हरी तो, ॥
जो त्या भक्तांतरंगीं भवभय हरुनी, देतसे मुक्तिपद्मा, ।
त्या श्रीमद्गणेंद्रा कर-युग सिरसें वंदिलें पादपद्मा ॥ १

कमलजतनये ! श्रीशारदे ! आदिमाते ! ।
मृगनयनगणाग्रे ! वारि सर्व भ्रमातें ॥
तव निजपद ध्यातों, स्फूर्ति दे शीघ्र मातें, ।
मग जगजनकातें वर्णितां फार मातें ॥ २

जो लक्षिल्या लक्षसि लक्षवेना ।
जो ज्ञानगर्वासि परिक्षवेना ॥
जो कल्पवृक्ष सकळासि वसे निदानीं ।
तो सद्गुरू नमिन मी भज मोक्षदानी ॥ ३

वदूं सत सुज्ञान साधक सभा भावार्थ कवीच्या जना ।
वदूं भक्त विरक्त मुक्त विषयीं श्रोते रूपीं सज्जना ॥
ऐका पुण्यकथा चरित्रसुमनें वाक्पुष्पमाळा भला ।
त्या श्रीविष्णुपदीं समर्पुनि सुखें हृत्पद्मीं शोभला ॥ ४

मुक्तिस्थान प्रसिद्ध कांतिनगरी विख्यात भूमंडळीं ।
तेथें श्रीधिनरुद्र सत्यवचनी पाळी रूपीं मंडळी ॥
कोणी दुःख न देखतीं निशिदिनीं, आनंद लोकां जनीं ।
तेथें ब्रह्मविचारणा अनुदिनीं, विश्रामता सज्जनीं ॥ ५

अश्वमेध शत येक कराया ।
  धर्मबुद्धि उपजे नृपराया ॥
दुस्तर भवसमुद्र तराया ।
  मोक्ष अक्षय सुखासि वराया ॥ ६

नच्याणौ नृपयज्ञ सांग घडले, वस्त्रादि धान्ये धनें ।
  आर्पी, विप्रकुळांशि इच्छित मनीं तोषी समाराधनें. ॥
शेवी एक उरे नगेसममणी तोही करी आदरें ।
  तों देवे मुनि नारदा निजमनीं, पूजी अती आदरें ॥ ७

ह्मणे नारद फार संतोष झाला ।
  तुझ्या सुकृतें मोक्ष पै पूर्वजांला ॥
अता शीघ्र शत्यारि स्थाना हराया ।
  त्वरें यज्ञसिद्धी करी पूर्ण राया ॥ ८

मुनी मानसीं फार आनंदला हो ।
  सुखानंदसिंधू मनीं कोंदला हो ।
'कळी फावली येच वेळे मला हो, ।
  छळूं सत्वधीरा, हरूं होमलाहो. ' ॥ ९

वेगीं वेग करोनि नारद नभीं लङ्घूनिया पोंकळी ।
  गेला इंद्रपुरी सुरेंद्रसदना लावावयातें कळी ॥
इंद्रें देखुनि वंदिले मुनिवरा जोडोनि दोन्ही करा ।
  पुसे गुह्य मनात चिंतुनि असा तें आजि आज्ञा करा ॥ १०

बोले नारद भूतळीं मम करी कांतीपुरीचा पती ।
  शिधी भूप अमूप पुण्य करुनी भोगी सुखें संप्रती ॥
रायाला शत यज्ञपुण्य घडलें पावेल तुझ्या पदा ।
  आतां पाहसि कायरे सुरपते जाईल हे संपदा ॥ ११

सिधी रूपें शक्रपदा वराया ।
  रामे तुझी संपति देवराया ॥
त्याच्या मखा निष्फळ हो कराया ।
  ते सांगतों सादर ऐक राया ॥ १२

शक्राचे सुहितार्थ नारदमुनी अत्यादरें बोलती ।
  ऐके सादर होवुनी नगरिपू चित्तीं धरी बोल ती ॥
यज्ञीं जो अतिथासि विन्मुख करी नेदी मनोमित हो ।
  तें त्याचा मख पूर्ण सिद्धि न पवे शास्त्रार्थ हा स्पष्ट हो ॥ १३

याकारणें ऐक उपाय यातें ।
कापट्यरूपें छळिजे तयातें ॥
तुवां कपोतस्वरूपा धरावें ।
अम्हीं ससाणास्वरुपी करावें ॥ १४

ऱ्यावें मत्वरि कांतिये नृपमणी यज्ञासि जेथें करी ।
वेगव्वें अति लाघवें सुरपती वेषें नृपाचे करीं ॥
तुह्मां देखुनिया स्वभक्ष ह्मणुनी मागे ससाणा त्वरें ।
तें राया अविचार घेउनि घडे टाळील तो सत्वरें ॥ १५

अशा साकडामाजि राजा पडे हो ।
तुह्मालागिं पैं सधि ते सापडे हो ॥
त्वरें सत्व जाता नृप भोगभोगी ।
तयानंतरें तूं पदीं भोग भोगी ॥ १६

मुनी नारदू युक्ति सांगे सरी हो ।
सुरेंद्रा गमे युक्तशी वैखरी हो ॥
कपोतस्वरूपी दिसे जंभशत्रू ।
ससाणा करी वन्हि तेव्हां स्वशत्रू ॥ १७

त्वरें पातले क्षेत्र कांतीपुरीशी ।
दिठी देखिला तो मखी सत्वराशी ॥
वधू धर्मपुत्रादि सद्बुद्धि मन्त्री ।
ऋपी आहुती घालिती वेदमन्त्री ॥ १८

बहू सुरुतें यज्ञ राजा करीं हो ।
कपोता बसे शीघ्र रायाकरीं हो ॥
ससाणा त्वरें दूरि पैं बैसलाहा ।
नराधीप देखोनिया हासला हो ॥ १९

तया पक्षिया देखिलें सर्व लोकीं ।
रुपादृष्टिनें सव त्यातें विलोकी ॥
प्रधाना पुसे हा अभिप्राय दावा ।
ह्मणे मंत्रि पक्षिद्वया पूर्ण दावा ॥ २०

ससाणा कपोत्या धरायासि धावे ।
धरोना करीं शीघ्र त्यातें वधावे ॥
ससाणा वध व्यर्थ वाया करी हो ।
तयान्या भयें पक्षि बैसे करीं हो ॥ २१

शरण तुज कपोत प्राण रक्षावयातें।
मरण हरुनि राया सौख्य देई तयातें॥
परि हरुनि ससाणा दीन रक्षी नृपाळा।
तरुनि कुल सुभूपाकीर्ति घेई रूपाळा॥ २२
कपोत्यासि मागे ससाणा नृपातें।
' म्हणे तृप्त मी त्याचिया देहपातें॥
भुकेनें बहू पीडिलों शिबिराया।
। त्वरें भक्ष दे या क्षुधेतें हराया॥ २३
मर्मी म्हणे दवडितां शरणागता हो।
। जाईल सत्य नृपकीर्ति न सागतां हो॥
वेगीं कपोतरिपुतें परतें करा जी॥
हे ।गोष्ट मान्य करिता बहु लोक राजी॥ २४
ससाणा म्हणे धन्य हो धन्य हा की।
अधर्मा करी धर्म बाहेर हाकी॥
बदा नाम याचें रुपेनें नृपेशा।
दुरात्मा दिसे मूळ हाकी अपेशा॥ २५
नरेंद्र म्हणे ' नाम याचें सुबुद्धि।
पुरोहीत हा ब्राह्मणा तर्कबुद्धि '॥
ससाणा परीसोनि माथा तुकी हो।
म्हणे ' नाम या ठेविलें कौतुकी हो॥ २६
जसें नाम तैशी क्रिया यासि नाहीं।
क्रियेमाजसी ते दिसे वासना ही॥
महादेव शंभू तया नाम स्थाणू।
जनी बोलताती द्रुमालागि स्थाणू॥ २७
तसें नाम या ठेविलें हो सुबुद्धि।
परी अंतरीं नांदतो हा कुबुद्धि॥
सुमर्त्री बहू देखिला आणि दर्शी।
न दावा जना यासि लागेल दर्शी॥ २८
ऐशापि नीति पुमतांचि पुरोहिताला।
तेथें नृपासि सुख काय उणें हिताला॥
आतां कुमंत्रिवचना न धरीं मनातें।
अन्नार्थि मी पुरविजे मम कामना ते॥ २९

त्या कारणें बहुत कष्टुनि लाभ केला ।
की जे त्वरीत शमवूं जठरीं भुकेला ॥
मानें न याल तरि कोण तुह्मांस वारी ॥
जैसें तृणें न धरवे बहुलोट वारी ॥ ३०

माता वधी गरल पाजुनि लेंकुराला ।
त्याशी पिकें धरणि कोण धरी कराला ? ॥
किंवा जलाब्धि महिलें बुडवी जळें हो ।
की अग्नि भूमि दहितां सकळें जळे हो ॥ ३१

किंवा जगी नभ पडोनि घडे अपाया ।
की अन्न बीव पडल्या न दिसे उपायां ॥
किंवा क्षितेश अवर्नीति करी तरी हो ।
नाहीं प्रयत्न दुसरा निज अंतरीं हो ॥ ३२

तेसें कराल जरि भक्ष्य न खावयासी ।
नाहीच अन्य मजलागिं उपाव यासी ॥
त्या रक्षुनी मज न देउनि अन्नपाणी ।
हें मान्य होय कवण्यापरि चक्रपाणी ॥ ३३

⏑ – ⏑ – करुनि ताडण सज्जनांला ।
विप्रासि पूजुनि दिलें जरि भोजनाला ॥
की मार्ग रोधुनि जना हरुनों धनाला ।
नेमें करी सकळही व्रत साधनाला ॥ ३४

हें पुण्य कीं अघ ह्मणोनि भल्या विचारा ।
ते सत सांगति तुह्मां बरव्या विचारा ॥
शास्त्रानुसार तुह्मीं वर्ततसां अचारा ।
द्यावें असें वचन पें अतिथासि चारा ॥ ३५

तू सर्व जाणशि नृपा निगमागमाशीं ।
हे नाकळेचि मजलागि विहंगमाशी ॥
विप्रासि अन्न दिधलें बहु धर्मराजें ।
आद्यापि कीर्ति जगतीं बहुधा विराजे ॥ ३६

गृहस्थाश्रमीं पुत्र कन्यादि दारा ।
क्षुधार्थी त्वरें जाति त्याच्याच दारा ॥
अतीथा मनोभिष्ट देताति भावें ।
जगीं चालती नीति ऐशी स्वभावें ॥ ३७

येती अतीथ विपिनीं ऋषी आश्रमातें ।
तेही विमुख न घ्दतां हरिता श्रमातें ॥
ऐश्वर्यंता असुनियां अतिथां उपाशी ।
हें देखिलें नवल भूपति तूजपाशीं ॥ ३८
यज्ञीं अतीथ दिठिं देखुनि इष्टदेशी ।
हे कीर्ति लोकवदनीं बहुदूर देशी ॥
मार्गेंचि भक्ष मज नेदिसि तू कसारे ।
मिथ्याच बोलति जगीं जन लोक सारे ॥ ३९
ज्यांचे तयासि जरि नेदिसि आहराशी ।
या सुकृतें ह्मणसि तोय करू हराशी ॥
भिक्षूक विन्मुख करी तरि यज्ञसिद्धी ।
नाहीं, न होय तव कीर्ति जगीं प्रसिद्धी ॥ ४०
रुक्मांगद् मोहिनि लागि राते ।
ह्मणोनि पुत्रें दिधलें शिरातें ॥
तेशींच कीर्ती धरिली श्रियाळें ।
भिक्षार्थिया पुत्र दिला दयाळें ॥ ४१
हरिश्चंद्र स्वर्गी द्विजा दे धरा हे ।
तयाची जगीं कीर्ति आचाप राहे ॥
तशी म्यां तुह्मा घातली नाहिं कोडीं ॥
स्वभल्या दिल्या तेंचि कीं लक्ष्य कोडी ॥ ४२
नरेंद्रा त्वरें देऊनी पाखरा या ।
तुझें पुण्य सत्कीर्ति नू राख राया ' ॥
असें घातलें भूपती साकडे हो ।
नराधीश पाहे सुपुत्राकडे हो ॥ ४३
चोलें पुत्र ' कपोत त्यास दिधल्या सत्कीर्ति वेगीं पळे ।
केलें पुण्य अभूप सर्वहि त्वरें जातां न लागे पळें ॥
यासाठीं अतिथासि ' नास्ति ' वचनें जावें ह्मणावें घरा ।
रायें रक्षुनि दीन हा निजगृहीं कीं त्या धरा पाखरा ॥ ४४
लोडा कपोत हृदयीं भयशूखळा हो ।
धाडा त्वरीत विपिनासि तया सळा हो ॥
जोडा अपार सुकृतें शरणार्थियातें ।
रक्षूनियां निजगृहात न द्या तयातें ॥ ४५

पूर्वी हो शरणागतू बिभिषणू लागे श्रिरामापदीं ।
रामें त्या चिरकाल पट्ट दिधला लंकेनि राज्यापदी ॥
मैनाकें उदधी शरण्य रिघता पाळी जलाब्धी तया ।
तैसें तू शरणागता निजगृही रक्षा जगद्धातया ' ॥ ४६

ऐसे परी वचन सांगतसे पित्यातें ।
ऐके कपोतरिपु तो बहु कोप त्यातें ॥
क्रोधें पुसे नृपवरासि ससाण पक्षी ।
' सांगा ' ह्मणे कवण हा आमुचा विपक्षी ॥ ४७

' माझ्या हो जठरीं क्षुधा खवळली अत्यंत पै नावरे ।
हाही त्यावरि धर्म विघ्न करितो याचें वदे नाव रे '
सांगे भूपति ' ज्येष्ठ पुत्र अमुचा धर्मू असें नाम रे ' ॥
हांसे पक्षि ह्मणे ' अधर्म दिसतो मी तों उपाशीं मरे ॥ ४८

नाम रम्य गमलें करणी हो ।
पाहतां न दिसते करणी हो ॥
जेंवि नाम अमृतासि पियुष्णा ।
बोलती जन नदासि पियुष्णा ॥ ४९

तैसेंचि धर्म अभिधान तुझ्या सुतातें ।
ठेवीयलें बहुमिती तनयास तातें ॥
जैसा सुबुद्धि आवलोकियला प्रधान ।
तैसाचि धर्म तव आत्मज हा निधान ॥ ५०

ऐकोनि धर्म करिसी जरि पुत्रवाणी ।
तें हो मखांत अनिथांप्रति काय वाणी ॥
मातें गमे नृपतिनंदनवाक्यअर्थें ।
होईल यज्ञ पारपूर्णहि स्वल्प अर्थें ॥ ५१

या धर्मपुत्रवचनें अघ ये घराशीं ।
येईल सत्य अपकीर्ति अमोघ राशी ॥
आतां अधर्म वचना धरिशील चित्ता ।
झाली पहूल ज्वरी मन भूकंपिता ॥ ५२

अस्थीशिरांची शरिरांत जाळी ।
त्यातें क्षुधा सर्व समूळ जाळी ॥
हे तों मला पापिण फार जाची ।
सर्वांतरीं बाधक हें निजांची ॥ ५३

गांधारी शत पुत्र मृत्यु रचुनी त्यामाजि वेघो सरे।
  पाला चिंचणिचा करें वरवडी सातां क्षुधा वोसरे॥
ऐशी हे अनिवार भूक नृपती मातें करां यातना।
  माझा प्राणप्रयाग होउ वघनो टाकोनिया यातना॥  ५४
ऐशा परी बोलुनि दीन वाचे।
  पडे क्षिती मूर्छेन मी नवाचे॥
प्राणांत आला धरि मृत्यु वाटे।
  कुर्नीम पें सत्य जनास वाटे॥  ५५
ऐसा ससाणा पडतां धरां हो।
  शिबी ह्मणे सत्वर त्या धरा हो॥
राया गमे हे बहु विघ्न दीसे।
  पुन्हां उठे तें मज हांसु दीसे॥  ५६
नरेंद्र वदे थोर हा थोर घाला।
  प्रधाना ह्मणे त्या मुखीं नीर घाला॥
तया पक्षिया घालुना शीत वारा।
  त्वरें ऊठवा या अपेक्षा निवारा॥  ५७
मन्त्री त्या कपल्लवीं धरुनिया घाली मुखीं जीवना।
  जधीं घेउनि पल्लवें समिर त्या घाली तरी जीव ना॥
बोले राव जनासि त्यास उठवा सर्वस्व देईन मी।
  विप्रातें ह्मणतो तयास जिववा मार्वे पदाब्जा नमीं॥ ५८
ह्मणे राव यत्नासि कांहीं करारे।
  करें विघ्न, आलें शिवा शंकरारे॥
ह्मणे लौकिकीं लाज येईल मातें।
  असा राव चिंतांत पावे श्रमातें॥  ५९
नरेंद्र ह्मणे कायसे युक्ति यासी।
  यदू बोलतो भक्ष्य याहो तयासी॥
कपोता ससाण्यासि देवोनि खाया।
  नृपा तूं करी पूर्ण वेगीं मखा या॥  ६०
असें सर्व लोकीं सुबुद्धी मतीला।
  यदूता परी सांगतीं भूपतीला॥
कपोता ससाण्यासि या भूवरा हो।
  प्रभू अंतरीं गोष्टि हे बांवरा हो॥  ६१

न देतां तरी शीघ्र तो मृत्यु पावे ।
कपोतासि देणें मुचे हा उपावे ॥
असें सांगती लोक राज्योत्तमातें ।
कपोता ह्मणे हेंचि कीं विघ्न मातें ॥ ६२

कापें कपोततनु ऐकुनि लोकवाचे ।
आलें ह्मणे मज अरिष्ट खरें जिवाचें ॥
चिंता अशी बहुत होय विहगमातें ।
म्लानें मुखें वदन पक्षि नृपोत्तमातें ॥ ६३

'ऐके वृत्तांत नृपती मम अंतरींचा ।
मी वास कीं करितसे विपिनांतरींचा ॥
बाळें क्षुधीत जाहलों ह्मणुनीं ओंहारू ।
आणावया करित जात वनीं विहारू ॥ ६४

फिरे काननाभीतरीं मी चराया ।
नव्हे अन्यथा गोष्टि हे साच राया ॥
मुखीं घास घेऊनि जातां गृहा हो ।
अकस्मात हा पावला ह्या महा हो ॥ ६५

विधीनें कसें लाहिलें कीं कपाळा ।
त्वरें हा रिपू पाठि लाग कृपाळा ॥
भयें याचिया हिंडलों फार भूमी ।
न सोडीच हा त्रासलों तें प्रभू मी ॥ ६६

भयें शत्रुच्या फीरता पै नृपारे ।
दिठीं देखिलें तूज राजाधिपारे ॥
रिपूच्या भयालागिं वेगीं हराया ।
कराब्जी तुझ्या बैसलों जाण राया ॥ ६७

कांतीपुरी परम पावन पुण्यक्षेत्री ।
तू राव क्षत्रकुलश्रेष्ठ सुधर्म क्षेत्री ॥
तू भूपती शरण रक्षक मस्तहस्ती ।
पालागिं शीघ्र बसलों तुझिया स्वहस्तीं ॥ ६८

वासुकी प्रभु जसा भुजगीं हो ।
तेंवि तू नृपति या भुजगीं हो ॥
या निमित्य शरणांगत राया ।
येत मी रिपुभयाब्धि तराया ॥ ६९

जाईल की ह्मणुनि शत्रुसि जीव यायां ।
राया तुला शरण मी तनु जीवदाया ॥
आलों विचारुनि मनीं बहु दूर दृष्टीं ।
मृत्यू परंतु न चुके सहसा अदृष्टीं ॥ ७०
त्यांचेच; निभय समस्त सभाजनांचा ।
तैसाच भाव दिसतो सुखिया मनाचा ॥
नाहींच बोल तुजला, मम पूर्वकर्मे ।
भोगावया लिहियले विधिविश्वकर्मे ॥ ७१
कांहीं तरी पर उपद्रव ये जयातें ।
तेणें शरण्य रिघिजे क्षितिराजयातें ॥
राया तया जिववितें शरणागतातें ।
हे नीति लावुनि दिली रविरंगतातें ॥ ७२
तूं जाणशी सकल गोष्टि चराचराची ।
मी केवढें तुजपुढें मति सेचराची ॥
आलों शरण्य तुजला रिपुतें जिणाया ।
तूं हूनि देसि तरि कोण नको ह्मणाया ! ॥ ७३
ज्यावें बहू ह्मणुनि प्राशिति आमृतातें ।
त्या आमृतेंच जन पावविले मृतातें ॥
कीं मायबाप वधिती निज बाळकाहो ।
त्यातें उपाय न दिसे क्षितिपाळका हो ॥ ७४
तैसें तुह्मीं मज दिल्या रिपुच्या करीं हो ।
संरक्षणा कवण तें मजला करी हो ॥
पाहे विचार शरणागत वोपितां जी ।
हा न्याय मान्य करि कैंवि जगत्पिता जी ॥ ७५
हें गोष्टि ऐकुनि जिवा न्यभिती अपत्यें ।
स्त्री गर्भिणी, तनु सजील, बहू अपत्यें ॥
आला असा कठिण काळ जिवास न्याया ।
तूं वर्तसी नृपति या परि नीतिन्याया ॥ ७६
आतां तुझ्याजवळि टाकिन हा स्वदेहो ।
त्यानंतरें रिपुकरीं ममदेह दे हो ॥
परंतु शत्रुकरपह्लवि होम राया ।
नेदींच हे तनु कदापि वधा कराया ॥ ७७

नृपेशा मनीं पातली धोर चिंता ।
समस्तां ह्मणे युक्ति यालागि चिंता ' ॥
' प्रिये युक्ति सांगे ' पुसे भूप तीतें ।
वधू सत्यवंती वदे भूपतीतें ॥ ७८

तुजें भक्ष्य देवोनिया प्राणनाथा ।
तया तृप्तवा वांचवा या अनाथा ॥
नृपें ऐकतां तोषला फार कांहीं ।
बहु मानली गोष्ट सर्वांदिकां ही ॥ ७९

ससाण्याप्रती शिबि राजा वदे तो ।
ह्मणेरे तुजें भक्ष्य घे मांस देतों ॥
असें ऐकतां तो ह्मणे दे प्रमाण ।
नृप घे ह्मणे भाक माझी प्रमाण ॥ ८०

मत्बोलण्या सशय मानिसी हो ।
धरी सत्य निश्चय मानसीं हो ॥
आधींच गा देहतां भक्ष्य तूतें ।
त्यानंतरें साधिन या क्रतूतें ॥ ८१
अशी भाक यें देउनी लोकनाथें ।
निगेपीं स्विरें ते क्षणी तो दुनाथें ॥
ह्मणे मोल देवोनिया मांसखडा ।
ससाण्यासि देवोनि हें विप्र सडा ॥ ८२
ससाणा नृपालागि सन्मानवाचे ।
ह्मणे पाहिजे मांस पैं मानवाचें ॥
असें ऐकतां गर्व धोग विचारीं ।
पडे, युक्ति तें मांदियानें विचारी ॥ ८३
मनीं ह्मणे अभिमानक्रभास्करातें ।
कालीच जो वधिपलें दूर तस्करातें ॥
ते आपुनी त्वरित तस्करदेह गया ।
तें मांस जी विहग सुक्षेम दे ह्मणया ॥ ८४
ससाणा ह्मणे ऐकिलीं मदिराचा ।
नृपा मी न घ नर्कगर्भ निवाचा ॥
नको चोर हेगादिकां दुर्मिदाचा ।
नको सर्वथा मलिया निजवाचा ॥ ८५




कोणी नरी तव गृहा अतिथे भिकारी ।
तोही परंतु मृत भक्ष्य न आंगिकारी ॥
मत्भक्ष घेउनि मला शवमांस देशा ।
तें केवि कीर्ति प्रगटे दश दिग्प्रदेशीं ॥
न घे मी शवाचें नृपा जाण साचें ।
मला मांस देगा जित्या माणसाचें ॥
असें ऐकतां लागली काळजी हो ।
नृपा सक्राचा गम काळ जी हो ॥ ८७
कसा दुउ मी दूसऱ्या प्राण दडा ।
मनीं पाहतां पाप तेंही उदडा ॥
असा राव चित्तांत चिंता वरा तो ।
ह्मण सक्रा कोण पे आवरातो ॥ ८८
विनता करा सत्यवती प्रिदेशा ।
ह्मणे मद्रूपमांस दे पे क्षुधेशा ॥
वदे आत्मज त्याग मी मांस देतों ।
असे ऐकता पाक्षि तेव्हां वदे तो ॥ ८९
असें देह ज्या बत्तिसा लक्षणी हो ।
तयाचे दिजे मांस पे ये क्षणीं हो ॥
नृपें ऐकता आत्मजा सांगता हे ।
ह्मणे मद्रूप् मांस तो मागतां हे ॥ ९०
नरेंद्रें तदा आणवाला तराजू ।
कपोता तय बैसवी लोक राजू ॥
करी खडग घेवोनि कापी स्वकाया ।
तुळेमाजि मांसासि घाली तुकाया ॥ ९१
तुला जोखितां मांस झालें अपूर्ण ।
कपोता दिसे आगळा भार पूर्ण ॥
असें देखतां मास थोडें तराजें ।
पुन्हां कापुनी घातलें शिबिराजें ॥ ९२
परी पक्षितो जाहला थोर भार ।
तया देखतां धाकला लोकभार ॥
बहु घोलती विप्र हें आक्रंदना ।
नृपा काय होईल की सें कल्पना ९३
जव अव नृप कापी मांस घाला तुकसी ।

तव तव विहगाचा भार तो आधिकेसी ॥
जन ह्मणति कसा हो पातला हा छळाया ।
जडपण धरुनीयां मांस घेतो तुलाया ॥ १४
तदा भूवरे निश्चयेच्या बळेसी ।
दडावा करी मास थाली तुळेसी ॥
जिथें देखिलें मांस रायें देहातें ।
त्वरें ते रथळीं मांस कापी स्वहातें ॥ १५
असें कापितां आत्म देहासि गाहो ।
दिसों लागल्या अस्थि मेंदू शिरा हो ॥
नये शद्व तो शस्त्र ही आवरेना ।
नृपाची अवस्था कृपा आवरेना ॥ १६
तरी तो कपोता तुळे भार घाली ।
हहा.कारशी लोकवाचा निघाली ॥
अहारे विधी काय झालें कपाळा ।
कशी हे विधी पातली लोकपाळा ॥ १७
सवत्र जन तदा हो राजयाच्या अकांतीं ।
रुदन करिति तेव्हां सर्वही लोक कांतीं ॥
ह्मणति नृपति धर्मे पाळिगो, विप्र, भूला ।
पुनरपि अह्मि कैसें देखुनीं या प्रभूला ॥ १८
नर नमिति कपोत्या वांदितो याचका हो ।
ह्मणति विहग गाथा गोष्टि पै आयका हो ॥
हलुपण धरुनी या तूलने घ्या समान ।
अह्मि जन तुमचे हो हाचि आह्मास मान ॥ १९

( अपूर्ण )

## ( १० ) सुदामचरित्र.

वंदूनिया प्रथम सद्गुरु वामनाला, । जो का दिसे स्थिरचरीं वरजा मनाला, ।
गाईन ते हरिकथा मग कौतुकानें, । जे वर्णिली नृपतिलार्गि, अजी, शुकानें ।॥१॥
त्यानंतरें वदितसें हरी तो, । जो भक्तदारिद्र्यपणा हरीतो; ।
स्मरोनिया नाम अनाम याचें । चरित्र गाईन सुदामयाचें. ॥ २ ॥
राजा ह्मणे श्रीशुकयोगियाला । " दे कृष्णमात्रा भवरोगिपाला. ।
जें दीधलें चूर्ण, अजी, बळाचें । तेणें हरे दु.ख महाबळाचें. ॥ ३ ॥

करूनी कृपा आणखी कृष्णलीला । वदाव्या, जगीं नाशिती ज्या कलीला;।।
अनंता कथा श्रीहरीच्या मला, हो, । अजी त्याचि देती महानंदलाहो.।। ४ ।।
सेवितां विषय कामकामना, । त्रास होउनि, विराग ये मना. ।
यत्कथा परिसतां श्रवणातें । वीट येइल जगीं कवणातें ?।। ५ ।।
वाचाचि ते सार्थक मानवाची। कथा हरीचीच अखंड वाची. ।
सेवा हरीचीच, अजी, करावा । निर्माण केलें हरिनें करां या. ।। ६ ।।
तेंचि कीं स्मरण होय मनासी । जें नसे स्थिरचरीं अविनाशी; ।
सत्कथाश्रवण हो श्रवणांला । ग्राम्य गीत रुचलें कवणाला? ।। ७ ।।
होय सार्थक तरीच मस्तकीं । विश्वरूप नमितां समस्त कीं. ।
पाविजे सफळता तरि दृष्टी, । कृष्णरूप जरि पाहिल सृष्टी. ।। ८ ।।
विष्णुभक्तपदपंकजवारी । सेवितां त्रिविधताप निवारी. ।
देह सांत करि नित्य मज्जना। मान्य तो सकळ लोकसज्जनां. " ।।९।।
वदोनी असें श्रीशुका विष्णुरातें । बहू प्रार्थिलें जोडुनीयां करातें. ।
वदे येधुनी श्रीशुकाचार्य वाचा, ।स्मरोनी हृदाब्जीं प्रभू माधवाचा.।।१०।।
ह्मणे शुकाचार्य परीक्षितीतें, । असे सुदामा द्विज तो क्षितीतें. ।
मग्न तो ब्राह्मण जाण साचा. । सखा हरीचा बहुता दिसांचा.।।११।।
पाहतां निजसुखें विषयांला । वाटतें परम, हो, विष याला.।
राहिला गृह करूनिच शांती।कोण त्यासि करि दुःख अशांती ! ।।१२।।
इंद्रियें सकळ जिंकुनि माना । वश्यता करि त्यजूनि कुमाना. ।
ध्यातसे हृदयिं देवदेव तो; । विघ्न त्यासि करि कोण देव तो ?।।१३।।
लाभीं यदृच्छा करि आश्रमाला; ।द्वंदीं नसे तो; न गणी श्रमांला; ।
ऐशी असे हो स्थिति त्या द्विजाची;। भार्येस त्याच्या परि खेद जांची.।।१४।।
उदासीनता देखुनी त्या पतीची।न खंडे कधीं प्रीति त्या, हो, सतीची. ।
सदा अन्नवस्त्राविना काळ जातो; करी खेद कांहीं तिच्या काळजा तो.।।१५।।
लेंकुरें क्षुधित अन्न मागती; । नागवींच कितियेक वागती; ।
जाचिती करुनि वेग तीव्रता; । याल(?)यास्तव करी पतिव्रता.।। १६ ।।
म्लानता करूनियां वचनाची, । टाकुनी सकळ लाज मनाची, ।
बोलते वचन एक पतीला, । लागला परम जो जप तीला. ।। १७ ।।
" सखा आमुचा द्वारकाधीश नांदे; । पति श्रीसतीचा; विभूती जनां दे; ।
कृपाळू धनें वाटितो विप्रलोकां; । त्वरें जाउनी पाय त्याचे विलोका.।। १८ ।।

शरण जो हरिच्या चरणाला, । अर्पुनी सफळ आचरणाला, ।
कृष्ण देइल तुझां धनराशी. । दैमर्में न गणुं त्या धनदासी. ॥ १९ ॥
पशी भोज जो वृद्ध कां यादवांचा, । प्रभू ईश तो कीं समस्तां जिवांचा, ।
असे त्या स्वकार्ली प्रभू द्वारकेसी, । वधूनि स्वहस्तें तृणावर्त केशी.॥२०॥
निःष्काम ध्याती पदपंकजाला । तेणें हरीला बहु भार जाला. ।
'नेवें धनातें' करि या पणातें, । तेव्हां तया दे हरि आपणातें. ॥२१॥
सकाम भक्ता न करीच वाणी. । बोलों किती ये विपर्यीच वाणी?" ।
प्रार्थूनि ऐशा वचनें द्विजा या । मैन्येंचि राहे मग विप्रजाया. ॥२२॥
ऐशी स्त्रियेची मृदु गोड वाचा । घेवोनि कानीं गाडे माधवाचा, ।
भावार्थ जाणोनि तिच्या मनाचा, । हा लाभ मानी हरिदर्शनाचा.॥२३॥
द्विज विचार करीं स्वमनाशीं; । मग मती धरितो गमनासी. ।
शब्द येकचि सतीस वदे तो, । "जो असे घरिं पदार्थचि दे तो.॥२४॥
भेटों नये यास करें रिकामे, । हा जाण मुख्यार्थ असे, सकामे. ।
नामें जयाचेचि अपाय नाशी । दे त्यासि कांहीं स्वउपायनासी." ॥२५॥
भिक्षार्थ तेव्हां मग ते निघाली. । पोहे विशेषें जन तीस घाली. ।
बांधोनि वस्त्रें मग तीव्रतेनें । दिले पतीलागिं पतिव्रतेनें. ॥ २६ ॥
घेऊनि चाले मग त्याचि वाटे; । द्वारावती ज्यास समीप वाटे. ।
होईल कैसें हरिदर्शनातें ? । चिंता तया हेचि असे मनातें. ॥ २७ ॥
पुढें देखिली तिस्थळी. सैन्य वाटे, । भयत्रास ज्याचा अभक्तांस वाटे. ।
भयाचा जगीं माधवा हेतु केला, । तया लंघुनी विप्र द्वारास गेला. ॥२८॥
द्वारीं अपारीं गण यादवांचे । बैसोनि गाती गुण माधवाचे. ।
सोळा सहस्रा युवती जनांचीं । घरें विचित्रें, बहु सज्जनांचीं. ॥ २९ ॥
त्यामाजि ते येक घरीं द्विजाला । प्रवेशतां सौख्यसुकाळ जाला. ।
विप्रें हरीला मग देखियेलें, । जें रूप चित्तीं, अजि, रेखियेलें. ॥३०॥
पलंगावरी रुक्मिणीच्या विराजे, । जया वर्णिती सर्वही देव, राजे; ।
जसें देखिलें ब्राह्मणा त्या दुरूनी । उडी टाकिली श्रीपलंगावरूनी. ॥३१॥
नमस्कारुनी भेटला त्या द्विजाला. । तमे भेटिचा थोर आनंद जाला; ।
स्रवे लोचनीं प्रेमसंयुक्त पाणी, । असा प्रीतिनें हर्षला चक्रपाणी. ॥३२॥
तयानंतरें त्या द्विजा देवदेवें । पलंगावरी बैसवीलें सुदैवें. ।
स्वयें घेउनी श्रीकरें पात्र पाणी । तयाचीं पदें धूतसे अब्जपाणी. ॥३३॥

स्वपादोदकें जो महापाप वारी, । स्वयें तो धरी विप्रपादाब्जवारी. ।
करी कर्म तो, लोक तैसें करीती; । ह्मणोनी हरी दाखवी लोकरीती. ॥३४॥
अगरुचंदनवासित चांगलें । परिमळें अति केसर रंगलें, ।
निज करें मग लावितसे हरी, । त्रिविधतापहि जो स्मरणें हरी.॥३५॥
घेऊनियां सुरसुवासित दीप हातीं, । तो दावितां द्विजवरा, स्ववधू पहाती. ।
ज्योतिःप्रकाशक जरी रविभा वदावी, । तो श्रीहरी मग तयाप्रति दीप दावी.॥३६॥
होता स्वभावें द्विज तो भुकेला; । पंचामृतें तो मग तृप्त केला. ।
तांबूल, गोदान तया निवेदी. । पूजा करी तो विधि जोच वेदीं.॥३७॥
करूनि पूजा बहुतोपचारीं, । तयावरी स्वागत हो विचारी. ।
ह्मणे हरी, हो, मग त्या द्विजाला, । 'अपूर्व तूझा मज योग जाला.'॥३८॥
वस्त्रें जुनीं पाघुरली द्विजाती, । जीं धूतल्याही मळही न जाती. ।
ढाळीतसे रुक्मिणि चामरातें. । आश्चर्य तेव्हां सकलामरातें. ॥ ३९ ॥
सोळा सहस्रा हरिच्या स्वजाया । पाह्यासि येती सकला द्विजा या. ।
तो कृष्ण सेवा करितो स्वहातीं, । आश्चर्य हें कृष्णवधू पहाती. ॥४०॥
स्त्रिया बोलती एकमेकांस वाचा, । बहू दीन पां हा सखा माधवाचा, ।
नसे वस्त्र आंगावरी पांघराया, । सभा जिंकिली येउनीयां घराया. ॥४१॥
वस्त्रहीन, अवधूत, भिकारी, । श्री नसे, परम देह विकारी, ।
फार पुण्य घडलें अधमाला, । वंद्य विप्र तरि नीलतमाला. ॥ ४२ ॥
त्रिलोकीं गुरु स्वामि हा श्रीनिवास; । तया मान्य हा होतसे हीनवास. ।
रमा टाकुनी श्रीपलंगीं द्विजाला । पहा सेवितो, जेंवि, गे, अग्रजाला.॥४३॥
गुरूचे घरीं ब्राह्मणा युक्त देवा। शिके ब्रह्मविद्या, पहा, वासुदेवा. ।
कथा तेथिल्या आठवूनी हरी तो । स्मृती दे द्विजा; विस्मृतीतें हरीतो.॥४४॥
स्मरोनि कथा मग तेथिल्या, हो, । परस्परें ते भजि घेति लाहो. ।
करांवरी ते कर वाजवीती; । सुखें गुरूचें यश गाजवीती. ॥ ४५ ॥
बोले हरी द्विजवरा मग तो स्ववाणी. । "विद्या दिली गुरुवरें न करूनि घाणी. ।
पूजूनि अर्पुनि तया गुरुदक्षणेला । आलों असें करुनि आजि प्रदक्षणेला. ॥४६॥
त्यानंतरें तों द्विजकन्यकेला । पाहोनि, मित्रा, स्वविवाह केला; ।
कीं, ब्रह्मचर्या निजआश्रमाला । तूं चालवीशी, नसतां श्रमाला? ॥४७॥
मी जाणतों तुज जगीं धनकाम नाहीं; । पुत्रस्त्रियासदन तों न रुचे मनाही; ।
प्रारब्धभोगहरणार्थ विवाह केला; । दारासुतगृहधनां नससी भुकेला. ॥४८॥

कर्मे तूं करिशि; कामकामना, । वासना नसतसे तुझिया मना; ।
मी जसा त्यजुनि गुणआग्रहा । कर्म सर्व करितों, जनसंग्रहा. ॥४९॥
गुरुकुळीं वसतां बहुनी श्रमें, । तुज मला घडलीं प्रथमाश्रमें. ।
स्मरशि कीं गुरुच्या चरणासी, । वश नहोनि जननामरणासी ?॥५०॥
प्रकटला हृदयीं गुरुराज तो, । म्हणुनि मानवजन्म विराजतो; ।
गुरुविना निज मानवदेह । जन कसा जगिं मान वदे हा. ॥ ५१ ॥
करूनी कृपा दीधली ब्रह्मविद्या, । त्वरें नाशिली आमुची ते अविद्या, ।
सदा सर्वदा त्या गुरूतें स्मरावें. । स्मरेना गुरू तैं कसें हो तरावें ! ॥५२॥
देह मी, प्रथम वाटत होतें । वारिलें गुरुवरेंचि, अहो, तें; ।
जेथुनी परतली मनवाचा । तेथ भेद धरिला स्वजिवाचा. ॥ ५३ ॥
निरसुनि गुरुरायें, सद्विवेकें, मीपणातें, । मिळवुनि निजसौख्या आपुल्या आपणातें, ।
विफळ मृगजळातें चित्त हेतें भुकेलें, । सकळ मग गुरूनें सच्चिदानंद केलें. ॥५४॥
लागतांचि गुरुहस्तक मस्तकीं । विश्वरूप मग तेंचि समस्त कीं ।
आपणांत जग, हें मज वाटे. । लाविलें गुरुवरें निज वाटे. ॥ ५५ ॥
तरंगीं स्फुरे जे रिती सिंधुपाणी, । जगीं ते रिती पाहतां चक्रपाणी. ।
अळंकार होती जसे सर्व हेमीं, । स्वरूपीं तसें पाहतों सर्व हें मी. ॥५६॥
गुरू मुख्य तीन्ही जगीं मानवांचे. । तयांचें तुतें सांगतों मान वाचे. ।
जयाचे स्वपोटीं सुता जन्म होतो, । पिता तो गुरू, जाण आधीं, अहो, तो. ॥५७॥
पूज्य तो निज पिता गुरु आधीं । सेविल्या हरति सर्वहि आधी. ।
मानिजे जगिं निरंतर त्यातें. । पापनाश न नितां स्वपित्यातें. ॥ ५८ ॥
गुरू दूसरा, वेदमाता त्रिवेदी. । तयाचे कृपें अर्हता होय वेदीं. ।
क्रियाकर्म चाले द्विजां जन्मभावें. । पित्याहूनिही पूजिजे त्या स्वभावें. ॥५९॥
गुरू तीसरा, तो स्वहूं आश्रमांला । निजज्ञान देऊनि नाशी श्रमाला. ।
तया जाणतां मी जसा तो तसा, रे, । जया आरतें, तो गुरू भ्रांतसा रे. ॥६०॥
असोनि वर्णाश्रमिं हो द्विजाती । गुरूविणें मृत्युपथासि जाती. ।
सर्वज्ञ ते तों नव्हती कदापी, । म्हणोनि त्यांतें मग काळ दापी. ॥६१॥
वर्णाश्रमीं विहित आदर मानसाचा, । कणीं गुरू वदतसे स्वसमान साचा, ।
ध्याती सदा गुरुवरा मज केशवाला, । प्राणप्रयाणसमयीं त्यजितां शवाला. ॥६२॥
गुरूच्या प्रसादें प्रपंचार्णवासी । उलंघूनि , होती स्ववैकुंठवासी. ।
सुखें पावती मुक्ति सायुज्यतेची. । न बोलें बहू. मोक्ष त्यांला जितांची. ॥ ६३ ॥

गुरू तो हरी मानुनी ऐक्य रीती, । यथाशक्तिनें स्वामिसेवा करीती. ।
गुरूसेवनीं मीं जसा तृप्त होतों । तसा अन्य योगें नव्हें मी, अहो, तो. ॥ ६४ ॥
पडे देह तों आचरे ब्रह्मचर्या, । समर्पी; मला आपुली कर्मचर्या; ।
नव्हें तृप्त अत्यंत मी या प्रकारें, । जसा होतसें स्वामिसेवानुकारें. ॥ ६५ ॥
गृहस्थाश्रमी जाउनीयां प्रयागा । करी मज्जनें, तर्पणें, सोमयागा; ।
नव्हें तृप्त अत्यंत मी या प्रकारें, । जसा होतसें स्वामिसेवानुकारें. ॥ ६६ ॥
वनस्थाश्रमी आचरे, हो, तपाला । वनामाजि भक्षूनियां वात, पाला; ।
नव्हें तृप्त अत्यंत मी या प्रकारें, जसा होतसें स्वामिसेवानुकारें. ॥ ६७ ॥
यतीधर्म चाले चतुर्थाश्रमीं, हो, । त्यजीती प्रपंचा न होती श्रमी, हो. ।
नव्हें तृप्त अत्यंत मी या प्रकारें, । जसा होतसें स्वामिसेवानुकारें. ॥ ६८ ॥
घडे स्वल्प सेवा गुरूची मला, हो, । बहू सेवनीं घेतला तोचि लाहो. ।
गुरूकामिनी पाठवी इंधनाला. । स्मरेनाच तें दृश्य तुझ्या मनाला. ॥ ६९ ॥
गेलों तुला घेउनियां वनाला, । तों देव वर्षे बहु जीवनाला ।
अकाळवृष्टी; पडताति गारा; । गर्जे नभीं मेघ, जसा नगारा. ॥७०॥
स्फुरोनी पडे चालतां वीज, वाटे, । भय त्रास जीचा अकस्मात वाटे. ।
शरीरास लागे अती शीत वारा. । न कोठें मिळे त्या वनींही निवारा. ॥ ७१ ॥
अशामाजि गेला रवी अस्तमाना. । तमें सर्व जाल्या दिशा त्या समाना ।
वनीं उंचनीच भरे मेघवारी. । बुडे त्या जळीं कोण कोणा निवारी?॥७२॥
धरूनी तुझा हस्त म्यां, हो, करानीं । तमें व्यापितां त्या जळामाजि रानीं ।
दिशा नेणता लागलों कीं फिराया । बहू आप्त होऊनिया विप्रराया. ॥ ७३ ॥
गुरू वाट पाहे गृहीं अस्तमानीं. । न देखोनि आह्मां बहू खेद मानी; ।
म्हणे, 'शिष्य माझे वना आजि जाया, । तयां हेतु जाला, पहा, हे स्वजाया ! ॥७४॥
गृहीं कृष्ण टाकूनि गेलीं फिराया, । म्हणोनी वना धाडिलें गोपिराया; ।
अहो, तोच मी राहतों येकवाटीं, । कशी पाठवीती वना हे तिवाटी ! ॥७५॥
जो शिष्य, वाटे गुरु आपला तो. । जो पुत्र, आत्मत्वपणें मला तो. ।
न भेटि होतां अजि त्या गुरूची । स्त्रीसंगतीची मज कोण रूची ? ॥ ७६ ॥
म्यां इला हरिविषीं वरजावें. । शोधनार्थ वनिं म्यां वर जावें. ।
भेटतां हरि मला, वरजाया । योग्य होइल कशी वर जाया ?' ॥ ७७॥
वदोनि ऐसें मग भूसुरानें, । रानें पहायासि निघे धिरानें. ।
तों शभ्र पूर्वेस दिसे रवी तो; । नीतो प्रभा त्या जगिं दाखवीतो. ॥ ७८ ॥

पावला द्विज समीप वनातें. । सुटलें बळ बहू पवनातें. ।
वाग मेघ वरिच्यावरि वारी, । शोषुनी वनि अशेषहि वारी. ॥ ७९ ॥
पुढें चालता पाहता जीवनासी । गुरू लक्षिती, हो, जगज्जीवनासी ।
धरुनि स्वहस्तें सुदाम्यास हातीं। हरी येतसे, तो गुरूही पहाती. ॥ ८० ॥
देखताचि हरि त्या गुरराया । धावला त्वरित पाय धराया. ।
पोटिदीं गुरु धरुनि हरी तो, । शिष्यशोकभयमृत्यु हरीतो. ॥ ८१ ॥

म्हणे श्रीआचार्या ' बहुत श्रमलासी यदुपती
नसे पायीं काही, दगड वनिंचे फार खुपती. ।
शरीरीं या तुझ्या अति कठिण पर्जन्यधडसा
वनीं जाला, तेव्हा कारण परि वाचेल धडसा ॥ ८२ ॥
समस्ता हे काया प्रियतम गमे, हो, परम ते.
निजात्मत्वें येथे न कळत सदा बुद्धि रमते. ।
कळोनीया स्वात्मा, निजतनु तुझी मत्पर जनीं.
गुरुसेवेनें या वनि हरि रि अज्ञानरजनी. ॥ ८३ ॥
असा सेवाना की गुरु नरवरें निष्कपट तो,
स्फुरे सच्चित्तनु, जड परिहरे अंलपट तो. ।
स्वभावें सेवावें गुरुसि, जरि देहार्पण घडे,
तया मोक्षाचें तें मनन नसता द्वार उघडे. ॥ ८४ ॥

सेवेंकरूनि तुमच्या बहु तुष्टलों मी. । रोमांच, देहपुलकांचित, स्पष्ट रोमीं. ।
साफल्य मूर्तचि घडो स्वमनोरथाचें.।मारी अरी धरुनि चक्र, अजी, रथाचें.॥८५॥
वेद म्या शिकविले तुज चारी, । अर्थ त्यात स्वरूपविचारीं. ।
पाठिस्मृति नसो निगमातें. । मान्यता त्रिजगिं हो अगमातें.॥ ८६ ॥
बहु तुम्ही मजसिवीं श्रमला, हो. । सकळ मोक्ष तुमचाश्रम लाहो.'।
वचन ये रिति वदे गुरराणा, । विदित जो सकळ वेदपुराणा॥ ८७ ॥

सुदाम्यानें प्रीती हरि करित वार्ता स्ववदनीं.
म्हणे, ऐशीं कर्मे बहुत घडलीं स्वामिसदनीं. ।
गुरूच्या वाक्यानें परम घडते शान्ति मनुजा;
चिदानंदीं पावे सहज जन मोक्षासि अनुजा. " ॥ ८८ ॥
हरीची हे वाणी परिसुनि, सुदामा द्विजपती
म्हणे. " मोक्षामार्गी सकळहि तुतें लोक जपती. ।

'स्वयें होशी पूर्ण, प्रकट करिशी गुह्य गुरुचे,
तुझ्या देखों वेखीं नरगुरुवरीं सेवन रुचे. ॥ ८९ ॥
जगाचा गुरू तूं स्वयें; वास देवा
समस्ता सुरामाजि, जो, वासुदेवा. ।
त्रिलोकात या तूंचि नानावतारी.
॥ तुझें हें समस्ता जनां नाव तारी. ॥ ९० ॥
न पावे, पैं कृष्णा, गुरुविण कदापी निजकळे,
गुरूच्या वाक्याने विहित मज आत्मा निज कळे. ।
न होशी तू तैसा, निसर तुज कैंचा निजपणीं ?
अखंडत्वें आत्मस्फुरण तुज; आम्हासि जपणी. ॥ ९१ ॥
स्वयें ब्रह्म, तूझी निजानंद काया; । तया राहणें ब्रह्मविद्या शिकाया ॥
गुरूच्या गृहीं, हेंचि आश्चर्य वाटे; । जना दाविलोसी स्वयें मोक्ष वाटे. ॥ ९२ ॥
बोले हरीप्रति असें बहु विप्रराणा,
पोहे न अर्पण करी पुरुषा, पुराणा. ।
थोडे म्हणोनि मनिं फारचि लाजिला, हो,
अर्पूनि अल्प हरिलागिं न घे स्वलाहो. ॥ ९३ ॥
सर्वज्ञ त्याच्या मनिंचें हरीतो, । जाणे स्वभक्तार्पण जो, हरी तो. ।
पाहोनि, हासे, मुख ब्राह्मणाचे, । देखोनि खाजें पदरीं कणाचें. ॥ ९४ ॥
ब्राह्मण्य देव, हरि आपण देवदेव;
'हासोनियां द्विजवरासि करी सदैव. ।
प्रेमेंकरूनि करि त्यासि निरीक्षणातें,
देणार भाग्य हरि जो, न लवी क्षणातें. ॥ ९५ ॥
स्वयें बोलतो ब्राह्मणालागिं वाचा, ।
म्हणे, ' मी सखा, आप्त तूझ्या जिवाचा, ।
म्हणोनी दिला भेटिचा आजि लाहो, ।
तुवा आणिला काय मेवा मला हो ? ॥ ९६ ॥
थोडेंचि मातें बहु फार होतें । भक्ता जनाचें मजला, अहो, तें. ।
भक्तीविना अर्पण मेरु केला, । त्याचा नसे, हो, कार्धि मी भुकेला. ॥ ९७ ॥
पत्र, पुष्प, फळ आणिक पाणी, । भक्तिनें दिधलिया मज पाणी,
स्वल्पही निजसुखेंचि भक्षितों । तृप्तता परम त्यांत लक्षितों. ॥ ९८ ॥

श्रीकांत ऐशीं वचनें वदे तो, । तन्ही सुदामा पृथुका न देतो. ।
शंकोनिया मानचि खालिं घाली, । लज्जा जयाचे हृदयीं निघाली. ॥ ९९ ॥

जाणे हरी द्विजमनांतिल सर्वद्रष्टा, ।
निर्माण जो करि जगीं नसत्या अदृष्टा. ।
नाहींच केवळ मनीं धनकाम याला, ।
स्त्री पाठवी मनिं धरूनि सुदामयाला. ॥ १०० ॥
दारिद्र्यें बहू पीडिली सारसाक्षी ।
म्हणे, ' नांदतो कृष्ण संसारसाक्षी, ।
त्वरें जाउनी भेटिजे त्यास आधीं, ।
हरी भेटल्या नासती सर्व व्याधी. ' ॥ १ ॥

तिचा भाव वेऊनिया द्वारकेला. । स्वयें द्रव्यकामीं नसे हा भुकेला, ।
तथापी पहा दुर्लभा संपदा मी । वरीं देउनी तृप्त कर्ता सुदामीं. ॥ २ ॥
चिंतुनी मनिं असें, अहो, हरी । वस्त्र विप्रकरिंचें स्वयें हरी. ।
ग्रंथि ते त्वरित माधव सोडी, । तोडुनी प्रकृतिबंधन सोडी. ॥ ३ ॥
काय हें म्हणुनि कृष्ण विचारी, । मुष्टि ते पृथुक हे मग चारी ।
देखुनी, हरि ह्मणे, ' भला भला । भक्तिचा परम लाभ लाभला. ' ॥ ४ ॥

पोहे तुझे मज सख्या बहु गोड भारी, ।
येणेंचि तृप्त जगिं मी मधुकैटभारी. ।
घे मुष्टि एक, दुसरींसाहि हात घाली, ।
तो रुक्मिणी हरिकरांसि धरू निघाली. ॥ ५ ॥
धरुनि कर कराग्रें बोलते श्री प्रभूतें, ।
' पृथुककण मुखाग्रीं घालितां, सर्व भूतें ।
मजसहित सुदाम्या सेविती सर्व लोकीं ।
विभव करण नोहे ग्राममात्रें विलोकीं. ॥ ६ ॥

पावला द्विज, पहा, तुझी सरी, । आझुनी हरिसि मुष्टि दूसरी. ।
मी तुझी परम पाददासिका, । अर्पिशी मज तरी परासि का ? ॥ ७ ॥

श्रीरुक्मिणीच्या परिसूनि भाषा, । पुरे करी श्रीपृथुक स्वभाषा. ।
स्नानतर सारिति भोजनातें । घेऊनि पंक्ती बहुता जनातें. ॥ ८ ॥
भोजनापरि किती रस नाना । प्राशिले, जर ह्मणे रसना ना. ।
स्वर्गिच्यापरि असें सुख मानी । बैसुनी हरि गृहांत विमानीं. ॥ ९ ॥

सुखें या क्रमूनी निशा याम चारी, । प्रभातें हरीतें सुदामा विचारी, ।
म्हणे, 'देइं आज्ञा मला आजि जाया, । घरीं येकटी वाट पाहे स्वजाया.' ॥१०॥
विश्वकल्पक विशाळ मंदिरा । कल्पुनी, वसवि तेथ इंदिरा. ।
नाम ठेवुनि पुरीस तयाचें, । भाग्य दे परम जें हित याचें. ॥ ११ ॥
जो जयासि विधि हा तंव देतो, । त्या द्विजाप्रति हरी न वदे तो, ।
दान कीर्ति अपणें न वदावी, । भाव हा हरि जनाप्रति दावी. ॥ १२ ॥
कृष्णजी म्हणति, 'भक्तसत्तमा, । तूं मला प्रियवद् द्विजोत्तमा. ।
मित्र तो तुजसमान असेना, । पाहतां जन्हि चराचरसेना. ॥ १३ ॥
भेटुनी मज सनाथचि केलें, । तृप्त होति जगिं जेंवि भुकेले. ॥
स्नेहभंग न घडो, सुखराशी. । जाय सत्वर, सख्या, स्वगृहासी. ॥ १४ ॥
न दे श्रीहरी विप्रवर्या धनासी. । न मागे, न तोही करी शोधनासी, ॥
सलज्जेकरूनी निघाला घरासी । हरीदर्शनीं नासुनी पापराशी. ॥ १५ ॥
द्वारावती सोडुनि ये स्ववाटे. । आश्चर्य ह्यातें बहु थोर वाटे. ॥
मार्गीं विचारी मग तो मनाशीं, । निंदूनि चित्तीं धनकामनासी. ॥१६॥
आश्चर्य हें मज गमे बहु कीं मनातें, ।
ब्राह्मण्य देव करि पूर्णहि कामनातें, ॥
तो श्रीहरी मज अगासि न दे धनातें, ।
प्रारब्ध थोर. किति, हो, करुं साधनातें ? ॥ १७ ॥
चक्रलिखित जरि नसे मजला हें । म्हणुनियां हरि न तें धन लाहें; ॥
मज जसें नयनीं हरि पाहे, । तदनुरूप करि थोर कृपा हे. ॥ १८ ॥
मंचकीं स्वजुनियां निज पद्मा, । लागला त्वरित या पदपद्मा, ॥
प्रेमयुक्त नयनीं जळ वाहे, । गोष्टि थोर गमतेचि जिवा हे. ॥ १९ ॥
दरिद्री मी कोठें.? यदुपति रमेचा निजपती ।
मला आलिंगीतो, सुरवर जया नित्य जपती, ।
गुरूबंधू मानी, बसवुनि पलंगीं निज करें ।
पद प्रक्षाळूनी, पदजळ शिरीं ठेवि निकरें. ॥ २० ॥
रुक्मिणी करिं धरूनि चामरा । ढाळिलें मज अखंड पामरा. ।
विंजितां मजवरी व्यजनातें । मी दिसें सकळ सेव्य जनातें. ॥ २१ ॥
निज विमल पलंगीं श्रीहरी, देवदेव, । परम विनयतेनें, आदरें, वासुदेव ।
करि करकमलानें पादसंवाहनासी, । अकळ सकळ जो कीं हंससंवाहनासी. ॥ २२ ॥

हरीच्या पदा सेवितां सर्व सिद्धी, । जगीं याचि स्वर्गापवर्गे प्रसिद्धी, ।
तयानें, पहा, सेविलें या पदासी । करूनी रमा सादरें जेवि दासी. ॥ २३ ॥
परि नसे मजलागुनि तो निधी । मज गमे हरि तो करुणानिधी. ।
धनमदें प्रभुला द्विज नाठवी, । म्हणुनि रिक्तकरें मज पाठवी. ॥ २४ ॥
ये रिती द्विज करी मननातें, । अर्पुनी हरिपदीं धननातें. ।
पावला निज समीप पुरीतें । पाहिलें तत्र घरा उपरीतें. ॥ २५ ॥
रवीचंद्रतेजें रवी ही विमानें । पुरी वेष्टुनी साग एका क्रमानें. ॥
विचित्रें वनें, पुष्पितें, दिव्य भारी. । फळें नम्र जेथें बहू वृक्ष भारीं. ॥ २६ ॥
वनामाजि पक्षी बहूसाल जाती, । स्वरें मंजुळें तोषवीती द्विजाती. ॥
रमे लक्ष्मणा पक्षिणी सारसासीं । द्विजा दावुनीया रतीच्या रसासी ॥२७॥
रमत हंस मदें वरटा, हे, । शिखिमुखीं उठती वर टाहो, ॥
बहुत नाचति राजस मोरें, । मृगसत्या रमताति समोरें. ॥ २८ ॥
पतिसवें रमती वरटा किती, । विरहिणी अपुली उर टाकिती, ।
रमति त्या पतितें मग खंजना, । नयनिं दिव्य नसोनिहि अंजना. ॥ २९ ॥
मद शीतळ सुगंधित वारे । स्पर्शतां, त्रिविध ताप निवारे. ।
पुष्पितें उपवनें बकुळाचीं । पंक्ति त्यावरि घनालिकुळाची. ॥ १३० ॥
सरोवरें निर्मळ अंबु ज्याचें, । तयामध्यें कानन अंबुजाचें, ।
जयावरी षट्पद सर्व काळीं । रातोफळें तीं विमताति काळीं. ॥ ३१ ॥
रसाळद्रुमीं कोकिळा गाय, नाचे । घनी ऊठती थोर त्या गायनाचे. ।
प्रसूता बहू तेथ कर्पूर केळी. । करीती स्त्रिया कांत देखोनि केली. ॥ ३२ ॥
अळंकारयुक्ता स्त्रिया हो अपारा । पतीयुक्त येती वनीं त्या दुपारा. ।
करें शिंपिती येकमेकां जळातें, । मृगाक्षीस नेत्रीं तुरे कानळातें. ॥ ३३ ॥
द्विजें ये रिती देखुनीयां वनासी, । विचारी बरें आपुल्या तो मनासी. ।
असें स्थान हें कोण त्याचें कळेना, । भ्रमें काय मार्गें मग आकळेना ? ॥ ३४ ॥
विचारी असें विप्र तो जो मनाशीं, । अगा[illegible] से लोक येती जनासी. ।
दिसे दीप्ति त्याचीच देवासमान. । सुदाम्यास देती बहूसाउ मान. ॥ ३५ ॥
वस्त्रें अळंकार अनेक रीतीं । देऊनि विप्रा, स्तवनें करीती. ।
वेगें सुदामा मग दिव्य यानें । वाये पथीं वाजनि, दिव्य यानें. ॥ ३६ ॥
गायनें करिति गायक नाना, । संगीतासन्वित राग तनाना. ।
भाट गर्जति पुढें विरुदामी. । वारिताति चवरें निज दासी. ॥ ३७ ॥

समुदाय घेऊनियां तेथ रंभा । करी सांग नृत्यासि तेथें आरंभा. ।
स्वरें वाजवीती मृदंगादि वीणा, । पुढें नाचती गायनीं ज्या प्रवीणा. ॥ ३८ ॥
बहू भात्र दावीतसे ते करांचे, । अलंकार लेऊनि चामीकराचे ।
गळां घालुनी उर्वशी दिव्य हारा । करीते पुढें सांग नृत्या विहारा. ॥ ३९ ॥
पुरामाजि ते आणिती या रितीनें । असें आइकीलें घरीं त्या सतीनें. ।
वहूसाल हर्षोनियां विप्रजाया । स्वयें सिद्ध जाली पुढें त्यास जाया. ॥ १४० ॥
सखी येउनीया अलंकार घाली, । रमेच्या परी सुंदरी ते निघाली. ।
वहूसाल सेवा करीताति दासी, । कितीयेक, हो, लागती श्रीपदासी. ॥ ४१ ॥
करुनि चालतसे बहु तीव्रता । पतिनिमित्य पथीं सुपतिव्रता. ।
पतिस देखियलें नयनांबुजीं, । अति सुखें मग ये नयनांबु जी. ॥ ४२ ॥
प्रेमयुक्त भरला तिचा गळा, । शब्द एकहि निघे न वेगळा. ।
कांत हा म्हणुनि जाणवी मना । तृप्त जो करि समस्त कामना. ॥ ४३ ॥
देखिली द्विजवरें मग दारा, । लेइली नग अपार उदारा. ।
दासिका, पदकभूषणें गळां, । सेविताति सकळा सुमंगळा. ॥ ४४ ॥
गमे ती सुदाम्यास कीं देवदारा, । जिचा गंध वारीतसे देवदारा, ।
पहायासि येती जिला देवदारा, । अशी मानवी होय भूदेवदारा. ॥ ४५ ॥
कामिनी द्विजवरा समा गमे. । चालिला मग तिच्या समागमें. ।
पावला त्वरित विप्र मंदिरा, । राहिली सतत जेथ इंदिरा. ॥ ४६ ॥
पाहिलें द्विजवरें घराकडे, । दीप्ति थोर दिसते चहूंकडे. ।
स्थान हें द्विज म्हणे अमरांचें । कश्यपा अदितिच्या कुमरांचें. ॥ ४७ ॥
बहुत मरगजाचे स्तंभ ते दिव्य भारी, ।
जडित नवहि रत्नें दीप्ति त्यांची उभारी. ॥
किमपिहि मनुजाला नाकळे जे धरा तीं ।
जडित दिनमणी ते रातिचे हो अराती. ॥ ४८ ॥
जडित बहु पलंगीं दीप्ति चामीकराची, ।
मृदु तदुपरि शय्या शुभ्र चंद्राकराची, ॥
दुहित समयिं पात्रीं फेण जैसा दुधाचा ।
मृदुतर अति शुभ्र उंच वाटे सुधाचा. ॥ ४९ ॥
हेमदंडजटित व्यजनांचे । वारिताति कर दिव्य जनांचे. ।
रत्नदंड जडिले चवरांला । वारिती सकळ भृङ्गमराला. ॥ १५० ॥

वितान दावी वरि शुभ्रकाला । नसे प्रभा ते, अजि, अभ्रकाला. ।
सद्गुणमुक्ताफळ, हो, वितानीं । वितानचंद्रा गमताति तानी. ॥ ९१ ॥
विनाश्रा मृदू चित्रिता रेशिमानें । तळीं घातल्या, साग एक्या क्रमानें. ।
हिरे थोर पायावरी, हो, सुवर्णी । फुल्या मध्यभागीं; तया कोण वर्णी ? ॥ ९२॥

स्फटिकजडित भिंती शोभती दिव्य भारी, ।
मरकत बहु मध्ये दीप्ति त्याची उभारी. ॥
तदुपरि पुतळ्या त्या रत्नदीपास हातीं ।
धरिति, सकळ शोभा त्याचि तेजे पहाती. ॥ ९३ ॥

होतों दरिद्री बहुता दिसांचा, । तो पावलों वैभवकामसाचा. ।
भाग्यास या हेतु हरीविनाही । समर्थ कोणी दिसणार नाहीं. ॥ ९४ ॥
अशा वैभवाला सुदामा विलोकी; । म्हणे हें नसे अन्य कोणा, त्रिलोकीं. ।
कसें काय झालें मला हें कळेना. । विचारी मनीं, हेतुही आकळेना.॥ ९५ ॥
कृपादृष्टिनें पाहुनीया हरी तो । स्वभक्ता जनाच्या दरिद्रा हरी तो. ।
घरीं भाग्य दे, जें न इंद्रादिकाला. । न बोले तथापि स्वयें याचकाला. ॥ ९६ ॥
न बोलोनि यें बहू मेघ पाणी, । असें भाग्य देतो जगीं चक्रपाणी. ।
स्वभक्ता जनाचें दिलें हे अल्प खानो, । असा यादवीं कृष्ण, माझा सखा तो. ॥९७॥
जया अर्पिलीं भक्त थोडें अमानी, । तयाचें हरी तो बहूसाळ मानी. ।
स्वयें न श्रमे भाग्य देता जनाला, । असें वाटतें श्रीहरीच्या मनाला. ॥ ९८ ॥

मुठीभरी त्या पृथुकास नेमीं. । ते भक्षुनी, हें मग भाग्य नेमी. ।
मैत्री हरीची मज जन्मजन्मीं । घडो, म्हणोनी म्हणतो द्विजन्मी. ॥९९॥
पूर्ण बोध नसता स्वजनासी । देइना हरि तयास धनासी, ।
भोग ते करिति देउनिया धना. । नाठवे मग तयास साधना. ॥१६०॥

मनीं ये रिती तो सुदामा विचारी. । हरीभक्तिनें घालुनी दीस चारी. ।
क्रियायुक्त भोगी महावैभवाला. । नव्हे सक्त अयत, नाशी भवाला. ॥ ६१ ॥
स्वयें भक्त तो श्रीहरी, देवदेव, । दयाळू, अशा ब्राह्मणीं वासुदेव. ।
तयावाचुनी कोण भूदेव पूजी ? । सखा ब्राह्मणा, तोचि दैत्या रिपू, जी. ॥६२॥
स्वभक्ता जनाच्या हरी आपदाला. । द्विजें ये रितीं जाणुनी सौहृदाला, ।
करी ध्यान त्याचें सदा सर्वदा, हो । हरूनी मनातील कामाग्निदाहो. ॥ ६३ ॥
आर्जवें हो हरिभक्तहि जिंकिती. । तरति हा भवासिंधु असे किती. ।
द्विज मनीं मननादिक हो करी । श्रवणभक्तिस घेउनियां करीं ॥ ६४ ॥

प्रसादें हरीच्या भवग्रंथि सोडी. । जदी देखुनी आत्मतंतृप्ति सोडी. ।
अतां सत्वरें मोक्ष त्यालागिं जाला, । महा अग्नि तापत्रयाचा निवाला. ॥ ६५ ॥
हरी पाहता आपण देवदेव । अशाला, महापूज्य हे भूमिदेव. ।
अशी ये रितीची असे हे कथा, रे, । तरे लोक येथे जरी चित्त थारे. ॥ ६६ ॥
शुक म्हणे, ' परिसें सुपरीक्षिती । श्रवण हें करुनी जन रक्षिती, ।
तरति ते जन सर्वहि हा कली । श्रवणभक्ति पुरे तुज एकली. ॥ ६७ ॥

श्रीमद्भागवतीं नृपाप्रति बरें हें बोलिले कीं मुनी, ।
भक्तीवांचुनि मोक्ष साध्य न घडे, हें स्थापिलें नेमुनी. ।
त्याची हे पदपद्यकाव्यरचना टीका करी कौतुकें ।
वापूवामन सादरें हरिपदीं अर्पी गिराभातुकें. ॥ ६८ ॥
नेणें छंदकलाप्रबंधरचना, नेणें गिरा निर्मळा ।
नेणें नाटक, नागरा कविकला, नेणें पदा कोमला, ।
नेणें त्या मगणादि आठहि गणां, कोठें यती भंगती, ।
जाणें त्या गुरु वामना सुचरणा ते हे फळे संगती ॥ ६९ ॥
आद्ये भागवतात दोन दशमीं ते उत्तरार्धी मना ।
आणूनी बरवे मनीं, शरण मी गेलों गुरू वामना. ॥
त्याचा हस्तक मस्तकीं मिरवतां ग्रंथार्थ जाला तरी. ।
टीका श्लोक समग्र सुंदर बरे हे एकरोंसत्तरीं. ॥ १७० ॥

ते कसे बेल घोडे करुनि हरि पुढें पाठविले निवाडें, ।
त्यातें संग्राम होडे निवटुनि तुकडे थोर केले पवाडे. ॥ ३ ॥
भक्ताचे विघ्न वारी, दुरित परिहरी, शोषिली बाळमारी ।
माया दावी मुरारी, अघ बक समरीं मारिले दैत्य भारी, ।
रागें जे नंददारीं यमलतरुवरीं घेतली मुक्ति हारी, ।
ऐसा हा दानवारी नमित सुरवरीं बाळभावाधिकारी. ॥ ४ ॥
गर्गादिक सिद्ध गाति विरुदें तो यादवाच्या कुळीं ।
झाला आनकदुंदुभीसुत, अरी वाढे तुझा गोकुळीं, ।
ऐसा श्रीपति नारदें निरविला तो देव जाणावया, ।
प्रेरी भोजपती वडील चुलता अक्रूर आणावया. ॥ ५ ॥
वंशीं मारक जन्मला म्हणुनिया चिंता करी भूपती ।
तेणें दैत्य विदारिले रणमही ज्या प्रेरिले जे क्षितीं,
हा गोवर्धन थोरला उचलिला, तो बाळ कैसा म्हणों ?
जेणें भक्षुनि वोणवा विझविला त्या केविं आम्ही जिणों ? ॥ ६ ॥
रो हा चापमखासि निर्मुनि करीं आज्ञा प्रभू गोकुळा ।
यानें कृष्णहलायुधासह पुरीं पाहावया सोहळा, ।
मार्गी यादव चालता म्हणतसे पाहेन तो श्रीपती, ।
ज्याचे पाय अपाय दूर करिती, वहेंद्र ज्या वंदिती ॥ ७ ॥
वाणी ही स्तविता शिणे, निगम तो त्यालागिं नेणं म्हणे, ।
तो देवेश विलोकिता व्रजकुळीं दृष्टी घडो पारणें ।
देखे भूवरुते अपूर्व हरिच्या पादानुजाचे ठसे, ।
लोळे त्यावरि भक्तिनम्र पुरता सुप्रेम ज्या उल्हसे. ॥ ८ ॥
सूर्यास्तीं रथ पातला व्रजपुरीं अक्रूर आला घरा, ।
ऐसें जाणुनि भेटती सुरपती हा आमुचा सोयरा, ।
साष्टांग प्रणिपात सान्त्वन करी, वहेंद्र ज्या वंदितो ।
तेंही जाणुनि भाव हृत्कमळिचा भक्तेंद्र या पूजितो. ॥ ९ ॥
देवां घेउनि चालिला, नजरयू अक्रूर तो निर्दिर्ट, ।
देवें दाखविलें स्वरूप यमुनाडोहीं स्वभक्ताप्रता ।
नेला मोक्षपदासि कंसनृपती चाणूरमल्लांसवें, ।
स्थापी राज्यपदीं यदूत्तम पुन्हा मातामहा वैभवें. ॥ १० ॥






चाहे भार वसुंधरा दडपली दैत्येंद्र राजे बळी ।
गर्वी कौरव बाण भूसुत जरासंधादि चैद्यावळी ॥
त्या सर्वांसि वधोनि धर्मनृपती संस्थापिला आदरें ।
केला दिग्विजयी महा विजय तो भूभार जेणें हरे ॥ ११ ॥

एके सोळा सहस्त्र क्षितिपतितनया भेगिल्या एक वेळा ।
स्वर्गीच्या कौतुकानें सुरवरविटपी आणिला द्वारकेला ॥
केला श्रीवासुदेवें कुरुयदु मथनीं बोध पार्थोद्धवाला ।
ते झाली ज्ञाननौका भवनिधितरणोपाय सद्भ्यष्णवांला ॥ १२ ॥

श्रीकृष्णाचीं चरित्रें परम शुभकरें ऐकतां दोष जाती ।
स्वच्छंदें प्रेमबंधें हरिजन हरिची सत्कथा नित्य गाती ॥
हृत्पद्मीं ब्रह्मरंध्रीं सुदहरकुहरी लक्षिती वासुदेवा ।
ध्याती त्या पंकजाक्षा नवजलदनिभा अर्पिती भक्तिभावा ॥ १३ ॥

मंत्राचे वर्ण बारा प्रणव प्रथमतो वासुदेवाभिधानी ।
त्यावर्णी श्लोक बारा रचुनि हरिपदीं अर्पिली रम्य वाणी ॥
कैचें सामर्थ्य मातें परि सकळ कृपा बापलक्ष्मी धरावी ।
प्रार्थी भावें वनाजी कविवर परिसा कीर्ति हे केशवाची ॥ १४ ॥

---

## १२ व्यंकटेशस्तोत्र.

कुलस्वामी माझा त्रिभुवनपती, वेंकटपती;
सदाही सद्भावें सुरमुनि महाभक्त जपती. ।
तुझ्या पायां मी या सतत नमितों, दीनशरण,
प्रभू, पंचक्लेशात्मक भवनिधीमाजि तरणा. ॥ १

त्यजोनी वैकुंठा, भुजगगिरिमाथां विलससी,
तथापि त्रैलोक्यीं भरुनि, विभु, संपूर्ण असती, ।
जनाच्या उद्धारा प्रकटुनि महीमाजि विभवा.
महामाया तुझी अकळ त्रिबुधेंद्रा विधिभवां. ॥ २

महालक्ष्मी तुझ्या हृदयकमळीं नित्य निवसे.
तिला विश्रामातें आणिक दुसरें स्थान न वसे. ।

प्रिया तुझ्या ठायीं अचपळ गुणें साचचि रमे,
जिला ब्रह्मेंद्रांच्या सदनिं पळ तेंही न करमे. ।
तळींचा जो होता फणिपति महातल्प घडला,
स्वरूपें शैलाच्या तव पदतळीं शीघ्र जडला. ।
नदीस्वामी तीर्थाभिध निकट देवोनि विरजा.
हरीते लोकांच्या सकळ कलिसंभावित रजा. ॥ ४
सदा जे वैकुंठीं हरिजन तुझे मुक्त वसती,
महाद्रीच्या शृंगीं तरुउपलभावें निवसती, ।
तुझ्या संगीं ज्यांतें सतत रमणें, श्रीप्रियकरा,
तयां कंठे कैसें तुजविण पदीं भक्तनिकरा. ॥ ५
तुझ्या ज्या वीभूती असति अणिमाद्यष्ट, महती,
वसोनी प्राकारीं करिति भजकाच्या श्रमहती. ।
महापीयूषाचा निधि सरस नैवेद्यपद वी
स्वयें अंगीकारी, सकळजनसौभाग्यपदवी. ॥ ६
तुझ्या चारी मुक्ती विभुसदन दारींच वसती;
तुझ्या सेवे येती जन सुजन त्यालाच पुसती. ।
ध्वजस्तंभाकारें गरुड निवसे सन्मुख, हरी,
जनाच्या तापातें क्षण न लगता जो परिहरी. ॥ ७
महानंदाचा हा कळस झळके गोपुरवरी,
तुझ्या सद्भक्तालें क्षणिं निरखितां त्यांप्रति वरी. ।
सदा प्राकारत्वें प्रणव घडला साच दिसतो
दिठीं लाहे ज्यातें अमृतमय त्यालाच दिसतो. ॥ ८
पहा श्वेतद्वीपें धवळ रचिल्या पर्वतशिळा;
नुरे ते पापाचा मळ निरखिता कुत्सितशिळा. ।
निधी नौही झाले नव दिवस नौरात्र बरवे,
तदा ब्रह्मा देवासहित मुनिसंघेंचि मिरवे. ॥ ९
वनें, पुष्पें, वल्ली, फळ, जळ, असे दिव्य शिखरीं.
सुरीं नाना रूपें धरुनि असिजे हे श्रुति खरी. ।
चहूं वेदीं तूझी अमित महिमा वर्णित दिसे.
पुराणां शास्त्रांतें तुजविण दुजा ठाव न दिसे. ॥ १०

रमाकांता तूझी अचळगुणसंपत्ति वदतां
गणाधीशा झाली म्हणति अमळा एकरदता. ।
फणींद्राची जिव्हा चिरुनि घडली दोनि तुकडे.
विधाता चौं तोंडें गणुनि बसला येकिचकडे. ॥ ११

रथोत्साहीं तूझ्या विविहर करीं वेत्रधर ते
सदा सेवेमध्यें असति, विभु, संलग्न पुरते. ।
सुरेंद्राच्या कोटी नमिति त्रिपुसंघावरमणी
महासंघर्षे तें गळति मुकुटाचे वर मणी. ॥ १२

अनंतब्रह्मांडोदरगत जनां उत्सव घडे,
समस्तांचे देवें, प्रभु, तव कृपाद्वार उघडे. ।
जगाच्या कल्याणास्तव निवसि तूं दिव्य वहनीं,
सुधासारें दृष्टी भरति वरदायाच अहनी. ॥ १३

रथीं जेव्हां, देवा, वळवसि, महावैभवभरा,
त्रिलोकीलोकांहीं अतिशय घडे पीडित धरा. ।
सुरां, मर्त्यां, नागां, मिसळण पडे याच दिवशीं
तदा साने मोठे म्हणुनि कवणा कोण गिवसी ! ॥ १४

सहस्राक्षाचींही नयनकमळें तें न पुरती,
महाशोभा पाहूं म्हणति अमळा दिव्य पुरती; ।
तदा दों नेत्रांच्या लघुतर नरां कैं निरखवे ?
न माये ब्रह्मांडीं किर्ति म्हणुनि तें या हरिखवे. ॥ १५

सुरेंद्राच्या वामा वरुषति शिरीं दिव्य सुमनें.
महानंदें गाती चरित भजती नित्य सुमनें. ।
महावाद्यांचेही गजर सुरगंधर्व करिती.
नटी नाट्यारंभीं अभिनय कळायुक्त धरिती. ॥ १६

अशा पुण्योत्साहीं भजति नियमें भक्त तुजला.
यथाशक्ती पूजा करिति; तुळसीपुष्पसुजळां ।
समर्पोनी तूतें, नमिति चरणीं ते तव पदीं.
महामोदें क्रीडा करिति तुजसीं त्यक्तविपदी. ॥ १७

महानंदाचा तूं जलधि, सुखदाखी निजजनां;
समस्तांच्या चित्ता करिसि अति उत्साह भजना ।

फळाचा दाता तूं; तव पदिं जया काम निवसे,
तयाच्या हस्तीं तें परम पद संपूर्ण गिंवसे. ॥ १८
महायात्रे येथें मिळति धरणीमाजि जितुके
नरांचे नारींचे गण सधन येवोनि तितुके. ।
विचित्रें ते लेणीं विविध वसनें भापण तसें
समस्तांच्या चित्ता कुतुक परभारें करितसे. ॥ १९
विचित्रा वर्णांच्या विलसति पताका, ध्वज किती.
ध्वनी वाजंत्रांच्या सुरपति निशाणासि जिकिती. ।
विमानांच्या दाटी कुतुक निरखूं पाहाती सती,
सुरांगंधर्वांच्या अतुळ विभवें ज्या विलसती. ॥ २०
त्रयस्त्रिंशत्कोटी जगतिस वसे तीर्थगणना.
प्रसिद्धत्वें अन्यें न सरावि कदा लेखगुणना. ।
समस्तें ते येथें अहिगिरिस सौख्यें निवसती.
स्वपापाच्या नाशा विचरुनि सुमोदें विलसती. ॥ २१
समाधी ये स्थानीं सहजचि सुपुती मन ज्यें
तपें होती येथें करुनि वसतां दिव्य निलयें ।
महापापें तेही घडति सुकृतें भोगसमुदा
घडे, देवा, तूझ्या भुजगशिखरीं कारण मुदा. ॥ २२
महाशापें कैसा अजगर घडे तुंबर मुनी ?
पडे शैलीं, दैवें त्रिदिव वळघे तूज नमुनी. ।
पहा मोठे मोठे ऋषिवर गुहेमाजि वसती,
स्वरूपें जे मध्यंदिनइनसमत्वें विलसती. ॥ २३
विधि प्रार्थी तूतें, त्रिभुवनविभूतें, सुविनयें
रचीतों मी सारें जग; तदपि मातें यश नये. ।
वृथा जातो माझा श्रम, सकळ ते व्यर्थ मरतां
न घाती मुक्तीतें तव भजन तें नानुसरतां. ॥ २४
तयातें मुक्तीची करिसि घटणा स्वल्प सुकृतें,
तदा होती माझीं नियत अवघीं सार्थक कृतें. ।
अशा या दीनोक्ती परिसुनि, कृपापूर्ण वचनें
तया आज्ञा केली, विधि करित जा लोकरचने. ॥ २५

असे माझ्या येथें धरणिवरि हा पन्नगगिरी;
वसें मीही साक्षात्करुनि बरवी पुण्यनगरी. ।
स्वभावें जे येती नर, तरति पाहोनि मजला.
पदा जाती माझ्या नियत कथितों व्यक्त तुजला. ॥ २६

किती पूर्वी त्यांही त्रिभुवननुता भक्त घडिले !
गिरिशृंगीं आले सकळ निजधामा दवडिले. ।
नसे इच्छा ह्यांतें, तुजविण, निजानंद भुवनीं. ।
प्रभू, वैकुंठींची अभिलषिति हे पुण्य अवनी. ॥ २७

स्वजन्मातें कैसे सुर सकळ धिक्कार करिती ?
जरी दीर्घायुष्यें धरिति, अति संपत्ति वरिती. ।
अम्हां नाहीं कैसें जनन घडलें या कलियुगीं
महीपृष्ठीं ? व्यर्थ प्रळय अनुभोगूं प्रतियुगीं. ॥ २८

असोनी आम्हांतें वदनकमळीं अंबरसना,
प्रसादाचा थोणें तरि निरखिला काय रस ? ना. ।
सुधा पीतों आम्ही, तदपि हरिनैवेद्यगरिमा
नये यीतें; आम्हां कधिं करिल हे मुक्त तरि मा ? ॥ २९

असोनी हें नेत्रें शिखिवरसिखंडाक्षसम तें ।
न होती आम्हांतें म्हणति कधिंही सौख्यसम ते.
नसे कीं पुष्पांगीसहित हरि डोळां निरखिला, ।
सुरेज्याच्या यारीं वरि सुमनवर्षे वरखिला. ॥ ३०

अम्ही स्वर्गी भोगूं सुख, असुख, संपत्ति. दिस ते
वृथा गेले कैसे ! विषयरसिकां फार दिसते, ।
जवादी, कस्तूरी, घसृणरस, संयुक्त स्नपना
न देखों कीं आम्ही. वर म्हणवितों काय अपणा ? ॥ ३१

अम्ही नाहीं झालों तृणलघु तरी, काञ्चनगीं.
वृथा वाहूं वोझें मणिखचित जांबूनदनगीं ।
सदा सद्भक्तांच्या पदकमळकिंजल्करजसा
न वाहोनी नेला त्रिदिवपदिंचा जन्म रजसा ॥ ३२

अम्ही नाहीं प्यालों, मुख असुनि, पादामृतरसा.
कसे सोसूं आतां भवरज महावीरनरसा ? ।

'हरी, गोविंदा,' हें वदुनि करताळी न पिटिली.
जिणों नेणों कैशी जनिमृति अविद्याभ्रपटलीं! ॥ ३३
अशा पश्चात्तापें तळमळिति, देवा, अमर ते.
वरे कीं त्यांहोनी तत्र निकटिंचे दीन नर ते. ।
तुझ्या सन्मूर्तीतें निरखिति सदा दृष्टि भरुनी.
सुरांतें स्वर्गींच्या जिणिति निभिनें हास्य करुनी. ॥ ३४
धरा माथांची ते त्यजुनि, वरि आला फणिपती.
धराहातें शंका प्रबळ गमली तें, सुरपती. ।
पुन्हा गेली पृथ्वी अधर जरि पाताळभुवनीं,
महा लागे तेव्हां श्रम मजचि, हे भूमिअवनीं. ३५
तदा ये श्रीशैलीं; धरणि धरिली अंकफल कीं.
तुझ्या या सेजारीं वसुनि जग केलें सफळ कीं. ।
तुझ्या तीर्थीं न्हाती, निरखिति तया लोक नयनीं,
तुम्हां ऐसें तेही पहुडति सुखें शेषशयनीं. ३६
तुला पाहूं आला मदन अहिशैलीं, प्रभुवरा;
स्वरूपाच्या दर्पे बहुत चढला त्यासि तिवरा ।
तुझ्या रूपा लाजे. त्यजुनि निजदेहा, सुरपती,
अनंगत्वें हिंडे अझुणिवरि लोकीं रतिपती. ॥ ३७
तुझ्या सौंदर्याची त्रिभुवनीं तुला एक न दिसे.
महालक्ष्मी झाली पदकमलभृंगी मज दिसे. ।
नखीं चंद्रज्योत्स्ना अमित निरखी श्रांतमनसें.
महानन्दें लोपे; किमपि तिज देहीं स्मरु नसे. ॥ ३८
पदीं शोभा रक्तोत्पलदळ तसी कोमलपणें.
दिसे नाना चिन्हें ध्वज, कुलिश, रेखादि टिपणें. ।
प्रवाळाभाटांचा, प्रपद लसती कूर्मसम ते;
नये लोकीं कांहीं अणिक दुसरें यासि समते. ॥ ३९
वरें घोंटे नीलोत्पलसदश ते ही विलसती,
स्मराचे तूणाभें अति मृदुल जंघा निवसती. ।
रणन्मंजीरश्री मुनिजन हृदब्जा विकसवी;
जणों सद्बोधें तें मन नियत ठायींच वसवी. ॥ ४०

उरू केळी दंडोपम; वर नितंबें युत कटी.
  महामोलाचा हा पट तदुपरी पीत तकटी. ।
कणत्कांचीदामा अमल मणियुक्ता मिरविसी.
  तयाची ते शोभा दिसत अमितोदार रविसी. ॥ ४१
वटाच्या पत्रांची उदर समता, मार्दव, धरी.
  सुनिम्नत्वें नाभीऱ्हद अमृतकूपासि अधरी. ।
सुरोमाळी काळी दिसत वर्वा भृगपटली
  विकासें कंजाच्या मज गमत आतांचि सुटली. ॥ ४२
त्रिरेखा त्या रम्या, त्रिजगउदरीं सीमसरिता
  तसी वाटे मातें, त्रिभुवनपती; ध्यान करितां ।
विशालत्वें वक्षस्थळ अवगणी फार गगना. ।
  *धरी तारकारें अति धवल त्या मौक्तिकगणा.* ॥ ४३
भुजाचाऱ्ही शाखा विलसति जशा कल्पतरुच्या.
  स्वदीप्तीनें केल्या मरकतमणीच्या हलरुच्या. ।
सनाळें तैसीं तें विलसति वरीं पाणिकमळें,
  स्वभक्तातें देती अभयवरदानें सुविमळें. ॥ ४४
करें एके संज्ञा क्षितितळचि वैकुंठ, म्हणुनी.
  दुजा दानी भक्तां कटिसम भवाब्धीस करुनी. ।
पुन्हा दों हस्तानीं धरि अमल दोनी अरिदरां.
  त्रिलोकाचीं दु खें परिहरुनि, घे दीन पदरीं. ॥ ४५
अनर्घ्या रत्नांची जडित दशमुद्रांगदकडीं.
  कृता नाना शोभा स्वतनुवरि भागें वरकडीं. ।
पहा, श्रीवत्साचें परम धरिलें भूषण कसें,
  जसें फुल्लांभोजीं अणिक दुसरें पद्म विकसे ॥ ४६
हृदंभोजीं पादांबुज द्विजवराचें विलसलें,
  म्हणोनी लक्ष्मीतें पद अचळ तेथें गिंवसलें. ।
वसे जेथें नित्योत्सवयुत सती प्रेमभरितां.
  त्यजी चांचल्यातें निधिस मिळता जेंवि सरिता. ॥ ४७
त्रिरेखा ते कंठीं जलजवर शोभा धरितसे.
  स्वदोर्दंडें लक्ष्मी सदट परिरंभें धरितसे. ।

तसा या बंधूच्या सतत निकटीं कौस्तुभ वसे.
सुधाब्धीच्या बाळा वसतिस दुजा ठाव न दिसे. ॥ ४८
मुखाची तों शोभा मदनशत वोंवाळुनि वरी. ।
सहस्रार्चीं दीपें नियत कुरवंडीस निवरी. ।
म्हणों ये तें कैसा सम तरि शशी पूर्णवदना, ।
समता शोभेच्या त्रिभुवनसुखसंपत्तिसदना ? ४९
मुखीं शोभे मंदस्मित; नयन कारुण्य विभवें. ।
कळा चंद्रीं ऐशा नसति म्हणुनी तो अभिभवे. ।
कलंकी तत्रापी करिल समता आस्यकमळा. ।
घडेना, कंजाक्षा सुचति नुपमा आणिक मला. ५०
सुवृत्ताकारें तें परम मुखपंकेरुह दिसे ।
जगीं शोभा कोणी चुबुकवर या साम्य न दिसे. ।
नये त्याही बिंबा तव अधरबिंबासि समता. ।
रदीं कुंद, ज्योत्स्ना, धरि उपमिता तें असमता. ५१
दधि, क्षीरा, मुक्ता, मणि, शशि, सुधा, शंख, धवला, ।
जिणे तूझी मंदस्मितरुचि न कीजेचि नवला. ॥
तिळाच्या पुष्पाची जड असम नासासि उपमा; ।
कळी चाफ्याचीही अघड शुकतुंडा अनुपमा. ५२
पुराणीं वाखाणी मुनिनयनपद्मासि समता. ।
मला मानेना तें. कमलउपमा ते असमता. ।
तुझ्या नेत्रा भासारुनि, जड पंकेरुह कसें ? ।
जगीं रूढे इंदीवर म्हणुनि तोपेंचि विकसे. ॥ ५३
कटाक्षस्नेहें जे अमितजनसंताप निवटी, ।
दिठी, देवा, तूझी सुजनहृदयीं ज्ञानदिवटी. ।
प्रकाशी ऐशी हे अमित महिमा यीसि समता ।
घडेना पद्माची, म्हणुनि न वदें मी अभिमता ॥ ५४
तुझीं हीं भ्रूयुग्में स्मरधनु असें जे उपमिती।
कवींतें मी मानी जडमति; नसे त्या अनुमिती. ।
स्मराच्या मातेतें तुज निरखितां मोह पडिला
मनीं सौंदर्याचा मद अमित होता, निघडला, ॥ ५५

त्रिशाळा या भाळीं मृगमदटिळा भूषिन दिसे.
यया लोकीं यातें अणिक उपमा साच न दिसे. ।
मुखेंदू हा तुझा अमल असता, श्रीप्रियकरा,
कळंकत्वें शोभे तिलक जनिता तोषनिकरा. ॥ ५६
वरे माथाचे हे कुरळ अळिमाळा कृति, पहा.
मुखाब्जीं हे तुझ्या विलसति,रमा मानअपहा.
श्रुतीं सद्रत्नांचीं मकरनिभ तें कुंडलयुगें,
प्रभा गल्लद्वंद्वीं प्रकट करिती तें अनुयुगें. ॥ ५७
किरीटज्योत्स्ना ते अमित शशिसूर्यासम गमे.
विचित्रा रत्नानीं जडित रचिलें काय निगमें. ।
समस्ता वेदांतीं अति अमल जें तत्व विलसे,
शिरें या माथाचे मुकुट घडुनी फारचि लसे. ॥ ५८
प्रभा देहीं नीळी गगनजलदाभें प्रकटली,
तमाळाची इंद्रोपलकुमुदभा जेंवि नटली, ।
तथापी जे साचे मणिपदकदीप्ती सुललिता,
घनीं जैशी शोभे परम चपला ते प्रचलिता. ॥ ५९
समस्ता सौंदर्या, विभु, तव वपू आस्पद असे
त्रिलोकू प्रत्यक्षें कथिति सुरवागीश्वर असें. ।
तुझ्या नाना क्रीडा करिती जगसमोहन, परी
अरूपी तू रूपा धरिसि नट जैसा बहुपरी ॥ ६०
तुझ्या कोणा काहीं कळत, न घडे, अत सुरसा,
पहातें तों मायारहित दिससी रम्य सरसा. ।
तुझ्या ठायीं मिथें सकळ प्रतिबिंबें त्रिजग हें,
महादर्शी जैसें नगर अर रज्जू भुजग हें. ॥ ६१
असे, देवा, तूझें स्वरूप अपरिछिन्न विलसे.
तयातें नेणोनी जन जनुभवीं दु खकळसे. ।
तमा मोहीं देवा भ्रमुनि तव मायागुणवशें,
अनंता जन्माचे श्रम फळचि घेवोनि, नि, वसें. ॥ ६२
तुझ्या दासाचा मी न करुनि कसा सग फसलो,
तुझ्या अज्ञानें मी जनिमरण भोगीत वसलो. ।

अविद्याक्लेशातें अनुभवितसें नित्य नवसे. ।
यथा कष्टें मातें किमपि तरिही सौख्य न वसे. ॥ ६३

पुढें आता, देवा, किति दिवस ऐसेंचि असिजे ?
प्रमोहाच्या तापें तनु निरयकुंडीं बहु सिजे. ।
कृपा तूझी व्हावी तरिच सुटका होइल मला.
न लिंपे अज्ञानोद्भव असुखलेशा कश्मिला ॥ ६४

दयाळू दीनाचा म्हणुनि स्वपदीं ब्रीद धरिसी;
प्रतिज्ञा हे केव्हा तरि प्रभुवरा साच करिसी ? ।
महापापी आहें. मजहुनि जगीं कोण दुसरा,
जयाच्या अर्थी तू करिसि निजवात्सल्यपसरा ? ॥ ६५

महात्म्यांनी पूर्वी मजहुनि महापापनिपुणा,
मिमें स्वल्पें यातें पर पद दिल्हें तुल्य आपणा. ।
प्रभूजी, माझा का विसर न कळे आजि पडला ?
न का मद्भाग्याचा अशुभितरि ठेवा उघडला ? ॥ ६६

स्वभक्तासाठी तूं कळकळिसि, त्या कष्ट पडता;
स्वकर्माच्या भोगें अतितर तया दुःख घडता. ।
त्यजोनी वैकुंठा पळसि लवलाहे क्षितितळा
खगेंद्राच्या खांदीं बसुनि अथवा जासि सुतळा. ॥ ६७

गजेंद्रासाठीं तू झडकरुनि आलासि, वरदा.
स्वचक्रें नक्राच्या विदळण करोनी मुखरदा, ।
विमानीं वाहोनी निजपुरिस नेला, प्रभु, तरी
भवाब्धीच्या लोटीं घडसि सुजना तू सुखतरी. ॥ ६८

ध्रुवा, बाळासाठीं परम पद निर्माण करुनि,
तया दिल्हें, देवा, अचळ अति वात्सल्य धरुनि. ।
पदा नेली दुष्टा स्तनविषरसा पीउनि बकी
पवित्रा ते केली परम अमता पापजुनकी ॥ ६९

हरी, तां पांचाळी निरखुनि सभेमाजि उघडी
न लागे तों येसी सजुनि वसनें ते पळघडी. ।
असी तूझी दासीं असुनि, सुरनाथा, अतिदया
उपेक्षावें दीना मज उचित कीं, दिव्यहृदया ? ॥ ७०

ल्योदीं भक्तार्थी धरुनि झषरूपें, नरहरी,
हयास्याचा केला वध विहित, जो कां श्रुति हरी. ।
महाबोधें सत्यव्रत नृपति तारोनि, सुखदा,
उपेक्षानें मातें? जगीं घडल हांसें खदखदां ॥ ७१
समुद्रीं देवाहीं मथन करितां मंदरगिरी
स्वपृष्ठीं वाहोनि बससि फिरता तो गिरिगिरीं; ।
अशा कूर्मा तुला नमन. अमृता पाजुनि सुरां
दिल्ही देत्यें शातें, कपटयुवती होउनि सुरा. ॥ ७२
धरा नेली दैत्यें वळ करूनि पाताळ विवरीं,
महाकष्टें ध्यानीं धरुनि विधि तूझें पद वरीं; ।
तदा तूं, कंजाक्षा, धरुनि महती सूकरतनू,
वधोनी दुष्टातें क्षिति वसविली तूंचि अतनू. ॥ ७३
सुभक्ता प्रल्हादास्तव प्रकट खांबांत घडसी,
नृसिंहाकारें तूं कडकडुनि दाढा रगडिसी. ।
हिरण्याच्या पोटा चिरुनि निजजानूवरि खळा
बरें केलें देवा, रडति दिनरात्रीं खळखळां. ॥ ७४
बळीच्या द्वारीं तूं सजुनि बटुवेषें सुरहिता
स्वयें भिक्षा घ्याची विहित तुज; आशाविरहिता. ।
तयाची पाताळीं स्थिति करुनि तद्वार धरिसि,
स्वभक्ताचें ऐसें प्रकट यश लोकांत करिसि. ॥ ७५
पुरा क्षत्री झाले धरणिवरि उन्मत्त विभवें
नव्हे त्यांचें दर्पक्षयकरण शक्कें विधिभवें. ।
तदा धर्मात्मा तूं परशुधर होतां भृगुपती ।
क्षया नेले राजे. बुध विबुध चित्तांत खुपती ॥ ७६
पित्याच्या आज्ञेनें सहज फिरतां दंडकवनीं,
मिसें या सीतेच्या वधुनि दशतुंडासि अवनीं; ।
तदा केली भारानिरहित; असी कीर्ति पडली
वसे, रामा, लोकीं त्रिभुवनशिरीं हीं प्रकटली. ॥ ७७
सुरांच्या त्रातारा, क्षितिवरि महाराज्य करितां,
प्रजा साऱ्या तूझ्या विहरति सदानंद भरितां; ।

समस्तातें लोभें भरण करुनी, मोक्षपदवी
दिली सर्वां लोकां. श्रुति स्मृति मुखें हेंच वदवी. ॥ ७८
महादैत्येंद्राहीं वसुमतिस राजेश्वरकळीं
स्वसामर्थ्ये होता, धरणि अति भारें कळकळी. ।
विधी प्रार्थी तूतें तप करुनि गोब्राह्मणहिता
म्हणे, ' धर्मा रक्षीं, वधुनि तमरूपासि अहितां.' ॥ ७९
सदा पृथ्वीपृष्ठीं अवतरुनि तू, यादवपती,
सुरांचीं सत्कार्यें करुनि रिझवीला सुरपती. ।
स्वकीर्तीच्या नावा रचुनि दिधल्या फार सुजना.
न जावें त्या त्यागें भवनिधि तरायासि विजना. ॥ ८०
तुझी बाळक्रीडा त्रिभुवनजना मोहित करी,
वसोनी नंदाच्या सदनिं करिसी जे हितकरी. ।
यशोदा आनंदाबुधिं तुज निरीक्षोनि सतता
निमग्ना ते झाली, चरितरसकल्लोलनितता. ॥ ८१
प्रभु, तू गोपाळांसह विचरता गोधनगणीं,
तदा केला दैत्यक्षय अमित, त्या कोण गिणणी ? ।
महेंद्राच्या दर्पा हरुनि धरिला पर्वत करीं.
व्रजाचा कैवारा म्हणविसि महोत्पातनिकरीं. ॥ ८२
फणी काळा होता दिनकरसुतानिम्नसलिलीं
असेव्या ते झाली अतितर विषोद्गारकलिलीं ।
तयातें दंडोनी अमृतमय केली सुसरिता, ।
अशा लोकीं लीला तुजविण जगीं कोण करिता ? ॥ ८३
दवाग्नी भक्षाया, कवण असलें हें बळ धरी ? ॥
नसे लोकीं कोणी तुजसह विरोधें छळ धरी. ॥
महाराजे कंसादिक अमित तूझ्या करतलीं।
विनाशा पावोनी, रणिं पहुडले या क्षितितळीं. ॥ ८४ ॥
कुरुक्षेत्रीं केलें कुरुमथन ता पांडवमिसें,
न दे धर्मा जो का खळ गिळुनि सद्राज्य अमिसें. ।
सुगीता पार्थातें परम उपदेशासि करुनि,
महापीयूषाची जगिं विरचिली वृष्टि भरुनि ॥ ८५

क्षितींद्रांच्या कन्या हरुनि निजतेजें भुजबळें
समस्तेंही केलीं हतमद महाक्षत्रिय बळें. ।
प्रियेच्या संतोपा सुरतरुसि या मृत्युभुवनीं
प्रतिष्ठा केली, तां जिणुनि सुरवर्गा गृहवनीं. ॥ ८६

उदारा त्वद्गाथा श्रवण करितां सज्जनवरीं
वसावें वैकुंठीं, म्हणति मन आश्चर्य न धरीं ।
जडें, मूढें, तेहीं अमित तरलीं पामर तरी
पहा, झाली दीना कलिमलजलीं पावन तरी. ॥ ८७

अहिंसाधर्मातें कलियुगजनां बोध करुनी,
महापाखंडातें मिरविसि परा बुद्धि वरुनी ।
तदां तुझ्या बुद्धाकृतिस भजती लोक समुदें.
न जाणों ये त्यांतें नियत तव मायाच भ्रमु दे ॥ ८८

महापापें झाला. कलिमल जगीं रूढ, सदया;
नसे तेव्हां लोकीं सुजनसुपथाचार, सुदया; ।
तदा म्लेंच्छप्रायें नर वसति, त्यां पापनिरतां
स्वयें कल्कीरूपें वधिसिल पुढें काळ सरतां. ॥ ८९

जधीं होतो धर्मक्षय, पथविधीचा बिघडतो,
हरी तेव्हां तेव्हां धरिसि अवतारा उघड तो. ।
पुन्हां स्थापी धर्मा नियतचि. अधर्मक्षयकरी
असी लीला तूझी त्रिजगकलुषा पावन करी. ॥ ९०

अनंता योगांच्या असति महिमानंतपरिच्या.
अनंतावें मूर्ती प्रकटति तुझ्या दिव्य हरिच्या. ।
तयांचीं चारित्रें श्रुतिस वदवेनात तितुकीं
गुणाढ्या जें झालीं कवण कवणासीं मग तुकी ? ॥ ९१

असा तूं या लोकीं अति महिम, देवा, विलसितां,
जगीं ख्याती तूझ्या हरि करितसे रक्षण सता. ।
पुन्हा कां हे चिंता अमित मज ? जाता, परिहरी.
त्वरें आतां, देवा, विमल सुख देई नरहरी. ॥ ९२

सुरांच्या संताना, सुरभि निज दीना तरण कां.
दरिद्रांतें चिंतामणि असुनि, नोहे हरण कां ? ।

निपत्तीअज्ञानोद्भव परिहरीं पच कलुषें.
महाकष्टें, दुष्टें, जड, निवटि निज्ञानकुलिशें. ॥ ९३
तुझी माया आता करुनि उपसंहार, मजला,
प्रभू, दे सद्भिक्षा; परम पुरुषा, याचित तुला. ।
सुवैराग्यें चित्तें तवपदजनी सगति घडो.
तुझ्या भक्तिप्रेमें निजजननसताप विघडो. ॥ ९४
तुझ्या रूपीं अंत करण रत हो काम वसरो.
भवभ्रांतीचा हा परम वळसा सर्वहि सरो. ।
मुरो पार्यी माझें मन नमन तूतें सुरपती.
पतीतोद्धारा तूं गरुडगिरिवासा यदुपती. ॥ ९५
समस्ता सृष्टीचा नियत करिता, तूंचि धरिता
प्रभू, नाना माया सृजिसि अति आश्चर्यभरिता. ।
परार्द्धांतीं सारें करुनि निजरूपात विलया,
चिदानंदा, एका, उरसि जगदानंद् लिलया ॥ ९६
महाभूतीं, भूतीं, प्रकृतिपुरुषीं, तत्वनिवहीं,
तुझ्या ठायीं सर्वी प्रकटुनि असतेंचि प्रवहीं. ।
समस्ता जीवाच्या हृदयिं वससी तू, चितिमया.
तुझीं स्तोत्रें आम्हा करवति किती, जी, श्रुतिमया ? ॥ ९७
क्षमा कीजे मी जें तुज अमित वाचाळ वदलों.
तुझ्या निंदाव्याजें जरि असन चित्तात मुदलों, ।
प्रसन्ना दृष्टीनें परम करुणेनें निरखिजे;
जसा देखे मातें मनिंच अपल्या पामर खिजे. ॥ ९८
क्षमापूर्णा, तूर्णा करुनि करुणा तू करिं धरीं.
मदीया दैन्यातें परिहरुनि धन्या करिधरीं. ।
कृपाळा, गोपाळा, दशरथसुता, नंदकुमरा,
असीं नामें वाचे वदविं अति दुर्लभ्य अमरा. ॥ ९९
मुकुंदा, गोविंदा, प्रतिपद असी नामलतिका
मुखीं राहो, गावो तन चरितगाथा महतिका. ।
गुणाढ्या, सर्वाढ्या, परम पद सेवणें मुखरी
तटीं झालें मातें विदित कथिता वेदमुखरीं. ॥ १००

असो यार्थी आता, विभु, मजवरी पूर्ण ममता.
विचित्रा या भूर्ती मज घडविजे सर्वसमता ।
महाशांतीचा तू वर वरद होई निज जना.
कृपेनें तू लावीं निजचरणकल्हार भजना ॥ १
शतश्लोकीं माळा विरचुनि पदें मुक्त समते
पदीं पुण्यश्लोकार्पण करितसें सद्गुरुमतें ।
प्रसादत्वें यीचें ग्रहण करिता सज्जनवरीं
हरीच्या आज्ञेनें वरिल पुरुषा मुक्तिनवरी ॥ २
मनीं ज्याला आहे त्रिविध पुरुषार्थी अभिरुचि,
अनायासें पावा, न करुनि महाकष्ट कुरुचि ।
सुत्राम्रत्नज्योत्स्ना ज्वलखित जिह्वाग्रपरळीं
स्वसतोर्वे नीराजन करुनि भावें अविरळीं ॥ ३
अहो वाक्पुष्पाळी भरुनि रसनेच्या करतळी.
समर्पी हे पुष्पाञ्जुळि हरिपदाब्जीं क्षितितळीं. ।
घडावें धन्यत्वें सकळ सुजनामाजि विभवें,
तदा तुम्हा वाधा कधिसहि नव्हे या कलिभवें ॥ ४
हरीच्या भक्तातें कधिं अशुभवार्तांचि न घडे,
सदा ऐकों कानीं श्रुतिगदित हे बोल उघडे. ।
यश आयुष्याची धनकनकअन्नें विपुलता,
असो कन्यापुत्रा सहित वनिता संततिलता. ॥ ५
रणीं लाभे त्यातें जय. भय न बाधी नृपकुळीं
असावें तद्वश्यें सकळ, घडती साच अकुळीं. ।
रिपूच्या नाशार्थी पठण करिता, परिपूसही
जिणे, ऐशी याची अतुळ महिमा हे श्रुतिसही. ॥ ६
अहो या स्तोत्राची वदवट किती दिव्य करणी !
समस्ता श्लोकीं हे अनिमुखर शोभे शिखरिणी. ।
गुणज्ञानीं घ्यावी तरिच विलसे मुद्राचि विची.
अभक्ता, मूढातें, असुखफल देणार रुचिची. ॥ ७
हा श्रीवेंकटराजसुस्तव असे. सद्भक्ततोषा करी
दे सन्मान, विरक्ति भक्ति, सुजना आनंदरत्नाकरीं ।

ठेवीं, नित्य महोत्सवें म्हणुनिया देवाचिये सन्निधी.
सायप्रात पढोनि नित्य मिळवा त्या अष्टसिद्धी निधी ॥ ८
योगी, निरंजन, रमापति, वेंकटेशा ।
स्तोत्रें स्तवोनि भवबंधकरी विनाशा ।
प्रार्थी समस्त सुजना मम दोष, देवा, ।
टाकोनि सन्निध करा विभु वासुदेवा ॥ १०९
इति श्रीमन्निरंजनमाधवयोगिविरचित श्रीमद्वेंकटेशस्तोत्रम् ।

## १२ श्रीमल्लारीस्तोत्रराज.

मल्लारी, विभु, म्हाळसापति, तुझ्या वंदू पदांभोरुहा. ।
दे भक्तांसि अचिंत्य कामफळ हें निंदोनि स्वर्भूरुहा. ।
गाती सादर नाम, पुण्य चरितें जे भक्त तूझे, हरा, ।
संसाराब्धि तरोनि पावति सुखें मुक्तांचिया मोहरा. १
संसारीं रत जीव पंच वळुयें दुःखें सदा वाहती.
जे स्वर्गीं नरकीं मनुष्यनिवहीं कर्म स्वकें राहती. ।
त्यांचें बंधन केवि दुर्घट तुटे ? माया कधीं हे घटे ?
ऐशीं हे करुणा करोनि चरितें केलीं तुवां दुर्घटें. ॥ २
मारावा मणिमल्ल दुष्ट, कपटी, मायानिधी, तो स्वयें
तेणें निर्जर दंडिले, म्हणुनिया प्रार्थावयातें भयें ।
आले त्यां अभया दिल्हें, करुनिया शत्रूसि उन्मूलना,
ऐसा हा अवतार केवळ तुझा दीनाचिया पाल्ना. ॥ ३
विश्वात्मा, जडजंगमांत भरला राहोनिया, सर्वदा
लीला जे करिसी विचित्र सुजना तारावया सर्वदा. ।
देसी मुक्ति तसीच भुक्ति, सहजें ध्याता तुतें सादरें
कैंची ते नरकादिभीति अथवा कोठें महादुस्तरें ? ॥ ४
सारें विश्व तुला भजोनि तरतें संसारमायानिधी,
ऐसा तू भजकांसि लभ्य सहसा झालासि जैसा निधी ।
गेले दुखदरिद्रसंभव पुन्हा कोणासि दुष्टापदा
पाहा हे सकळीक पामर तरी पावोनियां त्वत्पदा. ॥ ५

या लोकीं मज एकलेंचि त्यजिलें तां काय तें पाहिलें ?
माझें पातक काय एकवटलें, कीं आड तें राहिलें ? ।
पाप्यां माजि मलाच का निवडिलें ? खोटें मना वाटलें ?
या दुःखें मज नीर हें अतिशयें नेत्रांबुजीं दाटलें. ॥ ६

पूर्वी पातकर्मत काय नव्हते ? ता टाकिले कोणते ?
तूं दीनोद्धर हें विचित्र चरितें गातात ते, बा, जाणते. ।
पायीं तोडर बांधिला उकलिला माझ्याचि या कारणीं ?
ऐसा हा तुज काय भार पडिला मद्दोषसंहारणीं ? ॥ ७

जें तूझ्या स्मरणेंचि पाप न सरे, ऐसें नसे देखिलें.
पाप्यातें करवेचिना, सुरगुरू, त्याला न जें लेखिलें; ।
ऐसेंही असता, मदीय दुरितें तूं चिंतिसी दुर्धरें,
तेव्हां पामर मी जगात न कळे कैशापरी उद्धरें. ॥ ८

तूझ्याही महिमाबुधीहुनि असे मज्जेत्र पापांबुधी;
तेव्हा मीचि वरिष्ठ तूजहुनि या सन्मानिजे या बुधीं; ।
तूझा तो पुरुषार्थ हीन घडला ताराययातें मला;
तेव्हा कोण भजेल या त्रिजगतीं पादांबुजा कोमला ? ॥ ९

मोठासा मणिमउ दुष्ट वधिला त्वा ज्या प्रतापें तरी,
तो होता विबुधा बुधासि वळसा देणार त्यां अंतरीं. ।
तैसा पातक दैत्य हा विकसतो मद्देहवासी घर्षी.
तेव्हा त्वत्पुरुषार्थ मानिन खरा दुःखासि तूं आवरी. ॥ १०

कामाचा वधताचि कीं विरचित्रा. क्रोधासि ता दंडिलें.
शोकातें अतिदूरता उडविलें. लोभासि ता भंडिलें. ।
मोहातें तरि मर्दिलें. प्रभुवरा, उच्छेदिलें त्या मदा.
साहाही रिपुंच्या जयासि करुनि तूं वर्तसी, शर्मदा. ॥ ११

तूतें जे भजती तयासि न घडे हे दुष्ट बाधा कधीं.
ते ना पाहति आपदा कल्किकुता, देवा, कधीं ना कधीं. ।
तूं विश्वंभर, तूं परात्परगुरू, तूं आद्य सर्वां जना
कल्पान्तीं तुझिया स्वरूपसरिते ये विश्व हें मज्जना. ॥ १२

ब्रह्मा होउनि सृष्टि तूंचि करिसी, विष्णूचि तें पाळिसी
भूतात्मा सकलांतरीं प्रसुनिया तूं, चिन्मया, चाळिसी. ।

कल्पांतीं नटताडवासि करनी भक्षोनिया राहसी.
पूर्णात्मा निज वैभवासि अपुल्या इच्छावशें पाहसी. ॥ १३
ऊर्णाथूसम विस्तरोनि जग हें, तू ग्रासिसी मागुती.
पूर्वीपासुनिया स्वभाव असला तूझा श्रुती सांगती. ।
हे गाथा तव वर्णरम्य विलसे गोडी सुधेचेपरी,
येतें प्राशिति सिद्ध, सज्जन, मुनी; जे श्रेष्ठ सर्वांपरी. ॥ १४
कल्याणी ! तव देवपावन कथा मी सर्वदा गातसें.
तूझें सुदर रूप हें निजमनीं मी सर्वदा ध्यातसें. ।
आता तू अविलंब पावन करीं. येना मना तेजवा,
तूझें वर्म जगात दावित खरें, श्रीज्ञाळसाच्या धवा. ॥ १५
कोठें तो तव वृद्ध वेल ? हय हा कैंचा तुवा आणिला ?
कोठें मूठवळी ? सुवर्णमणिचा हा जीन पालाणिला ।
कें खट्वाग जुनें धुणें लिवॉडिलें ? हें खड्ग कैचें करीं ?
भिक्षापात्र त्यजोनि, भूपति कसा झालासि, बा, लौकरी ? ॥ १६
चर्मे टाकुनि, दिव्यराजवसनें कोठें मिळालीं तुला ?
मुडें साडुनि, मौक्तिकस्त्रज गळा ज्यातें शशीची तुला ? ।
कैं गेलें शवभस्म, वेल ? वरतें भडार भाळीं दिसे.
कें गेले प्रमथादिभूत गण ते ? तो एकही ना दिसे. ॥ १७
सर्पाचीं वलयागदें विलसतीं ग्रैवेयकें कुडलें,
ते कांहींच न दीसती, पुरहरा, माथा जटा मंडळें. ।
आता सन्मणि कुडलें मिरवती कानीं, कडीं हस्तकीं.
दिग्वासा, विमलांबरासि धरिसी उष्णीष हें मस्तकीं. ॥ १८
कैचें हें तुज दिव्य वैभव असें आलें कळेना मला ?
होता कीं बहुकाळ वास तुजला प्रेतावनीं नेमला. ।
आता थोरपणासि घेउनि अम्हा संगीचि ना बोलसी
श्रीकंठा विभवेंचि माजुनि कसा मत्तापरी चालसी ? ॥ १९
वाणा, यी हरिली तुवा धणगरी लोभें तरी कोणत्या ?
देवी सुदर झाळसा असुनिया राणी घरीं जाणत्या ।
घाणेरी बुरटी ८ळा तरि कसी ते मानली नाकळे ?
दीसगें तुजला कसें सुख गमे ? तूझें तुला हें कळे. ॥ २०

तुझी ते प्रियसुंदरी, वरसती, दाक्षायणी, चित्कळा,
तीनें दक्षमखांत देह अपुला जाळोनियां टाकिला. ।
झाली भस्म पळांत ते भगवती श्रीअन्नपूर्णेश्वरी.
अन्नार्थी तुजला तदा निरखिलें भूलोक देवेश्वरीं. ॥ २१
तेव्हा त्या मुनिनायकीं स्वगनिता अन्नें करीं देउनी
तूत्या पाठविता, प्रसन्नमन तूं झालासि तें सेउनी. ।
अन्नें पुष्ट घडोनि, काम उपजे त्या सुंदरी देखतां,
तेव्हा लिंग तुझें गळोन पडलें, शापानळा प्रेरतां. ॥ २२
उज्जेनें विष भक्षिलें; परि नये तो मृत्यु, मृत्युंजया.
केलें विव्हळ त्या हळाहळ रसें जें तूजला, दुर्जया. ।
तें ते देखतसे तुला भगवती, नारायणी, मोहनी,
जे देवासि सुधा समर्पण करी, दैत्येश्वरा मोहुनी. ॥ २३
ते झाली तव वल्लभा, म्हणुनिया झालासि तेव्हां सुखी.
अर्धांगि घडोनियां मिरवला तुम्ही तदा चित्सुखी. ।
तीनें या तुज वैभवासि दिधलें दारिद्र्य तें खंडिलें.
ते माता अमुची तिच्याच सुरूपें ऐश्वर्य हें जोडिलें. ॥ २४
झाली साह्य म्हणोनि शक्ति तुजला आली वधाया अरी.
इंद्राच्या कुलिशा असाध्य हरिचा कुंठीत झाला अरी. ।
ता खड्गें मणिमल्ल दैत्य वधिला या म्हाळसेच्या बळें.
ता कीजे तरि काय कृत्य न कळे शक्तीविना दुर्बळें? ॥ २५
झाला कीं पुरुषार्थ सर्वहि तुझा तो आजि ठावा मला.
ते तुझी गृहिणी असे भगवती, जे का लता कोमला. ।
देवांनें तुज नाम रूप दिधलें, ते लोकिकीं रूढता
झाली; हें, त्रिपुरांतका, न विसरें घेवोनिया मूढता. ॥ २६
मोक्षाचा प्रभु दानदीक्षित खरा, स्वातंत्र्य तेथें तुला-
आहे साच; परंतु अद्भुत तिच्या कृत्यांसि नाहीं तुला. ।
ज्या जीवाप्रति मोक्ष देसिल तया देवीच क्रिया घडे.
ऐसें वेदमुखें अम्हीं परिसिलें. हे बोल, बा, उघडे. ॥ २७
तुझी भाज महालसा; घरधणी तू नागरा, जोगडा.
मीं झालों अतिदीन याचक तुझा. मीहूनि तूं उघडा. ।

मागणें तुज काय तें ? म्हणुनिया मौनासि म्या राहिलें
तूंही देसिल काय सांग मजला तूझें तुपें राहिलें. ॥ २८
आता व्यर्थ कशासि काय करणें वाग्जल्प हा आगळा. ?
दु:खें म्या बहु भोगिलीं म्हणुनिया दाटोनि आला गळा. ।
प्रेमें मी वदलोंच निष्ठुर तरी ता पाहिजे साहिलें.
दीनार्ते करुणाकटाक्ष करुनी ता पाहिजे पाहिलें. ॥ २९
शांतात्मा करुणानिधी म्हणविसी तू या जगीं एकला.
तें साचें करणें तुलाच पडलें, खंडेश्वरा, निर्मळा. ।
आहे ब्रीद तुझें, करीं जतन तू. दासाचिया संकटीं
टाकावीच उडी तुलाचि पडली, विश्वभरा, एकटी. ॥ ३०
मार्गेना तुज ईश्वरत्व अथवा साम्राज्य लोकत्रयीं.
नेच्छीं मी, विभु, सार्वभौम पदवी जे स्पृष्ट तापत्रयीं. ।
देई पादसरोजभक्ति अतुळा, हे एक वांछा मनीं.
यीं वाचोनि दिली तरी, पुरहरा ते मुक्ति मी ना मनीं. ॥ ३१
भक्तीचा महिमा तुझा न गणवे जन्माशतें धातया.
हे ज्याला फळली तुझ्याच करुणे, पूजीच वेदा तया. ।
यासाठीं, जगदीश्वरा, मज असो त्वद्भक्ति हे शंकरी.
सिद्धी सर्व इच्या पदीं विलसती, मुक्ती घरीं किंकरी. ॥ ३२
ज्या जन्मीं भजनीं तुझ्या मन रते, तो धन्य मानीं, भवा.
नेच्छीं त्वद्भजना विना हरिहरब्रह्मादिचिया वैभवा. ।
सारीं जातिल जें लयासि, निरखू, आम्हीं उरों सेवटीं,
हासों त्याप्रति भक्त हांडानि कसे ना वाचला संकटीं ? ॥ ३३
अव्यक्तीं लय पावला, पुनरपी व्यक्तीस येणें घडे,
ऐसें हें भ्रमणें तुम्हांसि पडलें, गीता वदे ऊघडें. ।
आम्ही भक्त तरोनि मायिकपदा, अव्यक्त ही जिंतिलें,
झालों चिन्मय मात्र भक्ति विभवें, श्रीभैरवा चिंतिलें. ॥ ३४
तेही शाश्वत जाहले, म्हणति कीं ना चिंतिला हैवती.
हे तों धन्य, सुभक्त, भक्तिविभवें आम्हा शिरीं राजती. ।
आम्ही ईशमदें भुलोनि पडलों अच्छिन्न मायाभ्रमीं.
यातायात पुन पुन्हा घडतसे आलातचक्रक्रमीं. ॥ ३५

आतां हे नलगे, म्हणोनि भजती त्वत्पादपद्मांप्रती.
भक्तीनें तरती, अनन्यगतिका, मायानिधी सांप्रती. ।
यासाठीं तव पादभक्तिमहिमा दावी तुझ्या चित्पदा.
त्वद्भक्तीविण सर्व देवपतिची दुःखाहि ते संपदा. ॥ ३६
तूं अव्यक्त, अनादि, निर्गुण, विभू, तूं शुद्ध, बुद्ध, स्वयें.
सद्रूपाप्रति जाणतोसि तुझिया तूं एकला निश्चयें. ।
मायातीत, विशुद्धसत्व असतां खेळों तुला आवडे,
तेव्हां निर्मिसि सर्व मायिकपदा बाळापरी रोकडें ॥ ३७
माया ते तरि अंगिकारुनि जगीं ईशत्व तूं पावसी.
मायाधीन तसा नटोनि बहुशा लोकापरी दाविसी. ।
आकाशादिक पंचभूतनिवहीं, मात्रामयीं, इंद्रियीं,
सूत्रात्माचि घडोनि वर्तसि, विभू पाहों असें निश्चयीं. ॥ ३८
वेदांतीं कथिलें तसेंचि कथितों , सर्वत्र तूं एकला.
तूं सारें नटल्यासि दाउनि तुझी ऐशी महाचित्कळा. ।
जें जें दृश्य दिसे, तुझेंचि विलसे हें रूप, सत्यात्मका,
मल्लारी, करुणावना, हयपती, चिन्मूर्ति, चिन्नामका. ॥ ३९
आतां तूज नमों नमो; पुनरपी साष्टांग तुला नमो.
सूक्ष्मा, तूज नमो नमो गुरुतरा, रूपा, अरूपा, नमो. ।
लोकातीत, नमो. तमात्पर, नमो. सर्वातिरेशा, नमो.
जेजूरीपुरनायकासि शतशा भैराळभूपा नमो. ॥ ४०
आतां तूं अपुले म्हणोनि जन कां पायां तळीं ठेविजे ?
तूझें जें निजरूप अव्यय असे, तें या दिठीं दाविजे ।
माझें निष्ठुर बोलणें सकळही, मायेश्वरा, साहिजे.
माझ्या हृत्कमळीं, परात्परगुरू, तां सर्वदा राहिजे. ॥ ४१
ऐसा हा स्तवराज माधवसुतें निर्मोनि पदांबुजा
केला अर्पण, दिव्यवाक्यलतिका वेंचोनि पद्मांबुजां ।
हे माळा जरि भक्तियुक्त धरिती कंठीं प्रमोदोत्करें,
खंडेराय दया करील करुणासिंधू सुधाशीकरें. ॥ ४२
त्यांतें हा भवसिंधु वत्स ३ पदसा होयील पादप्रवें.
ध्यावाहर्निश म्हाळसापति सदा प्रेमें महाउत्सवें. ।

वाचावा स्तवराज भाविक जनीं शार्दूलविक्रीडितें
भावें दिव्य निरंजनें विरचिला युक्ताक्षरें पंडितें. ॥ ४३
मल्लारीस्तव भक्तिमुक्ति फळ, दे सत्पुत्र, कन्या सती,
अष्टैश्वर्य, धनेशता, विपुल दे सत्कीर्ति ते शाश्वती, ।
विद्याभ्यासविनाचि लाभुनि घटे चातुर्यचिंतामणी,
दीर्घायुष्य, कलत्र सुंदर. मिळे त्रैलोक्य नारीमणी ॥ ४४
॥ इति श्रीमन्निरंजनमाधवविरचित मल्लारीस्तवराजा. ॥

---

## ( १४ ) श्रीराम जयराम जयजयराम स्तोत्र.

श्री ज्याची ललना, भुजग शयना, पुत्रत्व पद्मासना,
पक्षी तो वहना, समुद्र सदना, वाणी रती या सुना, ।
कंठी कौस्तुभ भूषणा, सुखघना प्राधान्य पंचानना,
सारें विश्वकुटुंब राज्य गणना, त्रैलोक्य नारायणा. ॥ १
राजे थोर धरातळीं अतितळीं ते रावणें जिंतिले,
स्वर्गीचे सुर गेहकार्य करणीं जेणें सदा योजिले, ।
पाताळीं उरगांगना हरुनिया चूडामणी घेतले,
द्वारीं नित्य उभे नवग्रह असे वंदीं किती घातले. ॥ २
मंत्राचें बळ राहिलें, द्विजवरीं यज्ञक्रिया टाकिल्या,
रोडले अमरेंद्र, भाग हरिता अग्नीं शिरा वाहिल्या, ।
धाकें कांपतसे सदा वसुमती भीवोनि त्या रावणा,
लोकीं अन्य कदा समर्थ न दिसे त्रैलोक्य संरक्षणा. ॥ ३
जेणें शंकर अर्चिला निजकरें वाहोनि दाही शिरें,
तेणें तुष्ट पिनाकपाणि वरदे वोपी तया सादरें, ।
स्वर्गीचे सुर यक्ष किन्नर महा दैत्येंद्रराजे बळी
ते होतील हतप्रभाव समुदे तूझ्या प्रतापानळीं ॥ ४
यक्षा जिंतुनिया न पुष्पक निधी घेवोनि गेला घरा,
आला ऐकुनि दिक्पती दशदिशा त्या टाकिती सत्वरा ।
स्वर्गीचे मणि पारिजातसमुदे लंकागणीं आणिले ,
धेनू, कामदुघा, हयोत्तम, करी, द्वारीं बळें बांधिले. ॥ ५




रागें रावण निंदिती सुरपती जावोनि विष्णूप्रती
  झालें वृत्त समस्तही विनविती, बोले तयां श्रीपती
  होतों दाशरथी, तुम्हीं वसुमती घ्या वानरांच्या कुशी,
  आहे दुष्ट किती ? वधोनि कुमती संतोषवूं ते क्षिती ॥ ६

मैत्री मेळविले अजात्मजकरीं संभार यज्ञीं वरा,
  तेव्हां राघव जन्मला, नृपातिला आनंद झाला पुरा, ।
  नेला अध्वररक्षणा मुनिवरें, मार्गी वधी ताटका,
  केली मुक्त पदीं चतुर्मुखसुता नामें अहल्या निका, ॥ ७

जनकनृपतिगेहीं भंगिलें चाप रामें, ।
  परिणिलि मग सीता देवता सार्वभौमे, ।
  पथि भृगुतनयाचा मान सिद्धीस नेला,
  रघुपति युवराज स्थापनें नेम केला; ॥ ८

यथातथ्य वाणी पित्याची कराया
  सवें घेतली जानकी भव्यकाया,
  त्वरें चालिला दंडकारण्यपंथें,
  जनस्थान गोदावरी तीर्थ जेथें. ॥ ९

जगन्नायकाची हरी धर्मदारा,
  दशग्रीव कापट्यवेषें उदारा,
  वधीं राम वालीस सुग्रीवसंगें,
  तरे वारिधी जाय लंके सवेगें. ॥ १०

येथें रावण घातला परिघ हा शाखामृगीं घातला,
  बांधाया गज मातला त्रिसगुणें इच्छा करी मातला, ।
  हा तो मानुप पूतला निजकरीं नाराच हा धूतला,
  वक्षीं तीखट रूतला कपितळीं पाडी न त्या भूतला. ॥ ११

रामासीं झगडावयासि निधडा लंकेश आला पुढां,
  रामें बाणसटा करोनि करडा त्या नाचवीलें धडा; ।
  सैन्याचा रगडा सवृक्ष दगडा ते हाणिती माकडा,
  वाहे रक्त कडाड रणदळीं केला शिरांचा हुडा. ॥ १२

मर्दी रावण कुंभकर्ण समरीं त्या मेघनादा सवें,
  सीता सोडविली बिभीषण पदीं संस्थापिला वैभवें;

आला तो शरयूतटासि भरता भेटे पुन्हां भूपती,
शोभे राज्यपदीं सुबंधुसह तो पूर्णेदु सीतापती. ॥ १३
ऐसी हे रघुनाथकीर्तनकथा शृंगारहारावळी
नामें मुक्तमणी चरित्र पदकें भक्तीसुतें गुंफिली, ।
कंठीं भूषण शोभतांचि सुटल्या त्या मुक्तियोषा वळे,
त्यांचा संग निरीक्षितांचि रुसल्या गेल्या कुबुद्धी पळें. ॥ १४
हे गाथा यश लाभ या क्षितितळीं मर्त्यांहि भेटवी,
मोठी रामपरायणासि पदवी वैकुंठिची दाखवी, ।
केली माधवनंदनें कविवरें मंत्राक्षरार्णांवळी,
तेरा गुंफुनि पावला गुरुकृपें धन्यत्व सन्मंडळीं. ॥ १५

---

## १५ श्रीविठ्ठलस्तोत्रम् ।

श्रीमत्त्रैलोक्यनाथा, त्रिभुवनजनिता एकला तूंचि होसी. ।
तुझ्या आंगींच सारें जग करुनि, पुन्हां पोषिता तूंचि त्यासी.
विश्वात्मा मी असेंही म्हणविसि, अगुणा, सूक्ष्ममायाविलासा,
सेंगें घेवोनि सारीं नटासि तुज नमो, पांडुरंगा, परेशा. ॥ १
ब्रह्मांडांचीं अनंतें वसति तव महारोमकूपांतराळीं;
ऐसा तूं भूमरूपी असुनि म्हणविसी मी त्रिलोकासि पाळीं. ।
तोही तूं गोपवेषा धरुनि व्रजकुळीं रक्षिसी गोधनातें.
आतां आलासि, देवा, वसतिस अमुच्या रक्षणा पंढरीतें. ॥ २
जेथें वाहे सुषुम्ना अमळ सुरनदी भीमरा पापभीमा,
तत्तीरीं वास तूझा अतिशय मिरवे, विठ्ठला, दिव्यनामा. ।
माझ्या निष्ठास्थ वीटेवरि तुज बरवें म्यां उभें साच केलें.
मद्विरें पुंडरीकें तुज, भुवन यशा, ये स्थळीं आळवीलें. ॥ ३
तूझें राउळ हें विचित्र विलसे हृत्पद्म मानों, विभू,
तेथें वास तुझा निरंतर असे, सर्वांतरस्था, प्रभू. ।
आत्मा ईश्वर तूंचि, बुद्धि बरवी तूझी प्रिया रुक्मिणी,
विद्या तेंचि परा, म्हणोनि घडली लोकत्रया स्वामिनी. ॥ ४

पंचप्राण; दशेंद्रियें सकळही गोपाळ, तुझे गडी.
माझे देहिक भाव सर्वहि तुझे सद्भक्त हे आवडी. ।
ध्याती ऽ हर्निश पूजिताति तुजला, 'सोऽहं' सुमंत्रावळी,
उच्चारोनि समस्त भोग विषया अर्पोनि पुष्पांजळी ।। ५ ।।
निद्रा हेचि समाधि, वंदन तुते लोटे तनू भूवरी,
सारी तेचि प्रदक्षिणा घडतसे संचार जो मी करीं, ।
वाचा हे सहसा तुझ्याचि करिते स्तोत्रासि, लक्ष्मीधरा.
आता तूंविण कोण आणिक असे मातें जगीं सोयरा? ।। ६ ।।
कृष्णा, गोदावरीही, सुरनदि, यमुना, नर्मदा, सिंधु, तापी,
कावेरी, ताम्रपर्णीहुनि बहुत असे हेचि भीमा प्रतापी. ।
हीच्या तीरीं, विभू, तूं वससिल सुजना पावना मुख्य हेतू.
येथें तूझा विराजे अमलयशपटें शोभला मोक्षकेतू. ।।७ ।।
विश्वात्मा तू, हरी तूं, त्रिभुवननुत तू, सर्व तूं, सर्वसाक्षी.
पृथ्वी तू, आप तें तूं, अनळ, मरुत तूं, व्योम तूं, विश्वकुक्षी. ।
इंदु तूं, पद्मबंधू पुरुष, तुज असें वानिती वेद चारी.
तूंही तसाचि सारा घडुनि विनटसी अष्टधा या प्रकारीं. ।। ८ ।।
तूं ब्रह्मा, सृष्टिकर्ता, म्हणविसी अपुल्या योगमायाविलासे.
पाळाया विष्णु होसी, हित मग करिसी प्राणियाचें विशेषें. ।
संहारात्मा पुन्हा तूं घडुनि विनटसी रुद्ररूपें क्षणार्धी
लोकातें विश्वरुपा धरिसिल उदरीं तूंचि अंतीं परार्धी ।। ९ ।।
सृष्टीचा खेळ कर्ता तुजविण दुसरा कोण आहे कळेना?
ब्रह्मा तो पुत्र तूझा म्हणति निगम ते, रुद्र नातू, सुजाणा. ।
सारे आंगीच तूझ्या विलसति सुर हे; भिन्न कोणी दिसेना.
तूझ्या साऱ्या विभूती म्हणुनि मिरवती, मुख्य तू देवराणा. ।। १० ।।
तूं कर्ता या जगाचा असुनि, म्हणविसी सर्वथा मी अकर्ता.
तूं योगें या जगातें धरुनि, म्हणविसी मी नव्हे यासि धर्ता ।
ऐशा तूझ्या व्यलीका समजुनि न कळे कोण जाणेल तूतें
यासाठीं वेद तेही म्हणति न समजे नाटका या विभूतें. ।। ११ ।।
का, बा, ऐसा जगातें ठकिसिल, न कळे तू जगन्नाथ होता.
आता कोण्या उपायें तरि तुज समजो? पाविजे जी अनंता. ।

माया तूझी विचित्रा; अमित गति तिची; तत्वता ते कळेना.
तीच्या अंतर्हितत्वें असंसि म्हणुनि तूं कोण हें आंकळेना. ॥ १२ ॥
आतां काशासि आम्हीं श्रम करुनि वृथा वेदकांतार ध्यावें?
कां शास्त्रांच्या शिलाही वरि वळवुनियां निर्गुणा तें पहावें. ।
आम्हीं प्रत्यक्ष देखों समचरण उभें रूप हें पंढरीशा,
सानें दर्शास वाटे परि नवल कसे भव्य सर्वा, सुरेशा. ॥ १३ ॥
तूं तों आम्हाचिसाठीं त्यजुनि वदरिकाधाम आलासि येथें.
ताराया या जडांतें; म्हणउनि वदती आठरा भाट जेथें. ।
दीनार्थी तीन मूर्ती घडुनि विलससी क्षेत्रतीर्थाभिधानें.
सद्रूपें देउळीं या निवससि भजती भक्त ते सद्विधानें. ॥ १४ ॥
भक्तीनें साध्य होसी, भजति म्हणुनिया भाविका सज्जनासी
भक्तीचा तूंचि दाता; जरि धरिसि मनीं तारिजे या जनासी. ।
भक्तीनें मुक्ति ते तो न चुकत घडते नेच्छिताही, दयाळा!
तें का आम्हीं चुकावें भजन न करिता विठ्ठला, लोकपाळा.॥१५॥
भक्तीची काय आता वदवल महिमा? ऐकतां चोज वाटे.
एका गंवारपणानें धरि तुज पदरीं कूवडी जात वाटे. ।
हेंही, देवा, असों दे. फुकट गवळणी बांधिती तूज दावें.
गोविंदा, काय त्याचें रिण तुजवरितें पूर्विलें हें वदावें. ॥ १६ ॥
हेही राहो यशोदा तुज, शशिवदना, अप्रमेया, विभूते,
वोसंगीं स्तन्य पाजी; वसति तव कुसीं थोरलीं पाच भूतें. ।
ब्रम्हांडें लक्षसंख्या नियतचि वसती रोमकूपांतराळीं,
ऐशातें पुत्रभावें निशिदिन कडिये घेउनी धन्य झाली. ॥ १७ ॥
तूं आनंदीं सुखाचा असुनि तव मुखा चुंबिते प्रेमभावें.
तूं तों विश्वाद्यकुक्षी; तुज धरि हृदयीं, भाग्य हें कैं वदावें?।
देवा गंगादिसिंधूजनक, तुज कसें न्हाणिते स्वल्प पाणी
घालोनी अंजुळीनें, नियत पदयुगीं घेउनी नंदराणी ? ॥ १८ ॥
तूं तों त्रैलोक्यरक्षामणि असुनि, करी तूज ते दृष्टिरक्षा.
आद्या, सर्वाश्रयातें, तुज तरि निजवी पाळण्यामाजि, दक्षा. ।
वेदांनियासि कैसी बहुबहुपरिचे हलरीं गीत गाते!
पाहा ज्ञानांजनातें नयनि निजकरें कज्जळा लेववीते. ॥ १९ ॥

श्रीलक्ष्मीच्या धवातें बहुत मणिगणीं भूषणीं भूषवीते.
वैरिंचायासि नाना कथुनि सुखकथा फारसी तोषवीते !।
त्रैलोक्यागासि कैसें अभिनव चिमणें आगडे लेववीते !
कैसें वा नित्यतृप्ता दधिघृतसहिता वोदना जेववीते ? ॥ २० ॥
पाजी स्तन्यासि, तेव्हां तव मुख निरखी; तें गळे दूध होटीं.
जृंभा देता निरीक्षी त्रिभुवन सगळें रम्य तूझ्याच पोटीं. ।
तूंही नाना प्रकारीं नटसम बहुशा दाविसी योगमाया.
मायातीता तुला हें उचितचि दिसतें, भंगणें भक्तमाया. ॥ २१ ॥
वैश्यां, शूद्रां, स्त्रियांतें, परम गति घडे माझिया भक्तियोगें;
ऐसें गतितें कृष्ण प्रकट निजमुखें अर्जुनालागिं सांगे. ।
तें मी प्रत्यक्ष पाहें, नरहरि, तुझिया पंढरीमाजि डोळां.
मुक्तीचें द्वार सोपें उघड दिसतसे सर्वदा भाविकांला. ॥ २२ ॥
क्षीराब्धीच्या पती तूं, तदुपरि धरणी पाळितां गोधनातें,
देसी तूं दुग्ध मातें, म्हणउनि धरिता पादपद्माश्रयातें, ।
तूं तो मोठाचि, देवा, ठक पण सहसा नेदितां, पांडुरंगा,
मातेचें दूध माझें सुलभ उडविलें कां पुन्हा सांग तूं, गा. ॥ २३ ॥
पोटीं ब्रह्मांडकोटी असुनि, न चढवे उंबरा गौळियांचा. ·
वेदांचा मूलवक्ता, परि वदसि मुखें बोबडी गोड वाचा. ।
त्रैलोक्याधीश्वरांचा अधिप, परि निशीं चोरिसी काय लोणी
ऐसी लीला स्वभक्तां निरखविसि, जगन्नायका, विश्वखाणी. ॥ २४ ॥
लोण्याची नित्य चोरी करिसि म्हणुनि तूं सांगती गोपदारा,
मोठ्या रागें यशोदा धरुनि करतळीं तूजला जैं, उदारा, ।
काठी घेवोनि हातीं, करिन म्हणतसे ताडणा; त्याच काळीं
भीतीनें वक्त्रपद्मा निरखिसि तिचिया साश्रुनेत्रीं विशाळीं. ॥ २५ ॥
नंदाच्या गेहपंकीं रमसि, नव जशी विप्रपागीं निशुद्रा
गायींच्या हुंबरातें प्रतिरव करिसी, बाहसी मौन वेदां. ।
गोपांच्या पुंश्चलींचा सकळहि करिसी आवडी गेहधंदा
आलें मातें कळों हें, वश घडसि खरें भाविकातें मुकुंदा. ॥ २६ ॥
गोपींची काय दर्षी प्रिय बहु तुजला लागली, गोपनाथा
अन्नाचा आजि मोठा दुकळचि पडला वाटतो साच आतां. ।

कोण्या प्रेमें तुला ते वश करिति ? मला सांग मीं त्या प्रकारीं
भक्तीनें पादपद्में भजुनि, करिन, जी, दास्य भावें, मुरारी. ॥२७॥
तेही दिल्हें तुला कीं तनु, मन, धन, तें साच निर्द्वंद्वभावें.
यासाठीं युक्त देवा. म्हणसिल पडेल चोज त्याचें करावें. ।
मीही सप्रेम नूतें सकळहि करितों अर्पणा पादपद्मा.
देई सुप्रेम मातें, त्रिभुवनविनुता, विठ्ठला, सौख्यसद्मा. ॥ २८ ॥
गोपाच्या रक्षणार्थी धरिति करतळीं थोरल्या डोंगरातें.
केलें ता भग्नदर्प त्रिभुवनविभवाधीश्वरा, वासवातें.
यासाठीं हेंच मातें नियतचि कळलें, दीनसंरक्षणार्थी ।
तुझी आहे प्रतिज्ञा, म्हणउनि भजतो भक्त भीमोक्षणार्थी. ॥२९॥
डोहीं जो सर्प होता बहु दिवस वळी सूर्यजेच्या, महंता
त्याच्या तीव्रा विषातें न सहुनि, घडसी तूंचि तद्गर्वहंता. ।
गोपांच्या सौख्ययोगास्तव करिसि असीं साहसें, चक्रपाणी.
रक्षावें तां अनन्याप्रति, करिसि यथातथ्य हे लोकवाणी.॥ ३० ॥
हेंही राहो, मुकुंदा, यमलनखरां तारिलें तां दयेनीं;
तेहीं, जी, काय केलें तव भजन, विभु, सांग मातें जडांनीं. ।
यशार्थी पूतनेतें परम पद दिल्हें, जें यशोदेसि द्यावें.
या औदार्यासि तुझ्या कवण तुळूं? बा, काय आम्ही वदावें? ॥३१॥
कष्टें मोठ्या तपातें करिति सनियमें पर्वतीं ते, वनातीं;
प्राणाचे रोध तेही करुनि निरशनें तीक्ष्ण पंचाग्नि घेती; ।
तेही तूझ्याच अर्थी श्रुतिगदित सदाचारकर्त्या नरातें
होईना भेट तूझी. परम यश दिलें भेटुनी वानरातें. ॥ ३२ ॥
यासाठीं भक्ति तूझी अतितर विलसे. श्रेष्ठ नेणोनि तीतें
माया ऽ हंकारयोगें करिति तव तरी पावतीना गतीतें. ।
विघ्नांच्या संकटीं ते पडति बहुतरा; भ्रष्टती साच अंतीं.
भक्तीनें विघ्न माथां पदकमळ सुखें ठेविलें जें महंतीं ॥ ३३ ॥
भक्तीनें श्रेष्ठ पार्थादिक बहु तरले. कीर्ति अद्यापि त्याची
तारी लोकासि, तूझ्या विमलगुणरसें रंगली भाविकांची. ।
नाना कष्टें उदंडें खळरिपुजनितें जिंतिलीं त्वत्प्रसादें.
त्यांचा तूं पक्षपाती बहुनि वसविलें त्वत्पदीं नित्य मोदें. ॥ ३४ ॥

वोडीं घ्याचीं तयाची, करण करि असे नीच सारथ्यकर्मी ?
उष्टींही काढिजे का परघरिं ? करणें काय त्या दौत्यधर्मी ? ।
मोठें तूझेंचि वाटे नवल अपुलिया लोपिलें ईश्वरत्वा
सद्भक्ताच्या प्रतापा मिरविसि, अमला, सादरें शुद्धसत्वा. ॥ ३५ ॥
पाचाळीची कितीदा परिहरुनि महासकटें लाज तीची,
ता, देवा, राखिली कीं विनययुत तुझ्या पादपद्मीं सतीची ।
अश्वत्थामास्त्रतापें जळत निरखिले, रक्षिलें गर्भवासीं
देवा, ता देवराता, मग अभय दिलें प्रार्थिता उत्तरेसी. ॥ ३६ ॥
गर्भी तूला निळोकी, मग पुसत असा कोण तू चक्रधारी.
माझ्या संरक्षणातें करिसिल ? बहुधा तूचि होसी मुरारी. ।
त्वद्भक्तीच्या प्रभावें जननिजठरिंच्या बाळकातें परीक्षा
झाली. तूझ्या कृपेनें नवलचि न घडे त्वज्जनातें, सुदक्षा. ॥ ३७ ॥
माता तातासि रागें त्यजुनि अनुसरे, पोळला वाक्यबाणे
पाचा वर्षा वयाचा तुज अनुसरला बाळ सेवोनि रानें ।
बैसे तूझ्याच पार्यीं ध्रुव धरुनि बरा घ्यानयोगासि सारी.
ता त्यातें श्रेष्ठ दिलें अचळपद तुवां, दीनपाळा, मुरारी. ॥ ३८ ॥
प्रल्हादातें पिता तो तव भजनरता प्राणनाशात दंडी,
नाना शस्त्रें, विषाग्नी, गिरि, निधि, सलिलीं, नागपाशात कोंडी ।
ना त्यागी भक्ति तूझी, म्हणउनि घडलें धावणें रक्षणार्थी
स्थूणागर्भासि येणें उचित, हरि, तुला स्वाश्रितापक्षपाती ॥ ३९ ॥
स्थूणा पैतामहीतें नियतचि घडली भामिनी ब्रह्मयाची
ऐशीं तूझीं चरित्रें अमित पदवतीं अद्भुतें केवि वाचीं ? ।
हें सारें भक्तियोगाविण घडल कसें ? साग तू , पाडुरंगा
धन्यातें प्राप्त झाली तव पदकमलीं जन्मदी भक्तिगंगा. ॥ ४० ॥
पूर्वीही शोध केला बहुत बुधजनीं वेदशास्त्र, विचारें,
देवा, ज्ञानाहुनीही अधिक निवडली भक्ति लक्षाप्रकारें. ।
या भक्तीच्या प्रतापें जडमति तरले, पावले त्वत्पदातें,
गोपी, गोपाळ, गायी, वनचर, फिरणें मागुती नाच जेथें. ॥ ४१ ॥
गोपी त्या कामबुद्धिस्तव रमति तुझीं जारभावें मुरारी
सत्यें गोपाळ तेही तवपदिं रतले देवयोग विचारी ।

पुत्रत्वें नंदगोपादिक बहु तरले पार्थ ते आप्तमार्गे.
　ज्ञातित्वें यादवातें नियतचि घडलें मुक्तिपंथासि जाणें. ॥ ४२ ॥
द्वेषें केशीककुद्मप्रभृति असुर ते पावले धाम तूझें.
　भीतीनें कंस तोही तव पदिं मिनला, टाकिलें भ्रांतिरोझें. ।
भक्तीनें नारदादिप्रियजन तरले; उद्धवाऽक्रूर तेही.
　कोण्या एक्या मिसेंही तुज भजति, तया कारणें साच नाहीं. ॥ ४३ ॥
दिल्हें बीभीपणातें सहज पद तुवा हेळणेनें, दयाळा;
　तें तों ब्रह्मादि देवां दशशिरहननें नेदवे रावणाला. ।
ऐसें औदार्य तूझें प्रकट त्रिभुवनीं, जाणता जो भजेना,
　या हानीहूनि हानी मग कवण असे? विठ्ठला, जाणवेना. ॥ ४४ ॥
नक्रें पायीं गजेंद्रा कवळुनि सलिलीं वोढिता, अन्य कोणी
　नाहीं रक्षावयातें, म्हणुनि तुज तदा चिंतिलें चक्रपाणी. ।
पद्मासी हस्तपद्मीं धरुनि करिं करा काढिलें देवराया.
　दोघे नेले विमानीं वसवुनि, करुणासागरा, मूळ ठाया. ॥ ४५ ॥
देवेंद्राच्या प्रसंगा निरखुनि, मुनिनें शापिली जे अहल्या,
　झाली मोठी शिळा ते, बहु दिवस वनीं राहिली वज्रतुल्या. ।
केली तें शुद्ध पादांबुजरजविभवें तत्क्षणीं पंकजाक्षी,
　ऐशी तूझी विचित्रा पदरजमहिमा वर्णितीं वेद साक्षी. ॥ ४६ ॥
पाप्यातें पुत्रमोहें सहज मुखपुटीं नीवता नाम तूझें,
　नेला वैकुंठलोका, अवगणुनी महापातकें दुःखबीजें; ।
ऐशी हे पद्मनाभा, वारिसि जरि मनीं दाविसी योगमाया
　नाहीं तें पुण्यकर्त्यां न दिसचि नयनीं एकदाही नगाया. ॥ ४७ ॥
वेश्या ते पापरूपा, नरकपुरमहाद्वारतुल्या, अमान्या,
　झाली तूझ्या कृपेनें अमळ अतिशयें, पिंगळा लोकमान्या, ।
ते गेली ज्या पदातें नवजाति नियमें हस संन्यास योगें
　त्वद्भक्तीचें सुरेंद्रा, फळ अतुळ असें, वेद सिद्धांत सांग. ॥ ४८ ॥
पापी ब्रह्मांडगर्भी मजहुनि दुसरा शोधिता आढळेना.
　म्या नाहीं पाप केलें जगिं कवण असे राहिलें; हें कळेना. ।
दीनानाथा, दयाळा, नरहरि, करुणासागरा, पापनाशा
　आलों मी पादपद्मा शरण परिहरीं यातना रुक्मिणीशा. ॥ ४९ ॥

तुझ्या, देवा, दयेनें अघटित घडतें. पाप तें पुण्य होतें
होतां तूझी उपेक्षा, सकळहि सुकृतें पाप होती यथार्थें. ।
यासाठीं भक्तिहीनीं करुनि शतमुखें भोंवती चक्रवार्ती.
भोगायालागिं जाती सुरयमसदनीं, मृत्युलोकासि येती ॥ ९० ॥
यासाठीं भक्ति देई तव पदकमळीं सर्वदा, देवराया.
भक्तीच्या या प्रभावें तरुन अतिशयें दुर्धरा विष्णुमाया. ।
दारापुत्रार्थ गेहीं दृढ जड ममता पाशविच्छेदकारी.
देई विज्ञान तूझें मज, जगतिपती, मुक्तिदाता, मुरारी. ॥ ९१ ॥
आधीं वैराग्य यावें, दृढतर विषयीं तुच्छता होय जेणें.
नेच्छीं मी स्वर्गलोका, विमल विधि यदा; नागवंतासि जाणें ।
भक्तीच्या या सुखातें विधिपदसुख तें षोडशांशा मिळेना.
तेव्हां तें काय कीजे मज सुरपदवी निंद्य ते का जळेना. ॥ ९२॥
प्यालों त्वद्भक्ति दिव्यासव, मज घडली मत्तता; मी गणेना.
आतां कोण्या सुखातें. तुजविण दुसरें साच चित्तीं स्मरेना. ।
गेलें कर्माख्य माझें वसन गळुनियां; त्वत्कृपे मुक्त झालों.
लोकाची काय आतां मज गरज? विभु, विठ्ठला, मी बुझालों. ॥९३॥
चित्तीं चिंता कशाला मज ? तुज असला मस्तकीं स्वामि जेव्हां.
ना लोकीं मी धनांधा कुमति नृपगणा मंदभाग्यासि तेव्हां. ।
लक्ष्मीचा कांत माझा जनक, जननि, तूं इष्ट, बंधू, उदारा.
दाता सर्वा सुखाचा असुनि फिरन मी काय दुर्भूपदारा? ॥ ९४॥
तूं चिंतारत्न माझें; परिहरिसि, हरी पापिणी घोर चिंता.
तूं माझी कामधेनू; सकळ पुरविसी काम माझे, अनंता. ।
तूं माझा कल्पशाखी; सकळ करिसि तूं पूर्ण साथी विशाला.
मी तुझ्या सर्वभावें शरण पदयुगा. अन्य इच्छूं कशाला? ॥९५॥
आतां साष्टांग माझें नमन तव पदीं, भानुकोटिप्रकाशा,
विश्वाद्या, विश्ववंद्या, विमलगुणमया, विठ्ठला, इंदिरेशा. ।
केलें म्यां स्तोत्र भावें अतिजड मतिनें. सादरें अंगिकारीं.
प्रेमाचे बोल माझे अखिलजननुता, विश्ववंद्या, मुरारी. ॥ ९६ ॥
या स्तोत्रातें पढे जो तव पद निकटीं भक्तिभावें त्रिकाळीं,
या लोकीं पूर्ण पावे सुख, विभव; पुढें मुक्ति देवोनि पाळी. ।

गोपाळा. हेंचि माझी अनिशय विनती. साच कीजे, कृपाळा.
हासां साभाळकर्ता तुजविण न दिसे, दीनबंधु, निराळा.॥ ९७ ॥
श्रीमाधवात्मज निरंजन राजयोगी
स्तोत्रें स्तवोनि विभु विठ्ठल, मुक्ति भोगी. ।
स्तोत्रें सुधी पढुनि केवळ सौख्य पावा. ।
वामरत्नदीप उजळा तुम्हि, देवदेवा. ॥ ९८ ॥
इति श्रीमत्कविनिरंजनमाधवविरचित पांडुरंगस्तोत्र.

---

## १६ सांबशिवाष्टक.

( इंदुवदना वृत्त. )

काय करि काळकलि नीलगल चित्तीं ?
व्याल जरि वाळभरि वेसुनि निवांतीं ।
भालशिखि वालशशिमंडण भजा रे
सांब शिव सांब शिव सांब शिव गा रे. ॥ १ ॥
गांगजळ, बिल्वदळ, तंदुलतिलांनीं,
कोकनद, कुंद, करवीर, कुसुमांनीं ।
धूपबलिदीपयुत अर्पुनि पुजा रे
सांब शिव सांब शिव सांब शिव गा रे. ॥ २ ॥
देववर भीतिहर शंकर उमेशा
कामरिपु कोमलमनोज्ञतरवेषा ।
शूलवरखड्गधनुहेतिधरणा रे
सांब शिव सांब शिव सांब शिव गा रे. ॥ ३ ॥
पर्वतसुतारमण शर्व सुखरागी
दीनजनपालनसमर्थ विपदांसी ।
नामुनि निजात्मपद देत सुजना रे
सांब शिव सांब शिव सांब शिव गा रे. ॥ ४ ॥
भति अति शुभ्र विभुचर्चित निजांगीं
शारदपयोदनिभ भासत सुयोगी ।
कृत्तिकृतवास अनिनाशक भजा रे
सांब शिव सांब शिव सांब शिव गा रे. ॥ ५ ॥

मूळ अमरांसि अमरागसम पाहा
कामित मनोरथफलासि पुरवी हा. ।
नामजपमात्र करितांचि मनुजा रे
सांब शिव सांब शिव सांब शिव गा रे. ॥ ६ ॥
निर्मळ पदांबुरुह अर्चन परातें
पूर्ण पददान करणार विभु हातें ।
हाचि परमेश परतत्त्व समजा रे
सांब शिव सांब शिव सांब शिव गा रे. ॥ ७ ॥
इंदुवदना अनुपमान ललितांगी
कल्पलतिकासम अखंडित आलिंगी ।
तीचि कुळदैवत तया शरण जा रे
सांब शिव सांब शिव सांब शिव गा रे ॥ ८ ॥
सांबशिवपावनसुधाष्टक बनाजी
किंकर सदंतर रचोनि पद पूजी ।
पाठ करितील शिवभक्त जरि भावें
मुक्तिनवरी वरिल शंकरानिभावें ॥ ९ ॥
**इति निरंजनमाधवविरचित सांबशिवाष्टकं.**

---

## १७ देवी अष्टक.

( कुसुमशरवृत्त )

अमित शशिदिनरमणसम सुभगतेजा
कनकनिभतनु अरुणतर करसरोजा ।
अतिमधुरधनुकुसुमशरविधृतपाणी
नमन तुज नमन तुज सविनय भवानी ॥ १ ॥
नवतरुणमदभरितगजगति सुवेषा
ललितमुख निबिडमुख परिमित सुहासा ।
चकितमृगशिशुनयन विजितपिकवाणी
नमन तुज नमन तुज सविनय भवानी ॥ २ ॥
असुरकुळदहनकर निशित करवाला
धरिसि अरितिमिरहर मिहिरसम शूला ।

अभयकर विपद्गिरिभिदुर कर दोनी
नमन तुज नमन तुज सविनय भवानी ॥ ३ ॥
तव भजनरत तरति भवजलधि आधी
पूजिति जरि सुमनफलजलमहतु कायी ।
पदकमळ अतिविमळ जपति मुनि मौनी
नमन तुज नमन तुज सविनय भवानी ॥ ४ ॥
गुणचरित मुदभरित नियत पटती जे
त्रिविध परिजनन रिपुहननमहिमा जे ।
श्रवणपर सुजनवर परिसति सुकानीं
नमन तुज नमन तुज सविनय भवानी ॥ ५ ॥
श्रुतिवदन भणति असि पद भजनशीला
द्रुहिणमुख्यअमरपद बहु सुलभ त्याला ।
म्हणुनि घडि घडि घडाते निरत शिवराणी
नमन तुज नमन तुज सविनय भवानी ॥ ६ ॥
अतिकरुणदिठि करुन निरखि मज माये
लघुतनय गतविनय तारिं शुभकाये ।
सदय करिं हृदय वरि पुरवुनि शिराणी
नमन तुज नमन तुज सविनय भवानी ॥ ७ ॥
शरण तव चरणयुगाविण क्षणिक काहीं
मज अखिल भुवनिं सति गति दुसरि नाहीं ।
अज अवक अमृतघन वरससि कृपेनीं
नमन तुज नमन तुज सविनय भवानी ॥ ८ ॥
जगजननि नुति अतुळ पदजलज भाळा
धरिल नर सतत तर परम पद त्याला ।
विमळ मति दृढ करुनि विहित समजा जी
विनवि निजगुज सुजनिं कविवर धनाजी ॥ ९ ॥
कुसुमशरमर्दनें निर्मिलें अष्टकानें
पटुनि नियतिपारा दृष्ट उत्कृष्ट हातें ।
चहुंविध पुरुषार्थी पावती भक्तिमता
म्हणुनि अविरभणा निर्मितो अभिमाना ॥ १० ॥

## १८ ॥ श्रीसांबशिवध्यान ॥

श्रीमद्दैश्वर भूतनाथ, भगवान्भर्गा, भवानीपती,
भोगींद्राभरणा, भवाभवभयच्छेदा, सुभव्याकृती, ।
भीमा, भर्ग गिरीश, भूतिनिलया, भस्मांगरागप्रिया, ।
भाळाक्षा, भ्रमनाशका, तुज नमो भक्तार्तिहा, स्वामिया. ॥ १

कैलासाचल वंदितों कलिमल ध्वंसावयाकारणें,
जेथें सुं.र कल्पपादपवनें तीं शोभती पावनें. ।
चिंतारत्नशिलामला विलसती त्रैलोक्यचिंताहरा
तेथें मी नमितों स्वभक्तिमनसें न्यग्रोध विश्वेश्वरा. ॥ २

वेदी वेदनुता विचित्र विलसे, वज्रोपलें निर्मिली.
वैडूर्ये विमलें विशेष रचिली सोपानमाला भली. ।
वापी दिव्य सुधोपमान सलिलें शोभे जया सन्निधीं,
पद्में फुल्ल सुवर्ण केशरयुतें जीमाजि लक्षावधी. ॥ ३

द्वारीं पद्मकशंखमुख्य नवही त्यां ते निधी वंदिले.
तेथें दिक्पति अष्ट अष्ट ककुभे सन्नद्ध ते पूजिले. ।
गंधर्वादिक सिद्ध किन्नर, तशा त्या अप्सरा सुंदरी,
रंभाउर्वसिमेनकादि करितीं गानें महासुस्वरीं. ॥ ४

जेथें नारदतुंबरादिक उभे, सानंद वीणा करीं;
गातीं सुस्वर सामगामसवनें सानंदले अंतरीं. ।
जेथें सिद्ध शुकादि मुक्त वसती व्यासादि सारे ऋषी.
मार्कंडेयकुमारमुख्य नमिले दिव्योच सन्मानसीं. ॥ ५

जेथें रावणबाणमुख्य गण ते चंडीश नंदीश ते.
हातीं कांचनदंड तिष्ठति महाद्वारीं सदां धीर ते. ।
पाहें मी प्रमथादि भूतगणही, वेताळ, मात्रावळी.
तेहीं सायुधवाहनें विलसती त्या वंदिले त्या स्थळीं. ॥ ६

श्रीमद्भास्कर दिव्यरूपवर हा रश्मी सहस्रें वरा;
जो का सर्व दिशा प्रकाशित करी दे दृष्टि निद्रातुरा; ।
त्रैगुण्यात्मिक कर्म कारण निधि सृष्ट्यादि लीला सजी;
त्यां भावें नमिलों प्रजाधिप उभा संबद्धहस्तांबुजीं. ॥ ७

ब्रह्माणीसह वद्वपाणिपुटकें ब्रह्मा, उभा सन्मुखीं,
स्तोत्रें तोषवितो शिवा श्रुतिशिरें वर्णोनि च्यारी मुखीं ।
हंसारूढ कमंडलाक्ष, वटिकासंयुक्त दक्षांतरें
विज्ञानांबुधि आदिदैवतगणा म्यां वंदिला सादरें. ॥ ८

लक्ष्मीकांत खगेंद्रवाहन पुढें तिष्ठे सदां सांवळा.
कंदर्पायुतसुंदराकृति दिसे देवेश सर्वांगळा. ।
हस्तीं अंबुज, शंख, चक्र, बरवी कौमोदकी सुंदरी;
कंठीं कौस्तुभरत्न दिव्य मिरवी; म्यां वंदिला श्रीहरी. ॥ ९

जो साक्षाद्वृषरूप धर्म विलसे सानंद नंदी पुढें.
जैसा तो स्फटिकाद्रि, उन्नतमहाशृंगें मना आवडे ।
घंटा किंकिणिका गळा विलसती सेव्या पदीं नूपुरें;
दों कर्णीं चवरें विराजति असा म्या वंदिला सादरें. ॥ १०

तिष्ठे श्रीगणनाथ कुंजरमुखें, जो विघ्नहर्ता विभू.
सिंदूरारुण अंगराग मिरवे सर्वायुधासीं प्रभू. ।
भाळीं चंद्रकळा, भुजंगम गळा, जो उंदिरीं शोभला,
भक्ताभीष्ट समस्तही पुरविता चिंतामणी वंदिला. ॥ ११

साक्षाच्छंकरपुत्र षण्मुख पुढें. माता पिता तोषवी.
बालादित्यसमप्रभाव विलसे लीला स्वयें दाखवी.
सेनानी, शिखिराजवाहन, पहा सच्छक्ति शोभे करीं.
ब्रह्मचारी अभिवंदिला निजहिता चिंतोनियां अंतरीं. ॥ १२

श्रीसिंहासन कोटिभास्करकलानाथापरी भासतें.
नक्षत्रासम मौक्तिकस्तबक युक्त सन्मंडपें शोभतें. ।
पाहा रत्नवितान हें विलसतें मंजिष्ठवर्णावरीं.
तें म्यां वंदियलें. अभीष्ट फल दे भक्तांसि सर्वांपरी. ॥ १३

तेथें आसन रक्तकंजळ महाचित्रें विचित्राकृती.
पाहा त्यावरि पद्मकोमलदळें दाहा शतें शोभती. ।
वामांकीं गिरिजासमेत निवसे शंभु जगाचा धणी
तो म्यां सादर वंदिला अभय दे भक्तांसि लोकाग्रणी. ॥ १४

देवी सुंदर पर्वतेंद्रदुहिता, नामें उमा, शंकरी,
कामाक्षी, कमलानना, भगवती जे सर्वभूतेश्वरी. ।

नानारत्नविभूषणें विलसती दाळिंबपुष्पापरी.
: कृष्णा ब्रारिक नेसली कुचतटीं ते कंचुकी साजिरी. ॥ १५
माथां नील गुडाल्कें मिरवती, रोलंब पक्षावरी
मध्यें रत्नकपंक्ति रम्य विलसे अत्यंत शोभाकरी ।
तेही सिंदुररेख सुंदर दिसे संयुक्त मुक्तास्रजें.
भाळीं भांगटिळा विचित्र झळके, साम्यासि येना दुजें; ॥ १६
वेणी रम्य विराजली नवमणिश्रेणीगणीं शोभली
जाळी त्यावरि सिंधुसंभव महा सन्मौक्तिकीं निर्मिली ।
भाळीं तें सिसफूल, चंद्र मिरवे अर्धेदुखंडापरी.
नक्षत्रासम भोंवतीं विकसलीं मुक्ताफळें साजिरीं. । १७
शोभे अष्टमिच्या शशांकसम तें सद्भाळ हें; त्यावरी
साजे हा मृगनाभिबिंदु बरवा पाहा कळंकापरी ।
कामाच्या धनुषाकृती विलसती त्या भोंवया साजिऱ्या
नाराच्यापरि पक्ष्मपंक्ति दिसती अत्यंत या गोजिऱ्या. ॥ १८
नीळांभोजसमान नेत्रयुगुलें आर्वीच होतीं बरीं.
पाहा त्यावरि अंजनें कृत दिसे शोभा अनंतापरी ।
बाणातें गरळेंचि माखुनि जसें त्या मन्मथें ठेविलें
शंभूच्या हृदयारविंददळणा शस्त्रासि या निर्मिलें. ॥ १९
पाहे भक्तजनां कृपार्द्र नयनें, कूर्मी जशी बाळकां,
हे ही त्याचपरी त्रिलोकजननी अंबा जगत्पालका. ।
कारुण्यामृतवृष्टिवर्षण करी या दृष्टिधाराघनीं, ।
लोकानुग्रहकारणी, भगवती, माहेश्वरी, पावनी. २०
आकर्णांत विशाल रम्य दिसती भावे अनेकापरी.
संपूर्णानन चन्द्र त्यावरि दिसे हे चित्र शोभा वरी. ।
सौंदर्याब्धिमाजि शुक्तिशकलें हे श्रोत्रयुग्में वरीं.
मध्यें मुक्तमणी यथांत दिसती बाळ्या फुलें साजिरीं ॥ २१
रत्नाच्या बुगड्या अपूर्व रचिल्या, तें भोंकर सोज्वळें,
हीर चंद्रसमान तें मिरवती ताराकृती केवळें. ।
ताटंकें मणिमंडितें मिलसती सद्रत्नकर्णद्वयें
कामाचा रथ चक्रपंकज, तया चक्रें तसीं निश्चयें. ॥ २२

आहे नासिक कीरतुंडसम हें, कीं नीट चापेकळी,
किंवा हें तिळपुष्प काय म्हणिजे ? शोभा दिसे आगळी. ।
तैंही केसरयुक्त फार मिरवे त्या ओष्ठबिंबावरी.
मुक्तामाणिकहेममिश्रित दिसे दैत्येंद्रचापापरी. ॥ २३
आधीं ओष्ठ सुसूक्ष्म पल्लव तसे, तांबूल रागें अती
झाले शोण; अनेन हे विलसती बंधूकपुष्पाकृती. ।
मध्यें दाडिमबीजपंक्तिसम तें दंतावळी शोभली;
किंवा मौक्तिकपंक्ति वक्त्रकमळीं उत्पन्न हे जाहली. ॥ २४
शोभे हें अतिहास्य मंदवदनीं अतस्थ मुक्तप्रभा.
साम्यें शुभ्र अतीव हे विलसते अन्योपमा दुर्लभा. ।
माणिक्योत्तम कंदुकासम पहा साजे कपोलाकृती;
किंवा पंचशरें विधान रचिलें तारुण्यरत्नाप्रती. ॥ २५
लावण्यामृतपात्र कीं चुबुक हें; लावण्यपेटी हनू.
मुद्रा गोंधुनि मन्मथें विरचिली ऐसेंचि आम्ही गणूं. ॥
किंवा श्रीमुख आरसा, चुबुक हें दांडी तयाची खरी.
पाहवें जरि वाटतें शशिधरा, हस्तें ययातें धरीं. ॥ २६
वाणी हे पिकनायकाकलसमा, माधुर्यता, शोभली.
रेखा कंठगता विचित्र विलसे जे का त्रिभंगें भली; ।
किंवा हे अमृतौषधी शुभलता ग्रीवेसि वेष्टीतसे.
कंदर्पज्वर तप्त शंकर तया सौख्यप्रदा होतसे. ॥ २७
बाहू कोमल हेचि नाळ कमळें, पाणीतळें शोभती.
पाकोळ्यासम अंगुळी विलसती हस्ताब्जकोशाकृती. ।
चंबाया नळिनीस चंद्र बहुधा रूपें धरी ज्यापरी,
तैसी हे नखचंद्रपंक्ति उजळी दाही दिशा सुंदरी. ॥ २८
केयूरें, वलयें, विचित्र परिचीं, तें भूषणें शोभती.
रत्नाच्या विविधा परी विरचिल्या सामुद्रिका ज्यासती ।
आरक्तें अति रंगिलें दिसाति तें बाळारुणाचे परी.
भक्ताचे परि कल्पकाचि उदया हे आणिती सत्वरी. ॥ २९
वक्षीं बाळ करींद्रकुंभसमना, वक्षोज हे शोभती;
किंवा हे कनकाचलात्मज भयें इंद्रालया राहती. ।

ज्यांचें गोपन हे करीं स्वपदरीं झाकोनि अत्यादरें
कैसें या शरणागता न धरिजे ऐशा कृपेच्या भरें; ॥ ३०
किंवा हे घटकांचनी भरुनियां पीयूष देवाविषें
आहे ठेवियले, असेंचि दिसतें पाहा महासाक्षपें. ।
जे हाळाहळतप्त शंकर घडे, तें या कुचाळिंगनीं
व्हावी शांति म्हणोनि निश्चित असें वाटे कवीच्या मनीं ॥ ३१
किंवा सूर्यशशांकमंडलयुगें राहूभयें ये स्थळीं ।
आलीं कीं वसतीस काय न कळे राहावया निश्चळीं.
पाहा हो शिरहल्मरोज विकसे; ज्यातें दिठी देखतां,
किंवा नेत्रचकोर तृप्त घडती नोहे वृथा हे कथा. ॥ ३२
नाना तें पदकें असोलमणिचीं मुक्ताफळांच्या स्रजें
केले भूषित कुंकुमाक्त मकरीं पत्रें यया चित्रिजे. ।
कीं हे मन्मथभंगरीं रणवरें जाणोनि धाता यया
ठेवी साच पुढें, करोनि वरवें काठिण्य देखोनियां. ॥ ३३
यातें वेष्टिलसे सदा भगवती रत्नांचिये कंचुकी;
हे तों मन्मथकोश रक्षण किजे ऐशापरी कौतुकीं. ।
या अत्यंत कृशोदरीं त्रिवळिका, पाहा, कशा शोभती, ।
जैसा रोमलतेसि मंडप दिजे पाचावया उन्नती. ॥ ३४
नाभी हा अति निम्न काय म्हणिजे हें तों सुधावापिका ?
जेव्हां मन्मथभंग होत समरीं येथें वडे जीविका. ।
नोहे हें शिखिकुंड धूम्र उठिल्या रोमावळीच्या मिसें,
कामी होमिति ये स्थळीं नियत तें हव्यें तसीं मानसें ॥ ३५
पाहा हा कटि सूक्ष्म फार मिरवे पंचास्य मध्यापरी,
किंवा हे तरि विश्वकर्म पुतळी निर्मोनि मुष्टी धरी; ।
तेव्हां बारिक माज साच घडला मुष्टींत हा मातसे,
नाहीं अन्य कदापि यासि उपमा याची ययाला असे. ॥ ३६
पाहा स्थूळ नितंब वाटति मला मातंगगंडस्थळें;
येथें सिंहभया त्यजोनि असती आंगीं यिच्या निश्चळें. ।
रंभास्तंभसमान हे जड कवी ऊरुद्वया मानिती;
हे ऐरावतपोतशुंड, परि हे नम्रार्द्रवें शोभती. ॥ ३७

जानू रत्नकरंडमंडित महा साजे विमानापरी,
　देवी सौष्ठव तें हरोनि भरिलें भंडार याभीतरीं. ।
जाणों वासवगोपवर्ण रचिल्या सत्कामतूणीरशा.
　जंघा शोभति मंगलप्रद जना, ध्याती सदा सद्दशा. ॥　　३८
घोटे तों कुरविंद पाटल तसें वर्णं वर साजती.
　टाचा पद्म, पराग, विद्रुमतशा सव्यारुणा जिंतिती. ।
कूर्माग्रांतुनि उन्नता भरिनि ते पादांबुजाचें फळें,
　श्रीचें हें सुखधाम होउनि कसें लोकत्रयीं शोभलें. ॥　　३९
साजे हे नखदीप्ति, भक्त हृदयीं तामिश्रसंहारिणी
　चित्ताभीष्ट समस्त पूर्ण करुनी सज्ञान दे पावनी ।
लोकानुग्रहकारणींच धरिली गात्रें विचित्रें असीं
　भावें सज्जन सन्मुनी सुनियमें ध्याती सदा मानसीं. ॥　　४०
वज्रा ऽङ्कुश ऊर्ध्व रेखसहितें चिन्हें पदीं शोभती
　त्रैलोक्येश्वरनायका म्हणुनिया लोकत्रयीं दाविती ।
शंभूचें मन मोहिलें पर शिवा सौंदर्य ऐसें जरीं
　ईची काय तुला करील वनिता वर्णावया दूसरी. ॥　　४१
लावण्यांबुधिमाजि हा उपजला संपूर्ण तारापती,
　अंबेच मुख हें घडोनि जगतीं पावे महा उन्नती ।
लक्ष्मी तों वदनारविंद भुवनीं राहे सदा सुंदरी
　आहे दिव्य सुधा करोनि रमती या रम्य ओष्ठ तरीं ॥　　४२
शोभे कार्मुक भ्रूलता घडुनिया हे कामधेनू दिठी
　दोर्वल्ली वडलीच कल्पलतिका सद्भावनांची मिठी ।
याचा सोदर कंबु घेउनि असे हे दिव्य कंठाकृती
　क्षीराब्धीतनुजासि मुख्य वदनी हे साचिली निश्चिती. ॥　　४३
मातंगी गमनाधिकार करुनी यीच्या पदीं राहती.
　रंभा हे ऊरुयुग्म साच घडली देखीं तदीयाकृती. ।
विस्तारें नभगंगा यीच्या मदनगर्वा पाहा सदा राहिला,
　त्याचा दिव्य महाप्रभाव समुहा भक्तीं असें पाहिला ॥　　४४
रत्नाकधर नम्रता धरितसे उन्नै श्रजा येपरी
　देवी हे तरि पारिजातकुसुमामोदासि देई धरी ।




ससारभयनाशना घडतसे प्रत्यक्ष धन्वतरी
गश्रद्धापर दुष्ट कामिकमना मोही सुवेच्यापरी. ।
अज्ञानांधजनार्थ हे धरितसे सत्काळकूटक्रिया
मृत्यूपासुनि मृत्यु पावनि, करी हे सज्जनातें दया. ।
हा सद्रत्नसमूह सर्वहि जिच्या आंगींच राहे सुखें
झाली हे शिववल्लभा म्हणुनियां गाती श्रुती हें सुखें. ॥ ४६

ऐसें सुंदर साहजीक विलसे हें रूप लोकोत्तरीं;
याहीमाजि विशेष भूपणगणीं अत्युन्नतीतें वरी. ।
केयूरें, वलयें, अनेकपारिचीं जांबूनदें, माणिकें,
मुद्रा, हार गळां, सरत्न पदकें सवेष्टिलीं मौक्तिकें. ॥ ४७

ऐशी हे हिमशैलजा विलसली जैशी लता कांचनी,
किंवा ही चपळत्व टाकुनि धरी सन्मूर्ति सौदामिनि. ।
श्रीकंठांकमहासनीं मिरवली त्रैलोक्यराजेश्वरी,
ते म्यां सादर वंदिली भयहरा, अंबा, महासुंदरी. ॥ ४८

आतां शंकर वंदितों सुरतरू, भक्तार्तिसंहारिता,
ज्यातें वेष्टितसे सदां भगवती श्रीशैलजा विल्लता. ।
विश्वाभीष्टफलप्रदानकरणीं उद्युक्त जो सर्वदा,
जो कां दीनजनावनीं विमुखता घेवोंचि नेणे कदां. ॥ ४९

कर्पूराद्रिसमान गोर विलसे चिन्मात्र दिव्याकृती,
किंवा हा शरदभ्रशुभ्र मिरवे रूपें यथा निश्चिती. ।
वामांकीं विलसे जया गिरिसुता नैश्चल्यसौदामिनी,
प्रालेयाचलअंकमंडित जसी सानंद मंदाकिनी. ॥ ५०

माथां दिव्य जटा सुवर्णरुचिरा या राजती सुंदरा,
बालादित्यकळा जशा मिरवती मूर्ध्नी महामंदरा. ।
तेथें दिव्य शशांकखंड विलसे तें पुंडरीकाकृती,
जें कां शोभवितें मला गमतसे गंगांबुपेयाप्रती. ॥ ५१

तें विस्तीर्ण कपाळ फारचि दिसे, रेखा अनेका धरी;
मध्यें पावकनेत्र तो विलसतो शोभा दिसे साजिरी. ।

क्षीराब्धीलहरींत युक्त दिसतो औरोग्नि संदीपला;
येणें कामपतंग दुर्धर महा तात्काळ विध्वसिला. ॥ ९२

हें आस्यांबुज रम्य; त्या वरि दिसे भृंगावळी देवडी;
भ्रूयुग्में अतिनीळ तें विकसली पाहों अम्ही आवडी. ।
हा रातोत्पळपत्रताम्रनयनें भक्तार्तितापा हरी,
कारुण्यामृतवृष्टि पूर्ण अपुल्या अंतःप्रसादें करी. ॥ ९३

शोभे सुंदर नासिका तिळसुमा जिंतोनियां नेटकी,
किंवा ते शुकतुंड नीट म्हणती त्यातें प्रभावें टकी. ।
विश्वोत्पत्तिक सूत्र काय धरिलें देवें स्वनासा मिसें
हा विश्वस्रज आपुल्याच विभवें सद्रूप हे घेतसे. ॥ ९४

दोन्ही दिव्य कपोल ते मिरवती आदर्शबिंबापरी
कर्णी कुंडलि, कुंडलें विलसती, रत्नें अनर्घ्यें शिरीं. ।
ओष्ठीं पल्लवराग पूर्ण दिसतो संपक्व तुंडीफळें,
किंवा विद्रुमखंड हे मिरवती माधुर्यधारागळें. ॥ ५५

मध्यें कुंदकळ्यांसमान वरवी बारीक दंतावळी
किंवा हीरकपंक्ति रम्य मिरवे सर्वप्रभां आगळी. ।
कदर्पायुत कोटिचंद्र सगळे वोंवाळिले ज्यावरी
ऐसें सुंदर आस्यपद्म विभुचें अत्यंत शोभा भरी. ॥ ५६

कंठीं नीळमणीसमान वरवें ते क्ष्वेड साजे जया,
कस्तूरी धरिली विलासविभवें तैसें दिसे स्वामिया. ।
ऐशीं पंचमुखें बरीं विलसती, देवांत पंचास्य हा;
यासाठीं सुर सर्व यासि नमिती, सर्वांहुनी श्रेष्ठ हा. ॥ ५७

देवांचा विभु, आदिदेव म्हणती, गाती श्रुती सादरें.
श्रीपादांबुजरेणु दिव्य धरिती ते मस्तकीं भास्वरें. ।
दाहा बाहु करींद्रशुंडसमता आजानु ते शोभती.
भक्ताभीष्ट समग्र पूर्ण करिती कल्पागशाखास्थिती. ॥ ५८

घंटा, पट्टिश, शूल, सन्मृग, करीं डौरासि एकें धरी,
दीं हस्तें वरदाभयासि विवरी, खट्वांगही आदरी. ।

एकें बाण, पिनाक सज्जुनें धरी, तें खड्ग साजे करीं,
ऐसे हे दश हस्त सायुध वरी ध्यां ध्याइजे अंतरीं. ॥ ५९
जें अत्यंत विशाळ वक्ष विलसे नक्षत्रलोकापरी,
जे कां दानवदैत्यशस्त्रकिण ते शोभा उडूंचीं वरी. ।
दीजे या उदरासि एक उपमा अश्वत्थपर्णी जरी
ते तोंही न; म्हणोनि लज्जित घडे माझी तदां वैखरी. ॥ ६०
त्रैलोक्याश्रय कुक्षि विस्तृत तया अन्योपमा ते नसे,
देती सत्कविराज भाविक बळें चित्तास माने तसें. ।
नाभी हा अति खोल फार दिसतो पाताळलोकापरी,
तेथें कुंडलिका निवास करिते ते आदिशेषापरी. ॥ ६१
त्याचाही तळिंचा जसा दिसतसे श्रीकूर्म, येथें असे
पाहा हा कटिभाग उन्नति तसा लोकांसि दावीतसे. ।
शोभा स्फाटिक खांब साम्य धरिती ऊरूयुगें सुंदरें,
जें पृष्ठीवारे आदरोंचें धरिजे सानंद नंदीश्वरें. ॥ ६२
रत्नाच्या मुकुटाकृती मिरवती जंघा बन्या गोजिऱ्या,
जें कां शैलसुतांकपीठउपरी सल्लाळिजेल्या बऱ्या. ।
घोंटे माणिकगुच्छ तुच्छ करिती शोभा असी साजिरी,
कूर्मांगा जिणती प्रपाद, उपमा येना ययां दूसरी. ॥ ६३
भक्तांचे सुखकंद पादकमळें, शाखाकृती अंगुळी,
पुष्पें हें नखपंक्ति शुभ्र विलसे मोक्षादिसिद्धीफळी. ।
छाया शीतळ शांति दे अतिशयें संसारपांथा जनां
विश्रांतीप्रति हेतु जाणुनि किजे अत्यादरें पूजना. ॥ ६४
हे पादांबुज दीनभाविककुळां तारावया तिष्ठती;
संसारार्णवलंघना प्लव तसें प्रत्यक्ष हे दीसती. ।
हें जे जाणति तत्व, तेच भजती; त्यांतें काळीचीं भयें
बाधूं ना सकती; कृतांतभट ही भीती तयां निश्चयें. ॥ ६५
श्रीनागाभरणें करीं मणगटीं, ग्रैवेय हारादिकें,
मुंडें अक्षमणी वरे झळकती संमिश्र ते स्फाटिकें. ।

आंगीं शुभ्र विभूतिलेप विलसे, शार्दूलकृत्ती कटीं,
   खांदीं सद्गजचर्म रम्य धरिलें, पाहों दिठीं धूर्जटी. ॥ ६६
पाहा काळकळी धरोनि वरवे या तोडरीं बांधिले
   दासातें भय काय यावरि असे ? प्रत्यक्ष म्यां देखिले. ।
हा मृत्युंजय मृत्युनाशन करी. ध्यातां यया मानसीं
   बाधूं नाच सके कदापि सुजना माया महाराक्षसी. ॥ ६७
याचें हें यश सर्व देव कथिती; गाती पुराणें किती;
   सारे हे मुनिवृंद हेंच वदती; ब्रह्मादिही वर्णिती; ।
पापी देखत देखतांचि तरती, जे चिंतिती एकदां;
   संसारार्णव उधिती, न फिरती; आश्चर्य नोहे कदां ? ॥ ६८
ऐसा म्यां शिव धूर्जटी निरखिला; सानंद म्यां ध्यायिला;
   कायावाचिक मानसीक समुदा सद्भाव त्या अर्पिला; ।
केलें स्तोत्र यथामती पशुपती चिंतोनियां अंतरीं;
   माझे चोविस पाश तोडुनि कृपासिंधू धरो या करीं. ॥ ६९
जो कां निर्गुण, निष्प्रपच, निगमीं निर्धारिला ज्यापरी,
   ध्याती दिव्य निरंजनाख्य समुदे ज्योतिस्वरूपी तरी. ।
आहे साच; परतु हें धरितसे सद्रूप दीना जनां ।
   तारावें म्हणवोनि. सत्करुण हा ध्यायीं सदां तूं मना. ॥ ७०
याला योग्य उमा समान विभवें; या योग्य काशी पुरी;
   नंदीही तरि योग्य वाहन यया; चंद्रावतंसा धरी; ।
दोघे पुत्र ययासि योग्य असती; शांभे गळां वासुकी;
   हे लोकोत्तर संपदा मिरवली; साम्या नये आणखी. ॥ ७१
कैलासाचल शुभ्र, त्यावरि उभा नंदी बरा पांढरा,
   तत्पृष्ठीं गिरिनंदिनीसहित तो देखों शिवू साजिरा. ।
गंगा, पन्नग, अर्धचंद्र ढवळे सपात्ति हे सात्विकी
   शैवी वेदविदीं असे स्तवित कीं देखों अम्ही नेटकी. ॥ ७२
ब्रह्मा, वेद, फणींद्र वर्णन करूं ज्यातें कदां नेणती,
   त्याचें वर्णन अल्पधी करिन मी कोण्या गुणें निश्चितीं? ।

भूमीचे रज मोजवेति, परि ते याच्या गुणां मोजिता
ना झाला पहिला, पुढें तरि नव्हे; वाटे मना तत्त्वता. ॥ ७३
तो म्यां शंकर वर्णिजे स्वमतिनें, सामर्थ्य कैसें घडे,
तत्रापी कथितों स्वशक्ति जितुकी, सद्भक्तिभावे दढें. ।
सूर्यातें लघुदीप घेउनि जसें नीरांजनातें किजे,
सिंधूतें चुलकोदकेंचि सहसा अर्घ्यां जसें आर्पिजे. ॥ ७४
धाता हो, हरि हो, त्रिलोकपति हो, ते दिक्पती होतु कां,
येयीनात कदापि साच सहसा या शंकराच्या तुका. ।
ज्याचें पूजन एकदांचि करिता कैवल्य दे आपुलें
यासाठींच कवी निरंजन सदा चिंतीतसे पाउलें. ॥ ७५
ज्याला सर्वार्थसिद्धी अभिमत असती, तो पढो स्तोत्र वाचे,
किंवा निष्कामभावें पदयुगभजनीं नित्य लागो शिवाचे. ।
त्यानीं ध्यावो सदांही सगिरिगिरिसुतापार्षदांसीं सुतांसीं;
शंभू बोळेल त्यातें श्रुतिशिरगत त्या पूर्णबोधामृतासीं. ॥ ७६

**इति श्रीनिरंजनमाधवयोगीविरचित सांबशिवध्यान.**

---

## श्रीमहालक्ष्मीस्तोत्र.

निरीक्षिले म्यां बहु देव, माये; । ते वंदिती सर्व तुझेचि पाय. ॥
**सत्कीर्ति** तुझी भुवनांत गाजे, । विष्णुप्रिये, सुंदरि, लोकपूज्ये. ॥ १ ॥
**वाणी** स्तवीं काय सकेल तूला ? । उदार तुझी गुणरत्नमाला ॥
जे शोभवीती निजकंठदेशीं । ते शोभती सर्व जगीं विलासीं. ॥ २ ॥
त्यांच्या घरीं सुंदर **रत्नशाला** । स्थूणामणींच्या रचिता विशाला; ॥
गजाश्वधेनू, धन, दासदासी । देशील तूझ्या करितां जपासी. ॥ ३ ॥
**माला** गळां शोभति त्याजला, गे, । जो दास तूझ्या चरणासि लागे. ॥
तन्मंदिरीं सर्वसुखा दिवाळी । महाकृपे वर्तत नित्यकाळीं. ॥ ४ ॥
**हंसी** तशी सोज्वळ कीर्ति त्याची । विराजते केवळ मानवाची. ॥
तूझें महाद्वार धरोनि राहे, । महत्तमे, मूर्ति तुझीच पाहे, ॥ ५ ॥

तयासि ते बाधिल विष्णुमाया । होर्षीचना; जे भजताति पाना, ॥
तरोनि जाती भवसागरातें । कटाक्षमात्रें भगवत्पदातें. ॥ ६ ॥

तयासि लाभे अतिरूप जाया, । त्रिमुक्ति नाम्नी, अकलंककाया. ॥
निधान तू त्याप्रति मोक्षधामीं । आनंददात्री घडनेसि लक्ष्मी. ॥ ७ ॥

यथार्थ तू क्षीरसमुद्रबाळा. । प्रसिद्ध तूझी जगतींत लीळा. ॥
नरासि देशी अमरत्व, आर्यी, । येथें म्हणो ये नवलाव कार्यी? ॥ ८ ॥

आर्द्रा तुझी दृष्टि, सती, विराजे; । सुधा तिला देखुनि फार लाजे. ॥
जरामृती वारनि भाविकाच्या । मोक्षासि देसी, अमले, त्रिनाचा. ॥ ९ ॥

स्वभक्तिमता घडसील भद्रा. । नोहे तुझी प्राप्ति तया अनद्रा. ॥
म्हणोनि घ्यातों तव पादपद्मा. । पद्माळया केवळ सौख्यसद्मा. ॥ १० ॥

सरोजनेत्रे, शतपत्रपाणी, । प्रेमामृतें जीवविं विश्वप्राणी. ॥
वाखाणिती वेद पुराण लीला, । जिणे तुझा दास वळें कळीला. ॥ ११ ॥

रामा अनंता असती सुराच्या, । न पावती त्वन्महिमेसि साच्या. ॥
त्या किंकरी होउनि पाय तूझे । समर्चिता सात्य तया विराजे. ॥ १२ ॥

ऋद्धी घरीं होउनि सर्व दासी, । पद्मोद्भवे, सेविति या पदांसी. ॥
तुझ्या पदाब्जीं रतले तयातें । प्रसन्न होती, हरिनी भवातें. ॥ १३ ॥

उदार ते पावति शुद्ध बुद्धी, । हरिप्रिये, पावती सर्व सिद्धी. ॥
त्वत्पादपंकेरुहभक्ति ज्यातें, । धन्यत्व ये साचि महाकुळातें. ॥ १४ ॥

चौदा परींच्या उपजाति वृत्तें, । समर्पिलें त्या हरिवल्लभेतें. ॥
इंद्रादिसाम्राज्यपदीं उपेक्षा । मानूनि, तूझीं धरिली अपेक्षा. ॥ १५ ॥

उपेंद्रराणी, सकळार्थत्यागी, । दयार्णवा, फुल्लसरोजपाणी. ।
प्रसन्न होते जरि मुक्तमाती, । पढोनि भक्तोत्तम तो उपानी. ॥ १६ ॥

वनाजी कवी शीकवी सर्व लोका, । पढा सुस्वरा. विष्णुपत्नी विलोका. ।
इहामुत्र संपत्ति भोगा अनंता; । मिळा मुक्त होऊनि देखी अनंता. ॥ १७ ॥

इति श्रीनिरंजनमाधवयोगीविरचित लक्ष्मीस्तोत्र.

---

## श्रीगुरुस्तव.

( चामरवृत्त. )

गुरू, गुणाढ्या, परापराधिनाथ, सुंदरा,
शिवादिकाहुनी वरिष्ठ तूंचि एक साजिरा. ।
गुणावतार तू धरोनि या जगासि तारिसी,
सुरा मुनीश्वरा अलभ्य त्या गतीस दाविसी. ॥ १

तुझी अगाध कीर्ति. वर्णना परायुषें तरी
घडेचिना कदापि तें मदीय दीन वैखरी ।
वदेल केंवि? मानमात्र मी करूं किमर्थ, जी?
मनासि प्रेम ना घडे, न वेदही समर्थ, जी. ॥ २

पुराण, शास्त्र, मंत्रजात, तंत्र, यंत्र, सर्वही
तुझ्या कृपाबळेंचि साच रूढलें यया मही. ।
समस्त वाङ्मयामृतासि हृत्सरोजकुप्पिका
तुझी विराजली. जगन्नाथ तूंचि देशिका. ॥ ३

गुरू जया नरा नसे, तयासि काय तें दिसे?
असोनि नेत्र काय ते, मयूरपिच्छिचे तसे? ।
महाभ्रमें मदांध मोहसागरीं निमज्जती,
कलत्रपुत्रगेहवित्तचिंतनासि जागती. ॥ ४

अखंड कामिनी मनात दामिनीसमान ते.
कुभोगपंक्ति सर्वही तयासि साच वाटते. ।
अनश्वरत्व नश्वरीं विलोकितासि देखता
परस्परें जगात याच मृत्युदुःख भोगितां. ॥ ५

शरीर हेंचि आत्मभान जाहलें तयाप्रती,
तदर्थ इच्छितासि सौख्य, नाशिवंत संपती. ।
अमित्रमित्रभाव आपुल्या गुणेंचि जाणती,
समस्तभूतमात्रकीं दया कदापि नेणती. ॥ ६

न साधुवाद ठाउका असे तयासि पामरा;
तदा विवेक, सद्विचार केंवि त्या घडे नरा? ।

गुराहुनी खराहुनी तयासि नीच बोलिजे,
अपार भार वाहते प्रकाम पुष्ट जाणिजे ॥ ७

नसे जयासि साधुसंगकामना मनांतरीं,
सदैव लोभपाशबद्ध गुंतले धनांतरीं. ।
न वेद, धर्म, कर्म, तीर्थ, यज्ञ, दान साधणें,
व्रतादिही न जाणताति, सज्जनासि बाधणें. ॥ ८

कुळांत कज्जळासमान तेंचि शोभती बरे,
तयासि वाहती धरा मरे बहूत हुवरे. ।
वृथाचि वृक्षजीवनासमान दुष्ट वाचती,
पिशाचभूतराक्षसासमान नीच नाचती. ॥ ९

कठींत ते कलिप्रियत्व पावले, सुशोभले,
तयासि त्यासमान लोक वानिती, "भले भले" ।
मरोनि ते कृतांतधाम पावती न चूकता..
अनर्थ काळदंड दु ख भोगिती यथार्थता ॥ १०

सुजारिणीसुतासि बापनांव ठाउकें नसे,
तयापरी गुरूविहीन तत्व जाणती कसें ? ।
गुरू जयासि भव्य, तेंचि पूज्य या जनांतरीं,
सुरीं, नरीं, महोरगीं तयासि वंदिजे शिरीं. ॥ ११

गुरूविना अणीक तत्व मुख्य दुष्ट मानिती,
तया नरासि निश्चयें पहा घडे अधोगती. ।
गुरूचि देव, धर्म, सर्व तीर्थ, मोक्ष यांविना
नसेचि, हाचि निश्चयो, नमो नमो तया जना. ॥ १२

जयां गुरुत्व बोधलें, तयांसि कार्य साधलें,
भवार्णवासि लंघिलें, सुनिग्रदुर्ग भंगिलें, ।
सहा रिपूसि जिंतिलें, निजामतत्व चिंतिलें,
परात्परासि पाहिलें, प्रकृष्ट दु ख साहिलें ॥ १३

मनोजनाश जाहला, सुखामबोध बोनला,
मनासि वेध वेधला, स्वयेंचि वायु रोधला, ।

गिरेसि मौन बेसलें, दिठींत तेज पेसलें,
अनाहतध्वनीस या मरोनि कान ऐकिलें. ॥ १४ ॥
उदान कंठ रोधिला, अपान ऊर्ध्व चालिला,
समान मध्य राहिला, सुभान कुंभकीं भला;
त्यजोनि नीज पन्नगी स्वमार्ग ते धरी उगी,
प्रवाळवर्ण साजिरी म्हणूनि वर्णिती जगीं. ॥ १५ ॥
षडैकचक्रभेदनी सुकुंडली निघे क्षणी,
पिळोनि नाडिकारसासि पुष्ट होय पीउनी. ।
हृदब्ज तें विकासनी, चिदंबरासि दाखवी;
सहस्रपत्र पावुनी मरद तेथ चाखवी. ॥ १६ ॥
निजस्वरूपलाभ हा ययापरी घडे, पहा.
महत राजयोग हा प्रभाव दाखवी महा. ।
अणीक एक सांगतो गरूपुजेसि लागतो,
तयासि भक्तिमार्ग तो मनांत पूर्ण जागतो. ॥ १७ ॥
मनापरी तया घरीं सुभक्ति राबते वरी.
वसोनि नित्य अंतरीं तया त्यजीच ना हरी. ।
समस्त भूतजातही हरी दिसे यथा मही,
हरीविना नसे कहीं चराचरीं जगन्मयीं. ॥ १८ ॥
हरीच तोचि जाहला, हरीरुपें विराजला,
हरीविना दुजी परी न देखनाचि रंगला. ।
त्यजोनि मान, कामना, मदादि दंभवासना,
अहंकृतीकुभावनाविटाळ नातडे मना. ॥ १९ ॥
जनात मित्रता वरी, ऋजुत्वभावना धरी,
असोनिया सदा घरीं, नसे तसा दिसे तरी. ।
उदार सर्वही गुणें, समान दृष्टि देखणें,
स्वकर्मभोग भोगणें, न लक्षिजे पुरें उणें. ॥ २० ॥
सदा प्रतोप अंतरीं, अखंड आठवी हरी,
क्षमा, प्रसाद सारखाचि थोर लाहनावरी. ।
सुतत्ववृत्ति चांगली तयासि गोड लागली.

निशेष संतमंडळी मनास मानली भली. ॥ २१ ॥
जयावरी गुरुकृपा तयासि दुर्गुणीं त्रपा.
न आतळे तमोरजादि भावनासरीसृपा. ।
असाचि सूक्ष्म भक्तिचा, निदान सर्व युक्तिचा,
प्रभाव विष्णुशक्तिचा, गडी प्रधान मुक्तिचा. ॥ २२ ॥
गुरू उदार माउली, प्रशांतिसौख्यसाउली,
जया नरासि भावली तयासि सिद्धि धावली. ।
गुरू, गुरू, गुरू, गुरू म्हणोनि जो स्मरे नरू,
तरोनि मोहसागरू सुखी घडे निरंतरू. ॥ २३ ॥
गुरू चिदब्धिचंद्र हा, महत्पदीं महेंद्र हा,
गुरू प्रतापरुद्र हा, गुरू कृपासमुद्र हा. ।
गुरू स्वरूप दे स्वतां, गुरूचि ब्रह्म सर्वथा,
गुरूविना महाव्यथा नसे जगीं निवारिता. ॥ २४ ॥
गुरू स्मरा, गुरू स्मरा, गुणाबुधींत संतरा,
गुरूचि एक सोयरा भवीं नसेचि दूसरा.
गुरूचि काशिकापुरींत मंत्र दे षडक्षरी,
सुतारकोपदेश हा करोनि लोक उद्धरी. ॥ २५ ॥
शिवाहुनी गुरू असे अधीक हें मला दिसे.
नरासि मोक्ष द्यावया गुरू स्वरूप घेतसे. ।
शिवस्वरूप आपुलें न मोक्षदक्ष देखिलें,
गुरुत्व पूर्ण घेतलें म्हणोनि कार्य साधलें. ॥ २६ ॥
हरी, विरिंचि, ईश हो, महेंद्र, चंद्र, शेष हो,
गुरूसि साम्यता नये म्हणोनि वेदघोष हो. ।
पुराणशास्त्रआगमीं अनेक, हा बुधोत्तमीं
गुरूचि थोर बोलिला, म्हणोनि मी तया नमी. ॥ २७ ॥
गुरूचि बापमाउली, गुरूचि दीनसाउली,
गुरू स्वशिष्यबालकासि कामधेनु गाउली. ।
गुरूचि चिंतितार्थ दे, गुरूचि तत्व तो वदे,
अलभ्य मोक्षलाभ आपुल्या कृपे गुरूचि दे. ॥ २८ ॥




गुरूचि भेद नासितो. जडांधकार शोपितो,
गुरूचि मोह वारितो, अविद्यभाव सारितो. ।
गुरूचि ब्रह्म दावितो, गुरूचि ध्यान लावितो;
गुरूचि विश्व सर्व आत्मरूप हें बुझावितो. ॥ २९ ॥
गुरूचि मूळ दीप, रे, जगत् गुरुस्वरूप, रे,
समस्त देवही तदंश दीसताति साजिरे. ।
गुरूचि पूर्णसिंधु, रे, तयांत देव बिंदु, रे,
गुरु स्वयंभ सूर्य; अन्य सर्वही मयूख, रे. ॥ ३० ॥
गुरूचि रत्नमाळ, रे, समस्तभासव्याळ, रे,
गुरू नभीं विशाळ, सर्व लोक मेघजाळ, रे, ।
गुरूचि सर्व दीसतो, गुरूचि सर्व भासतो,
गुरूचि हा प्रकाशतो, गुरूचि सर्व शोभतो. ॥ ३१ ॥
गुरूचि दिव्य दृष्टि, रे, गुरूचि सर्व सृष्टि, रे, ।
गुरूचि ज्ञानबोध, रे, गुरूचि सर्व शोध, रे. ।
गुणांत तोचि विस्तरे, मनांत तोचि संचरे,
समस्त भूतमात्र चेष्टवूनि एकला उरे. ॥ ३२ ॥
गुरू विराटरूप, रे, गुरू हिरण्यगर्भ, रे,
गुरूचि ॐत्रिवर्ण पंचवर्ण मुख्य तार, रे. ।
गुरूचि विश्व, तैजसू, गुरूचि प्राज्ञ पूरुषू,
गुरूविना दुजा नसे श्रुतीस वेद्य सर्वसू. ॥ ३३ ॥
गुरूचि ध्येय, ध्यान, रे, गुरूचि सर्व भान, रे,
नसे गुरूसमान, रे, जगीं गुरूस मान, रे, ।
गुरूचि थोर, सान, रे, महासुखा निदान, रे,
(गुरू, गुरू, गुरू,) गुरू, करीं म्हणोनि गान रे. ॥ ३४ ॥

इति श्रीनिरंजनमाधवयोगीविरचित श्रीगुरुस्तव.

(अपूर्ण)

---

# २१. प्रल्हादचरित्र.

( त्र्यंबककविकृत. )

जनस्थानी नांदे द्विजवर सदा त्र्यंबक कवी,
  तयानें हें केली सरस कवितापद्धति नवी. ।
कथेला ज्या येती द्विज वरदमूर्ती मुखरिणी,
  तयांला वाढावी अभिनवरसाची शिखरिणी. ॥ १

जगीं दैत्येंद्रानें तप करुनि देवासि छळिलें.
  प्रतापें मृत्यूचें परमगतिसामर्थ्य खिळिलें. ।
नृसिंहाच्या रूपें कनककशिपूलागिं गिळिलें.
  तया प्रल्हादाचें त्रिभुवनिं महाभाग्य फळलें. ॥ २

कयाधूचे पोटीं सुमति सुत झाला गुणनिधी,
  तयाला देखोनी जनक सुख मानी निरवधी. ।
म्हणे याचीं चिन्हें सकल दिसती सुंदर बरीं,
  असो हा दीर्घायू असुरकुळिंचा दीपक घरीं. ॥ ३

प्रकर्षे आल्हादें रमविल तुम्हांला निशिदिनीं,
  म्हणोनि याचारा गुरु म्हणति प्रल्हाद वदनीं.
द्विजां द्या गोदानें, गज, तुरग, यानें, रथ, धनें.
  अनंता[3] वाद्याचे गजर; गुण गाती त्रिभुवनें.
घरांमध्ये रांगे, मधुर वचनें बोलत असे,
  मुलांमध्यें खेळे अनुभवरसें डोलत असे.
भुकेल्या मागेना असुनि जननीला निजमुखें.
  नियाला साधूचें वचन परिसोनी ...
कुमाराचे केले उपनयन संस्कार बरवे.
  जगीं शुक्राचार्या गुरुपरिस दैत्यांत ...
जिवीं प्रल्हादाचें[4] नरहरिविना अन्य न सुचे,
  मुखीं गोविंदाचें स्मरण, हरिचें कीर्तन ...

पाठभेद.—१. सुत समगभरती. २. शठो. ३. अमीता.

पित्यानें घोकाया गुरुसदनिं धाडूनि वहिला,
गुरूनें ओंनामा लिहुनि दिधला त्यासि पहिला.।
गुरूला प्रल्हादें नमन विधिसयुक्त वहिलें,
स्वसतोषें तेणें निगमतरुचें वीज लिहिलें. ॥ ७

नमः सिद्धा, वुद्धा, परमगुरुवृद्धासि करितों,
प्रसादें मी त्याच्या हृदयिं अनिरुद्धासि धरितों.।
असो त्याचे ठायीं अचल मति माझी अतुलसी.
त्रिकाळीं गोपाळा नमुनि बहु वाहीन तुलसी. ॥ ८

दयाळा गोपाळा, मजवरि दया पूर्ण करणें.
अनाथाला येथें भवपुरिं वहाताचि धरणें.[1] ।
किती या ससारीं उपजुनि पुनर्जन्ममरणें;
नको आता ऐसे विषमविषयामाजि रमणें ! ॥ ९

दयाळा गोपाळा, कमलनयना, कजैवदना,
कधीं येसी, कान्हा, कळुषशमना, कंसदमना ? ।
दयादृष्टी पाहें बहुत शिणलों शेषशयना;
सख्या, येंनें, न्यावें, त्वरित मज वैकुंठभुवना. ॥ १०

गुरू वोले याचें चरित असुरा घातक असे.
असें या ससारीं त्रिभुवनिं दुजें लेंकरु नसे.।
दैंटावूनी सागे, वदनिं न म्हणावें नरहरी;
अशा छदें, वेड्या, करितिल तुला ताडन घरीं. ॥ ११

गुरूच्या वाक्याला परिसुनि पुढें आपण वदे.
म्हणे, या मूर्खाची, रघुपति, मला सगति न दे.।
कुळीं ज्याचे नाहीं स्मरण हरिचें कीर्तन सदा,
तयाला कल्पातीं विमल न मिळे मंगल कदा. ॥ १२

घरा आला रागें करुनि अपमानूनि गुरुला.
मनामध्यें चिंती सुमनसुफला कल्पतरुला.।

---

पाठभेद. १. विविधनिरयामाजि धरणें. २ खजनदना ३. सकळसजणा. ४. पावें.
५. दयार्द्रले

# २१. प्रल्हादचरित्र.

( त्र्यंबककविकृत. )

जनस्थानी नादे द्विजवर सदा त्र्यंबक कवी,
तयानें हें केली सरस कवितापद्धति नवी. ।
कथेला ज्या येती द्विज वरदमूर्ती मुखरिणी,
तयांला वाढावी अभिनवरसाची शिखरिणी. ॥ १

जगीं दैत्येंद्राने तप करुनि देवासि छळिलें,
प्रतापें मृत्यूचें परमगतिसामर्थ्य खिळिलें. ।
नृसिंहाच्या रूपें कनककशिपूलागिं गिळिलें,
तया प्रल्हादाचें त्रिभुवनिं महाभाग्य फळलें. ॥ २

कयाधूचे पोटीं सुमति सुत झाला गुणनिधी,
तयाला देखोनी जनक सुख मानी निरवधी. ।
म्हणे याचीं चिन्हें सकळ दिसती सुंदर वरीं,
असो हा दीर्घायू असुरकुळिंचा दीपक घरीं. ॥ ३

प्रकर्षे आल्हादे रमविल तुम्हांला निशिदिनीं,
म्हणोनिं पाचारा गुरु म्हणति प्रल्हाद वदनीं. ।
द्विजां द्या गोदानें, गज, तुरग, यानें, रथ, धनें.
अनंता वाद्याचे गजर; गुण गाती त्रिभुवनें. ॥ ४

घरांमध्ये रांगे, मधुर वचनें बोलत असे,
मुलांमध्यें खेळे अनुभवरसें डोलत असे. ।
भुकेल्या मागेना असुनि जननीला निजमुखें.
नियाला साधूचें वचन परिसोनी निजसुखें. ॥ ५

कुमाराचे केले उपनयन संस्कार बरवे.
जगीं शुक्राचार्यो गुरुपरिस दैत्यांत मिरवे. ।
जिवीं प्रल्हादाचे नरहरिविना अन्य न सुचे,
मुखीं गोविंदाचें स्मरण, हरिचें कीर्तन रुचे. ॥ ६

पाठभेद.—१. सुत समगभरती. २. असो. ३. अमीता. ४. त्या चरण हरिचे, आन.

पित्यानें घोकाया गुरुसदनिं धाडूनि वहिला,
गुरूनें ओनामा लिहुनि दिधला त्यासि पहिला.।
गुरूला प्रल्हादें नमन विधिसयुक्त वहिलें.
स्वसंतोषें तेणें निगमतरुचें बीज लिहिलें. ॥ ७

नमः सिद्धा, बुद्धा, परमगुरुवृद्धासि करितों,
प्रसादें मी त्याच्या हृदयिं अनिरुद्धासि धरितों.।
असो त्याचे ठायीं अचल मति माझी अतुलसी.
त्रिकाळीं गोपाळा नमुनि बहु वाहीन तुलसी. ॥ ८

दयाळा गोपाळा, मजवरि दया पूर्ण करणें.
अनाथाला येथें भवपुरिं वहाताचि धरणें.।
किती या ससारीं उपजुनि पुनर्जन्ममरणें;
नको आता ऐसें विषमविषयामाजि रमणें। ॥ ९

दयाळा गोपाळा, कमलनयना, कंजवदना,
कधीं येसी, कान्हा, कलुषशमना, कंसदमना ?।
दयादृष्टी पाहें बहुत शिणलों शेषशयना;
सख्या, यावें, न्यावें, त्वरित मज वैकुंठभुवना. ॥ १०

गुरू बोले याचें चरित असुरा घातक असे.
असें या ससारीं त्रिभुवनिं दुजें लेंकरु नसे.।
दॅटावूनी सागे, वदनिं न म्हणावें नरहरी,
अशा छंदें, वेड्या, करितिल तुला ताडन घरीं. ॥ ११

गुरूच्या वाक्याला परिसुनि पुढें आपण वदे.
म्हणे, या मूर्खाची, रघुपति, मला संगति न दे.।
कुळीं ज्याचे नाहीं स्मरण हरिचें कीर्तन सदा,
तयाला कल्पांतीं निमल न मिळे मंगळ कदा. ॥ १२

घरा आला रागें करुनि अपमानूनि गुरुला.
मनामध्यें चिंती सुमनसुफळा कल्पतरुला.।

---

पाठभेद. १. विविधविषयामाजि धरणें. २ खंजरहना. ३. सकलसजणा. ४. पावें. ५ दयार्द्रलें

पित्यानें त्या बाला कवळुनि निजांकीं बसविलें,
म्हणे, बा प्रल्हादा, तुज बहुत कोणें रुसविलें. ॥ १३

म्हणे शुक्राचार्या मज बहुत हा दापित असे.
तयाचे ते दोघे कुमर दिसती केवळ पिसे[1]. ।
कदा नाहीं त्याच्या विमल हरिचें नाम वदनीं,
म्हणूनीया त्याच्या क्षणहि न गमे सौख्य सदनीं. ॥ १४

अनंता, श्रीकांता हृदयिं भगवंता न भजती,
वृथा चिंता कांताकुचकलश चिंतूनि निजती, ।
गुणातीता सीतापतिचरणपद्मीं न रमती,
असे हे त्यागावे गुरु नर दुरात्मे खरमती. ॥ १५

म्हणे, बा प्रल्हादा, हृदयिं भजसी श्रीहरिपदा,
नव्हे हे मर्यादा असुरकुळिंचीं निर्मळ कदा. ।
मुरारे[3], गोविंदा, वदनिं वदसी नामचि सदा.
तुझ्या जिव्हाच्छेदा करुनि बहु दावीन अपदा. ॥ १६

पित्याची प्रल्हादें वचनरचना ऐकुनि बरी,
म्हणे, या दैत्याला हृदयिं न रुचे कां नरहरी ? ।
त्रिदोषाच्या छंदें ज्वरित भलतेसें वडवडी,
तसें याला जालें म्हणुनि सदनीं हा चरफडी. ॥ १७

अहा रे दैत्येंद्रा, स्वहित समजेनास अधरा.
वृथा केली कष्टी जननि परि येऊनि उदरा. ।
तुला नाहीं लज्जा, विषयरस प्यालासि मदिरा.
किती बोधूं, मूर्खा, श्रुतिवचनभावार्थबधिरा. ॥ १८

शरीराची आशा धरुनि फिरसी तूं दशदिशा,
असारीं संसारीं निसरुनि कसा त्या जगदिशा ?।
अविद्येच्या योगें मन विषयरानांत फिरवी.
अहा रे दैत्येंद्रा, पळभरिं न विश्रांति वरवी. ॥ १९

---

पाठभेद.—१. धसे. २. अर्धांचयाही बोधें घपतिल जगीं ओंगळ विधे, । गुरु ज्यांचा ऐसा, स्वहित अधमयालागिं न दिसे. ॥ ३. मुकुंदा.

करा श्रीरंगाचें भजन तुम्हि सांडूनि कपटा.
असंगाच्या शस्त्रेंकरुनि रिपुचें मूळ निवटा. ।
वृथा लोकांमध्यें भ्रमण करितां येइल उणें.
कसें दारोदारीं मन फिरवितें ओंगळ सुनें ? ॥ २०

भजावें श्रीकृष्णा उपजुनि तुम्हीं दानवकुळीं.
त्यजावी हे तृष्णा विषयमदमोहासि समुळी. ।
सुता प्रल्हादाचें वचन परिसा दिव्य निरुतें,
अनायासें जाती सकळ तुमचीं दूरि दुरितें. ॥ २१

अरे, माझी कोणी अति सरस हे युक्ति परिसा,
भल्याच्या संसर्गें सकळ तुम्हि संदेह निरसा. ।
विरक्तीचें कांहीं जरि घडल शास्त्रश्रवण, रे,
करावें मुक्तीचें तरि सुलभ पाणिग्रहण, रे. ॥ २२

विरक्ती सेवावें श्रवणमननाचें दधि, मधू.
प्रयागीं सत्क्षेत्रीं चतुर परिणावी नववधू, ।
विवेकें वारावें मधिलचि अविद्यावरण, रे.
प्रतिष्ठा वोंकारीं प्रगट वधुमुक्ताभरण, रे. ॥ २३

प्रयागीं सत्क्षेत्रीं मिरवति विमानीं वधुवरें,
तयां दोघांमध्यें अमित दिसतें हें सुख बरें. ।
पुढें सौभाग्याच्या अधिक अभिवृद्धीस उमजा.
कळेना हें तेव्हां शरण गुरुरायासि तुम्हि जा. ॥ २४

सदा श्रीरामाचें हृदयकमळीं ध्यान धरणें,
प्रसादें देवाच्या भवजलधिचा बिंदु करणें. ।
द्विजेंद्रीं सेवावें अभिनव जगत्कल्पतरुला.
मनोभावें जावें शरण सखया मध्वगुरुला. ॥ २५

कुमाराच्या बोलें असुर बहु संतप्त हृदयीं.
भंडाडे कोपाग्नी, करुनि मग तो[२] तेच समयीं, ।
म्हणे याची कांहीं दिसत विपरीतार्थ करणी.
रिपू आला पोटा खपविल कुळांगारकमणी. ॥ २६

---

पाठभेद.—१. जळाला. २. ती तप्त वढयीं.

कयाधूसी बोले, सुत खपवि देऊनि जहरा.
बलावा गारोडी, भुजग डसवा येकलहरा. ।
कुजंत्रीं जाळावा प्रबळ अनलीं हा अवचिता.
कुळीं माझ्या जाला बहुत करितोहे अनुचिता. ॥ २७

कुठाराचा दाडा अति सरळ हा नंदन म्हणा.
पुढें माझ्या छेदा करिल सकळा चंदनवना. ।
उंसाच्याही पोटीं जसिं निपजती हीन कणसें,
तसे वंशामध्यें सुत उपजती पातकवशें. ॥ २८

अरे, याचे बांधा भुज सुदृढ पाशींकरूनियां,
समुद्रीं सेंदीवा चपल करिं सेंडी धरुनियां, ।
निराळीं लोटावा अचलशिखराग्रावरुनियां,
मला वाटे ऐसा कुमति सुत जावा मरुनियां. ॥ २९

वराहाच्या रूपें रणिं निवटिला उग्र चुलता,
तयाला हा ध्यातो म्हणुनि गज लावूनि उलथा. ।
अरे, याचें कोणी शिरकमळ छेदा कचकचां,
असें बोले तेव्हां सदैय जन थुंके पचपचां. ॥ ३०

यया प्रल्हादाला बहुत छळिलें सेवकजनीं,
समाधानी मोठा, हृदयिं सुखदुःखास नमनी. ।
जयाचा कैवारी असुरगजवैरी नरहरी,
तयाला संसारीं कवण रिपु मारी निजकरीं ? ॥ ३१

न जाळी त्या अग्नी, जर्लंधि सहसा तो न बुडवी,
पडेना शैलाग्रावरुनि, गज पायें न तुडवी, ।
तुटेना शस्त्रास्त्रीं, भुजगविष त्याआंगें न चढे,
विषाचा तो प्याला जिरवुनि मुखामाजि पहुडे. ॥ ३२

घरा आले रायाजवळि कथिलें सेवकजनीं,
तया प्रल्हादाचें सकळ करिती कौतुक मनीं. ।

पाठभेद.–१. अति दाणा. २. नद्यचि. ३. भुजग. ४. लोटावा. ५. सबल. ६. उदक.

वळीयेसी याचे हृदयिं वसते जीवनकळा.
मिळाला विष्णूला वधिल तुमच्या दानवकुळा. ॥ ३३
पुसे, बा प्रल्हादा, प्रगट तरि दावीं नरहरी.
असे कोणे ठाई वद मजपुढें तू लवकरी. ।
न ये कां तो येथें, पळत फिरतो कां गिरिदरी ?
वळावी युद्धाला प्रगट तरि वैरी क्षणभरी." ॥ ३४
म्हणे, " माझा स्वामी तवहृदयपद्मांत वसतो.
अनंत ब्रह्मांडें रचुनि तृणकाष्ठात दिसतो." ।
असें बोले तेंव्हां कनककशिपू त्रासुनि वदे,
समास्तंभीं कां, रे, त्वरित मजला दर्शन न दे "? ॥ ३५
पित्याच्या त्या बोलास्तवचि मग पुत्रें विनविलें.
तया श्रीरंगाचें त्वरित हृदयीं ध्यान धरिलें. ।
वराहाच्या रूपें धरणि धरिली त्या निजमुखीं,
सभास्तंभीं यावें त्वरित रिपुला दर्शन सुखीं." ॥ ३६
स्वपुत्राच्या बोलावरुनि मग हांसे खदखदां.
सभेच्या त्या स्तंभावरि सबळ हाणी असि तदा. ।
तये काळीं देवें त्यजुनि सहसा दूर अळसा,
सभास्तंभीं झाला प्रगट करि ब्रह्मांडवळसा. ॥ ३७
सभास्तंभीं झाला ध्वनि अवचिता तो कडकडां.
अनंत ब्रह्मांडें खचति समयीं ते गडबडां. ।
नृसिंहाच्या नेत्रीं निघति बहु ज्वाळा भडभडा.
पळाले दैत्यांचे अधिप निजपायीं झडझडा. ॥ ३८
नृसिंहाच्या तेजें गगनिं रविचंद्रादि जळती.
सडा नक्षत्रांचा धरणिधर, वाराह पळती. ।
प्रतापें दिग्पाळांसहित अमरा धाक पडला,
भुकेला कल्पांतप्रळयसमयीं रुद्र उठला. ॥ ३९
नृसिंहानें जानूवरि असुर धांवूनि धरिला.
नखाग्रानें त्याचा उदर उर संपूर्ण चिरिला. ।
सभाद्वारीं संध्यासमयिं रिपुचा गर्व हरिला.

स्वभक्ताच्या रागें मग नरडिचा घोंट भरिला. ॥ ४०
तयाच्या ऱ्या दाढा घनसर मुखामाजि विकटा.
नखश्रेणी वज्रापरिस कठिना, फार तिखटा. ।
मुखीं नेत्रीं ज्वाळा निघति जळती तें दश दिशा.
नृसिंहाच्या दीर्घा पिंवळट सटा, पिंगट पिशा. ॥ ४१
चतुर्बाहू पीतांबर विलसतो हा कटितटीं.
मुखीं जिव्हा लोळे, रुधिररस चाटी सरकटी. ।
करी अट्टाहासा, असुरगजकुंभस्थल चिरी.
म्हणा, रे, तो आता अभयवरदाता नरहरी. ॥ ४२
तये वेळीं देवावळि मग कोणीपरि न ये.
रुपालें ते ब्रह्मादिक करिति धावा जयजयें. ।
रमेनें प्रल्हादासहित चरणांभोज नमिलें.
म्हणे लक्ष्मी कांता, "त्रिभुवनपते, विघ्न शमलें. ॥ ४३
नृसिंहाच्या माथां सुर वरुषती दिव्य सुमनें.
दुरूनीया भूमीवरि करिति साष्टांग नमनें. ।
क्षनता वाद्यांचे गजर उठती घोष बरवे.
सभास्थानीं सिंहासनि कमलजाकांत मिरवे. ॥ ४४
रमा ज्याचे अंकीं अचळ विलसे विश्वजननी,
सुखी ज्यानें केले मुनिजन पदांभोजभजनीं, ।
शिरीं ज्याच्या शोभे मुगुट, फणि छत्राकृति दिसे,
जयासाठीं झाले हरिहरविरिंच्यादिक पिसे. ॥ ४५
म्हणे, "बा प्रल्हादा, तुज बहुत बाळास छळिलें,
तुझ्या रागें त्याला, सुमति, क्षणमात्रांत गिळिलें. ।
सुखी राहें आता भजन करिं माझें अनुदिनीं.
तुझ्या भाग्याचा तो शुभ उदय झाला त्रिभुवनीं." ॥ ४६
"दयाळा, म्यां तूझा अमल मनिं धावा विनविला.
धनी त्रैलोक्याचा अभयवरदानी शिणविला." ।
तया प्रल्हादानें हृदयकमळीं देव नमिला. ।
म्हणे, "स्वामी, स्थापीं चरणकमळीं मर्च्चमुनिला. ॥ ४७

——:०.——

## २२. द्रौपदीवस्त्रहरण.

शैलजापतीसूत वंदुनी । शोभला दिसे रत्नभूषणीं. ।
वंदिली त्वरें ब्रह्मकुमरी, । सकळ भूषणें बाणलीं वरीं. ॥ १
श्रीगुरू तुझी नेणवे सिमा. । वर्णितां तुतें नास्ति ऊपमा. ।
संतजी सखे भक्त हे जनीं । चातकापरी लुब्ध निर्गुणीं. ॥ २
कुरुपतीसभे श्रेष्ठ बैसला. । दुष्ट सर्वही मंत्र योजिला. ।
वचन भूपती बोलिला सभे, । ऐकतां प्रभू राहिले उभे. ॥ ३
नामिति मस्तकें, बोलती, गिरा, । भूपती, तुम्हां मान्य तें करा. ।
सुयोधनाप्रती भूप बोलिले. । सर्वही सभे श्रेष्ठ बैसले. ॥ ४
कुरुपती म्हणे, "धर्म आणवा, । बंधु तो सखा शीघ्र भेटवा. ।
बैसलों जिवीं सर्व वैभवा, । बंधु तो सखा शीघ्र भेटवा." ॥ ५
'धर्म भूपती भेटवा मला' । बोलतां क्षणीं कंठ दाटला. ।
लोचनीं किती पूर चालिला. । "जाय, रे सख्या, आणीं बंधुला. ॥ ६
ऐशियेपरी राजउत्तरें । वीदुरें वरें मानिलें खरें. ।
बैसला रथीं चालिला त्वरें, । अश्व तांतडी वागवी वरे. ॥ ७
सन्निधें पुढें पातला पुरी. । येत देखिला पंडुकूमरीं. ।
पैल तो रथीं कोण येतुसे? । वाटतो सखा आमुचा असे. ॥ ८
विदुर सन्निधी पातला सभा. । बंधु धर्मजी राहिला उभा. ।
हास्यआननें बंधु भेटले. । सर्वही सभे स्वस्थ बैसले. ॥ ९
धर्मजी म्हणे, "काय गौतमी । आळसी तया प्राप्त आश्रमीं ? ।
ते परी आँजी बीज तुमचें । थोर हें जगीं भाग्य आमुचें. ॥ १०
सर्वही सुखें?" धर्मजी पुसे. । "स्नेहें तूमचा क्षेमची असे." ।
करुनियां पुजा धर्म सादरें, । मंदसा वदे विदुर उत्तरें. ॥ ११
"सुयोधनें तुम्हां मूळ धाडिलें. । भेटिचें बहू आर्त लागलें. ।
'धर्मजी सखा, बंधु, भेटवा. । लागली,' म्हणे, 'खंति या जिवा.'" ॥ १२

हास्यमूख धर्मराज काय शब्द बोलिला,
उत्तरेसि सूर्यराज आजि अस्त पावला; ।

आमतीर्थि चंद्रमा उडुगणीं विराजला;
क्षारता त्यजून आजि सिंधु गोड वाटला ! ॥ १३

सुयोधनासि आजि काय करुणा विराजली ?
वज्रधार तीव्र काय नम्रतेस पावली ? ।
धरूनि हेतु कोणता तुम्हासि मूळ धाडिलें ?
पूर्व सौख्य लोचनीं तुम्हींच सर्व पाहिलें." ॥ १४

धर्मजीप्रती म्हणे विदूर, "काय बोलणें
पूर्व वर्म, दुष्टकर्म ? सर्व दु:ख त्यागणें. ।
समान शत्रुमित्र तूज, सोमवंशभूषणा,
डाव, घाव, हाव, भाव हे न आणिजे मना. ॥ १५

धर्मजी, तुम्हासि कर्म इच्छिताचि अतरीं,
ते क्षणींच कर्म त्यासि लागलें चराचरीं. ।
पूर्व दुःख तीतुकें अनत सौख्य मानणें;
सुयोधनासि कोण हेत त्यासि आजि शोधणें. ॥ १६

मला मनांत वाटतें, सुयोधनासि भेटणें.
भाव कीं कुभाव, भाव कोण हेत जाणणें, ।
सुबुद्धि कीं कुबुद्धि, काय कर्म त्यासि अतरीं,
क्षीरनीर नीवडीत राजहंस ज्यापरी. ॥ १७

भुपासमूर बोलतां कुरूपतीस देखिलें.
बाष्पयुक्त कंठ, नीर लोचनासि दाटलें. ।
त्यजूनि मूनि सर्वही वनात राहिले जसे,
ते गती कुरुपतीस आजि बाणली असे." ॥ १८

नकुलसाहदेवभीमकीरिटींसि धर्मजी
म्हणे, "करा विचार सारबुद्धि हेत काय, जी ? ।
वदे विदूर वाक्य, त्यासि काय बुद्धि सांगणें ?
ज्यासि जो गमेल भाव त्याचि रीति बोलणें." ॥ १९

ते क्षणींच कीरिटी उठोनि राहिला उभा.
ऊठती बहूत, हो, परंतु बैसली सभा. ।

करांजुळी करून काय बंधुजीस उत्तरें
विबुधनायश्रीगुरूपरांस नीतिचीं वरें. ॥ २०
"कल्पिलें जनासि देत कल्पवृक्ष, आजि तो
सादरें करूनि अन्न हिंगणासि मागतो. ।
तेपरीचि सागरें वदोनि मंद उत्तरें,
तयासि काय देइजे लघू अनाथ थिल्लरें ? ॥ २१
जनां निमित्य या घनें भुमीस तोय सांडणें;
घडे तयासि तोय काय रांजणासि मागणें ? ।
भारती मतीमुढासि काय अर्थ पूसती ?
बंधुजी, सभेसि आज तेचि रीति भासती." ॥ २२

अथानंतरें कीरिटी गौरवीला. । पुढें जाउं भेटीसि हा नेम केला. ।
वरीं भोजनें ते दिशीं सर्व झालीं; । दुजे वासरीं सर्व सेना निघाली. ॥ २३
तदा काय पांचाळसूता दुतीतें । म्हणे ? "जाय, गे, अर्जुनाचे सभेतें. ।
नमस्कार जाऊन सांगें तयातें. । समाचार साफल्य तूं सांग त्यातें. ॥ २४
निशीचे भरीं वोखटें स्वप्न म्यां, वो, । असे देखिलें, तें नये सांगतां, वो. ।
'अकस्मात, गे, आंगणां दूत आला. । म्हणे तो मला, 'चाल वेगीं सभेला.' २५
'करीं त्यासि मी ग्लांति नानापरी, वो. । धरी तो करें वेगिला नीकरें, वो. ।
'सखे, ओढितां भूषणें तूटिजीलीं. । भिंवेचीं, सखे, फार मुक्तें गळालीं. ॥ २६
'सभेमाजि ओढोनि नेलें, सखे गे, । दिनासारिखी एकली मी उभी, गे. ।
'सभेचा वदे भूपती काय तेथे ? । 'करा नग्न पांचाळराजात्मजेतें.' ॥ २७
'उठे राजबंधू; धरी अंबरातें, । सखे, अंतरीं मी स्मरें माधवातें.' ।
असें स्वप्न म्यां देखिलें घोर रात्रीं. । उठें घाबरी, तों, सखे, कंप गात्रीं. ॥ २८
त्वरें जाय, गे सुंदरी, वातवेगें. । करी शांति नानापरी बुद्धिरंगें. ।
नये भेटिसी जाउं दुर्योधनाचे. । अकस्मात तें विघ्न येऊन संचे." ॥ २९
त्वरेनें दुती वातवेगें निघाली, । पुढें अर्जुनाचे सभेमाजि गेली. ।
सभेसन्मुखें शीघ्र बद्धांजळी ते । दुती द्रौपदीची उभी राहिली ते. ॥ ३०
म्हणे, "जी, प्रभो, आजि राजांगनेनें । नमस्कार सांगीतला थोर मानें. ।
निशीमध्य निद्राभरें स्वप्न तें, हो, । असे देखिलें, तें नये सांगतां, हो. ॥ ३१

'अकस्मात हो आगणा दूत आला । म्हणे, 'चाल पांचालसूते, सभेला.' ।
'धरी दीर्घ वेणी, तिर्ते ने सभेला. । हरी चीर तेव्हा स्मरें माधवाला.'॥ ३२
प्रभो, कौरवाधीशभेटी न जावें, । मुखें आपुले धर्मजीतें म्हणावें. ।
उठे कीरिटी, पातला वीर्यसिंधु । सभे, श्रेष्ठ भद्रासनीं धर्म बंधु. ॥ ३३
नमस्कार केला प्रभूलागिं मानें. । म्हणे, "देखिलें स्वप्न राजागनेनें. ।
'न जावें, प्रभू, राजभेटीस तेथें,' । दुती धाडिली शीघ्र सागावयातें." ॥ ३४
बंधुउत्तरें ऐकता बरीं, । धर्मजी वदे भारतापरी. ।
"देव नेणती अगनामतें । मान्य ते तया वीपर्यी रते. ॥ ३५
अगनामतें कोण भूपती ? । काय ते, सख्या, बुद्धि मानिती ? ।
अंगनामतें दु:ख पावले. । अगनामतें सर्व नाडले. ॥ ३६

सदा असत्य बोलणें, किमर्थ शद्ब मानणें,
कला अपार दावणें, नरोत्तमासि मोहणें, ।
अनेक अर्थ बोधणें, विशेष मद हासणें,
स्वहीत अर्थ रोधणें, अनर्थ पूर्ण माडणें, ॥ ३७
ठाणमाण चालणें, सखेद मद बोलणें,
करूनि पाप आदरें, अपार पुण्य वेंचणें, ।
करी तपासि विघ्न, हो, करूनि हेमभूषणें,
महत सत त्यासि, हो, अनगबाण विंधणें. ॥ ३८

प्रिया, हे रिती, बंधुराया, विचारा. । यमाची पुरी प्राप्त ते मुख्य दारा. ।
सख्या, वैभवें राजभेटीस जावें । सुखी बंधुराया प्रभूतें करावें ॥ ३९
दुती येउनी शीघ्र राजागनेला । म्हणे, " जावयाचा, सखे, नेम केला. ।
तुझीं उत्तरें सर्व म्या कीरिटीतें, । मृगाक्षानने, सर्व सागीतलीं तें. ॥ ४०

पतिव्रते, पराक्रमें कुरूप धर्म भूपती
चालिला त्वरीत, गे, सहीतसैन्यसपती. ।
सनात, बुद्ध सर्वही चमू अपार चालिले.
कर्जरीटलोचने, दिदीसि थाट दाटले. ॥ ४१
रथीं तुरग रगले, अभग भार चालिले,
अनेक ऊठती ध्वनी, तुरें गजांसि किंकिणी, ।

निशाण, छत्र साजिरें, सुवर्णदंड चामरें
'प्रभूवरी विराजलीं, दिनेश पूर्ण साजली." ॥ ४२

सांगतां दुती मात आंगणीं । द्रौपदी सती शंकली मनीं. ।
पातले पुढें दूत सांगती, । "अंबुजाननें, बैस, बो, रथीं. ॥ ४३

धर्मजी, नकूल, साहदेव, भीम, कीरिटी,
प्रतापमल्ल हस्तनापुरास चालले हटी. ।
करा त्वरा, चला, उशीर वेळ फार जाहली. "
बैसली रथीं जशी विद्युल्लता विराजली. ॥ ४४

रथारूढ होवोनियां पंकजाक्षी । त्वरें चालिली तै....जेथें मृगाक्षी. ।
पुरी पातली त्या कुरूनायकाची. । तुरें वाजती भीम नानापरीचीं. ॥ ४५
पुढें कौरवाधीश भेटीस आला, । म्हणे, " क्षेम दे, धर्मजी, बांधवाला." ।
पदीं देखिलें भूप सूयोधनाला, । अती आदरें धर्म भेटीस आला. ॥ ४६

भेटले भुपाळ बंधु धर्मजीस आदरें.
दुष्ट पापरूप काय बोलताति उत्तरें. ।
" करीत वृष्टि पीयुषाचि मेघराज पातला.
सूमनेंसहीत आजि कल्पवृक्ष देखिला. " ॥ ४७

मानसात पाप, बाह्यभक्ति फार बोलणें.
पतंगरंग साजिरा परंतु जाय जीवनें. ।
तेपरी सुयोधनें बहूत भाव दाविला.
सहीतबंधु धर्मजीस भूवनासि आणिला. ॥ ४८

भीष्म, द्रोण, हो, भेटती वरे; । भूपती पिता, मातु, सोयरे. ।
कर्ण भूपती शीघ्र पातला. । धर्मजी सखा बंधु भेटला. ॥ ४९
होति भोजनें ते दिशीं बरीं. । कर्म योजिलें कौरवीं विरीं. ।
त्या खळीं दुजे वासरीं प्रिती । आणिले सभे धर्म भूपती. ॥ ५०
हेममंडपीं बैसली सभा. । जडित पूतळ्या, फांकती प्रभा. ।
स्वस्थ बैसले सर्व भूपती; । श्रेष्ट वीर हे शीघ्र पावती. ॥ ५१

पातला वनराजसा, रविसूत हा विरकेसरी.
मुक्तमंडित, छत्रराजित चामरें ढळती वरी. ।

खड्ग, पट्टिश, खेटकें, शुल, तोमरें, धरिलीं करीं,
वैसला विरभार मंडित कुंडलीं किरिटीं शिरीं. ॥ ५२
पालखीवरि छत्रराजित, वीजिती किति चामरें,
चालला विर मंडितें करिं खेटकें आणि तोमरें. ।
जान्हवीसुत देखिल्यावरि राहिले नृपती उभे
पातला विर भीष्म मंडित वैसती नृपती सभे. ॥ ५३
छत्र, चामर, पालखी, रवि पूर्ण मंडित पातला.
वीरनायक खड्गमंडित राजभार विराजला. ।
वंधुभूपतिसूतसज्जनिं पंडुकूमरिं वंदिला.
द्रोण येउनियां सभे कुरुनाथसन्निध वैसला. ॥ ५४
सभे, भूप जेथें, कृपाचार्य आला. । प्रभूनें तयातें नमस्कार केला. ।
भुपा सन्मुखें वैसला आदरेंसीं. । त्वरें वैसले सर्व राजे सभेसी ॥ ५५
नृपतीसमे स्वस्थ भूपती । मंदसा वदे धर्मजीप्रती. ।
खेळ, रे सख्या, केंवि कर्मणें? । वाटतें मला द्यूत खेळणें. ॥ ५६
धर्मजी म्हणे, "शीघ्र आणणें. । मान्य जें तुम्हां, तेंचि खेळणें."।
वोलतां प्रभू, द्यूत आणिलें; । जडितमाणकें तेज फांकलें. ॥ ५७
वैसला नृपाळ धर्म पाट नीट सांवरी,
रक्तपीतपाचनीलरंगि सार त्यावरी; ।
सन्निधीचि दाट थाटली नटोनि अंतरीं.
सर्व धर्मजीस काय वोलताति उत्तरीं. ॥ ५८
"प्रभू, वाटगें काय खेळोनि यानें? । करूं नेम कांहीं, दिसे खेळ जेणें."।
म्हणे, 'जी, वरें,' धर्म सूयोधनातें । प्रिती आदरें दीधली भाष्य त्यातें. ॥ ५९
त्यावरी सुयोधनें त्वरीत वेग मांडिला;
कुमंगलें करोनि कर्म डावघाव इच्छिला. ।
जीतले अपार देश, राज्य, पूर, पाटणें,
रथी, तुरंग कुंजरांसहीत, मांदुसा, धनें, ॥ ६०
निशाण, सूर्यपर्णे, छत्र, वाद्य, दास, दूतिका,
अपार द्रव्य, माणिकेंजडीत हेमशीबिका. ।

सुखासनें, सुवर्णदंड, चामरें विराजळीं,
सुयोधनें समस्त वस्तुमात्र तेहि जिंतिली. ॥ ६१
जिंकिले नकुळ, साहदेव, भीम, कीरिटी,
धर्म, द्रौपदी सती, सभाग्य, केसरीकटी, ।
जिंतिलें समस्त. लोक विस्मयास पावले,
सभा तटस्थ सर्वही, उगेच मौन राहिले. ॥ ६२
यावरी त्वरीत कौरवेश हास्यउत्तरीं
बोलिला सभेसि, काय आठवूनि अतरीं. ।
जिंतिलें समस्त, आण भाग्य पूर्ण घेतली.
पांडवें सभेसि आज दीनरूप देखिली. ॥ ६३
बंधुजी, त्वरीत जाय भूवनासि आदरें.
द्रूपदात्मजेसि सर्व सांग मंद उत्तरें. ।
मंडपा त्वरीत देवि कंजरीटलोचना
नयेल, तैं वळें धरूनि आणिं अंबुजानना. ॥ ६४
भूपती नमूनि, बंधु भूवनासि चालिला.
देखिला दुरून जेंवि यमदूत पातला. ।
किंनिमित्त पैल आजि पापसिंधु येतसे,
विचार सार काळ तो; कठीण वेळ जातसे. ॥ ६५
'नेणवे सभेसि आजि काय, बाइ, वर्तलें.
अनाथनाथ, श्रीगुरूमुकुंदजीस मानलें! ।
धरूनि हेत पैल काय देवरासि धाडिलें ?'
शंकली मनांत नीर लोचनांसि चालिलें. ॥ ६६
सन्निधीचि वैरिबंधु सन्मुखोंचि आदरें
वंदुनी, वदे तिशीं सुमंदवाणि उत्तरें. ।
"पतिव्रते सभेसि द्यूत, आज भूप खेळले.
हारिलें समस्त हीनदीनरूप बैसले. ॥ ६७
सुयोधनासहीत भीष्म, द्रोण, कर्ण भूपती
बैसले समस्त वीरराज. सांगणें किती. ।

कृष्णसारलोचने, त्वरीत चाल मंडपा.
झणें उशीर लाविशी. स्थीर हेत टाकि कां. ॥ ६८
भूरती सभे आणवीतसे. । पंकजानने, चाल, राजसे. ।
वेळ कायसा लाविला असे? । भूपती बहू कोपला दिसे. " ॥ ६९
काय बोलिली देवराप्रती? । "धन्य, हो, सिमा तूमची क्षिती! ।
देवरा, तुम्हां लोक हांसती. । बैसले सभे सर्व भूपती. ॥ ७०
येकली सभे निंद्य नायका. । जाणतां तुम्ही, पुण्यदायका. ।
भूर देखती तूमची सिमा. । लाज, हो प्रभू, तूमची तुम्हां. ॥ ७१
बोलतां कशी भीड वाटली. । आजि, देवरा, होय माउली. ।
जनक होई, रे, आजि, देवरा. । चूलता, सखा, बंधु, सोयरा. ॥ ७२
नेतसां सभे कोण उचरें? । यांविशीं, प्रभो, मारणें बरें. ।
येकली सभे कंजलोचना, । भूपती कसें मानले मना? ॥ ७३
जान्हवीसुतासहीत कर्ण, द्रोण, भूरती
बैसले नृपाळ, हो, अनेक वीर भारती. ।
असे समेसि बंधुचे वधूस काय मान्यता ?
काढिला विचार सार आजि हेतु कोणता ? ॥ ७४
सखया, शिकवा सुपतीसि निती सकळांहि मिळोनि करा विनती.
असे कर्ण कृपाळु, कृपानिधि भीष्म, जयांसि असे मनिं हे सुमती. ।
स्वयें जाणति भूत, भविष्य बरें; बरवी कथिती सुपतीसि निती.
पद झाडिन केशिं," म्हणे अबला, "करुणावचनें करुं ग्लांति किती!" ॥ ७५
धरि चंद्रमुखी चरणांबुज, तैं कुटिलें कवळूनि तिची कवरी,
गज उन्मत पद्मलता जशि ने, मृगलोचनि नेत तयेचिपरी. ।
नयनीं निर दुःखित, सिंहकटी म्हणे ' राजसख्या, हळु वेणि धरीं.'
दिसे अंतकरीति, नसे करुणा, विवरून विचार धरीं पदरीं. ॥ ७६
किति मंडित वेणि विराजित वीगलित, प्रभु, हें सुपर्णे गळलीं.
मित्रवेष्टित पाचि, प्रवाळ, निळें, विरराजकरें सकळें तुटलीं. ।
उभें, आण तुम्हां कुरुनायजिची, गळती वसनें, प्रभु, हें चळलीं.
रति येक तरी धरिं भीड बरी. करिं येकसरी भुलिहे पडली! ॥ ७७

मुक्तपाचिनीळरत्नपुष्पराजमाळिका—
मणी महीस सांडले तुटोनि, भूमिपाळका ।
वदे; परंतु पापरूप मंडपासि पातला
उभी करून द्रौपदी, नमून भूप, बैसला. ॥ ७८

अंधकार या निमित्त दीर्वरूप दामिनी
प्रकाशरूप साजिरी, अमूप तेज तें घनीं; ।
मंडपांत तेपरी सभेसि कंजलोचनी;
फांकले अनत किर्ण तेजदीप्त कामिनी. ॥ ७९

ग्रिवा करून खालती उभी कुरंगलोचना.
झांकिलें तनूस हेमकांति, अंगभूषणां. ।
थांकली, मनांत तीसि कंप फार पातला,
मनीं त्वरीत सोइरा मुकुंदराज चिंतिला. ॥ ८०

सुंदरीस्वरूपरूप पाहतांचि भूपती
भले मनासि आंवरून, माधवास चिंतिती. ।
पाहती पतीत येक पापरूप आदरें;
व्यथा मिनध्वजें तयांसि फार लाविली शरें. ॥ ८१

किती बोलती, ‘ कोण लावण्य ईचें ? । उणें ईपुढें रत्न दुग्धार्णवींचें. ।
सुता साजिरी येक हीमालयाची; । शचीतें नये साम्यता द्रौपदीची. ॥ ८२
चतुवर्ग दारेसि हा याव कैंचा ? । पहा, ईपुढें कोण लेखा रतीचा ? ।
महीकन्यकेहूनि सौंदर्य भारी; । पुढें काय खद्योत या भूपनारी.’ ॥ ८३
वदे कौरवाधीश, “कर्णा, शुपाळा, । पहा, हो, इची कोण लावण्यलीळा. ।
कशी योतिली पूतळी मन्मथाची. । तनू गौर, लाला कळा हाटकाची. ॥ ८४
भुजंगापरी दीर्घवेणी सखीची; । मनोरम्य लावण्य या भ्रूलताची; ।
महामुक्तमंडीत नासा विराजे; । इचे नेत्र देखोनियां पद्म लाजे. ॥ ८५
अधर चांगले रंगले किती. । दशनदीप्तिचे कीर्ण फांकती. ।
विरॉजली कशीं कर्णभूषणें. । शोभलीं शिरीं मुक्तसूमनें. ॥ ८६
कर्ण शोभले रत्नभूषणीं. । जोडिले हिरे हेमकोंदणीं. ।
थाटलीं ग्रिवे मुक्तमाणिकें, । बाधिलीं किती दीप्तिदायकें. ॥ ८७

हृदयीं सुपर्णे किति रम्यपणें दिसे तेज दुणें पदकावलिनें.
कुचकुंभ कसे, दृढ विल्व जसे; वरि वाळि असे शरमुक्तमणी. ।
भुजदंड कसे, गजशुंड तसे; करि दाटि तसें बहु तेज चुडां.
पहॉ पाणितळें अरुणें अमळें; भुलवी सकळै इचि कोण कळा ? ॥ ८८
दिसे सिंहकटी, कटिसूत्र कटीं, वरि रम्य घटी परिधान असे.
पदिंचीं सुपणें किति रम्यपणें; सुपरात्र मनें किति मोहियले. ।

.... .... .... .... .... .... .... .... .... .... ....
.... .... .... .... .... .... .... .... .... .... .... ८९

भूपती सभे हेंचि बोलला. । "भूपहो, सुखें वीनवा इला. ।
'भूपती मनीं हेत, कामिनी, । भूपती गृहीं होय गेहिनी.' ॥ ९०
भूपतिप्रिये वीनती करा, । भूपसुंदरी वीनवा गिरा. ।
भूपहो, म्हणा, 'अंबुजाननें, । भूपती वरीं, कंजलोचने.' ॥ ९१
म्हणे भीष्म तो, "ऐक, राया सुपाळा. । वृथा बोलसी पाप हें, भूमिपाळा. ।
सुपा, आणिली कां सभे राजबाळा ? । कुडी वासना सांडि वेगीं, नृपाळा. ॥ ९२
असेंचि रावणें कुडें महीसुतेसि इच्छिलें,
अपार राज्य, भारता, कुळासहीत आटलें. ।
श्रिरामचंद्रनायका अपार दुःख पावली,
तसीच विघ्र द्रौपदी सती सभेसि आणिली. ॥ ९३
कुबुद्धिहेतु चंद्रमा गुरूवधूसि रातला,
जेणें जगांत निंद्य हो कलंक त्यासि लागला. ।
बळें निशुंभशुंभनाम दैत्य फार मातला,
अनादि, आदि खेचरीकरेंचि मृत्यु पावला. ॥ ९४
सुता साजिरी रत्न हीमालयाचें; । तियेच्या सुखें भस्म जालंधराचें. ।
कुडें कर्म इंद्रें अहल्येसि केलें, । नृपाळा, भगांकीत सर्वांग झालें. ॥ ९५
कुडी बुद्धि भस्मासुरालागिं होतां । जळाली तनू हस्त ठेवोनि माथां. ।
नृपाळा, सुखें सोडि राजांगनेला. । वृथा आणिली बंधुजाया सभेला. ॥ ९६
रवीतुपार तेपरी तुरग रंगले किती ?
अनेक रूप, साजिरे, समीरतुल्य धांवती; ।

तसेंच हस्ति मस्त, हो, मदेंकरूनि डुल्लती.
गिरीसमान भार फार हस्तिबंध, भूपती. ॥ ९७
अनूज, सूत पाठिसीं, बलाढ्य वीर पाइंचे,
कुलांतहेर जेपरी अपार वीर पाइंचे; ।
हिरेजडीत भूषणें, असंख्य सैन्य, संपती;
तुजसीं समान कोण भूप मेदिनीप्रती ? ॥ ९८
स्वरूपरूप पद्मिनीपरीस, कंजलोचनी,
गुणें सभाग्य, सुंदरी, असोनि तूज कामिनी; ।
अपार राज्य भोगि हें समस्त, भूमिपालका,
सभेसि काय आणिली बलाढ्यबंधुनायका ? ॥ ९९
कुबुद्धि सार हे नव्हे; कुलांगनेसि इच्छितां.
अपार दुःख पावले; करीं विचार, भारता; ।
निधीसमान संपती, परंतु सर्व नासती,
पतंगरंग मानवीं, मुधा, नयेल मागुती. ॥ १००
सांगतों बरें, भूमिपाळका. । सोडिं हे सती, बंधुनायका. ।
येकली सभे काय हे सती । राहिली उभी? सोडिं, भूपती. " ॥ १
बोलिला किती नीतिउत्तरें, । " भूपती, नव्हे सर्वथा बरें. ।
पापसिंधुचे बैसुनी तिरीं । काळक्षेप हे कोण सांवरी ? ॥ २
येकली सभे कंजलोचना; । भूपती, कसें मानलें मना ? ।
बंधुअंगना माउलीपरी, । भूपती, मनीं बुद्धि हे धरीं." ॥ ३
कृपाचार्य, भीष्मादि द्रोणा नृपानें । नृपालासि सांगीतली बुद्धि मानें. ।
सिमा सांडिली, क्रोध अद्भूत आला. । वदे काय वज्रापरी शब्द त्यांला? ॥४
"जरा तुम्हांसि पातली, म्हणोनि बुद्धि मंदली.
नव्हे स्वहीत बोलणें अपत्यबुद्धि ठाकली. ।
पुसों तुम्हांसि ते दिसीं स्वहीतबुद्धि सांगणें,
सकाम सर्व विस्पती, तुम्हास काय पूसणें ? ॥ ५
न ये तुम्हांसि बोलतां सभेसि काय जल्पतां ?
जयासि मंद भारती, तयासि काय योग्यता ? ।

गुणें बहूत आगळे, परंतु आजि मूर्खता.
टाकिला विचारसार हेत आजि कोणता ? ॥ ६
जरी चाड बैसावयाची सभेसी, । तरी लाविजे आपुल्या लोचनांसि. ।
कळों सर्व चातुर्य आलें मनाला, । उठोनी तन्ही जा सुखें मंदिराला. ॥" ७
वदे भूपती शद्बसंधान रोषें. । सभे दुःख भीष्मासि झालें विशेषें. ।
तदा बोलती "कौरवेशा, विचारीं. । दुराशा तुझी हेच वीशानसारी(?). ॥ ८
प्रभू, हें तुझें पूर्ण प्रालब्ध जैसें, । पुढें संचलें दीर्घ संचीत तैसें. ।
क्रिया हे तयासारिखी दीसताहे, । पुढें सर्व जाईल कांहीं न राहे. ॥ ९
विचारीं मनीं हे विशें कोण ज्याले ? । नृपाळा, मदें मातले ते निमाले." ।
वदोनी सभे बैसला पुण्यराशी. । दुरात्मे तदा येक झाले त्वरेसीं. ॥ ११०
" आतां खंजनलोचने, त्वरित ये तूं; बैस अंकावरी.
पाहें भाग्य तुझें समस्त अवघें, हे संपदा, सुंदरी. ।
आहे कोण दुजा समान मजसीं ? हें तूं बरें जाणसी.
टाकीं पांडवआस, हेत मनिंचा, कां, गे, वृथा शीणसी ? ॥ ११
त्यजितों सकला अब्ला भुवनीं । मृगलोचनि ज्या जुनिवा, सजणी. ।
करिं रत्नप्रवाळनिळां भुषणें. । सुखि नांद घरीं वरि येकमनें. ॥ १२
केसरीकटीस पूर्ण शद्बबाण लागले.
पती सभेसि भूपती उगेचि मौन्य देखिले. ।
कर्ण, द्रोण, भीष्मराज मंदमूख बैसले.
भूपतीअनूजसूत यमरूप भासले. ॥ १३
घृतेंकरूनि शिंपितां प्रचंड ज्वाळ पेटली,
फणींद्रनाथकामिनी विशाळ जेंवि कोपली, ।
तयेपरी नितंबिनी सभेसि दिव्य दामिनी
बोलली भुपास काय कंजरीटलोचनी ? ॥ १४
" सूर्यसूत, भूपती, तुम्हांसि नीति मानली.
महींत कोणि, भूपहो, सती सभेसि आणिली ? ।
तथापि कोण वाक्य हें पतीत ? बुद्धि टाकिली.
शीकवा भुनायकास काळवेळ पातली. ॥ १५

जान्हवीसुता, वीनती तुम्हां. । शीकवा बरी बुद्धि अधमा. ।
अधमें कशी भीड साडिली ? । पापरूप कां बुद्धि ठाकिली ? ॥ " १६

प्रभूस व्याधि लागली, अखड होत पाचना;
विवेकवैद्यराज बुद्धिऔपधींसि मेळवा. ।
मुखात रोग, जल्पतो, भल्यासि भूप दाखवा.
सभे समस्त भूपती कुरूपतीसि वांचवा. ॥ १७

कुरूपतीसि ठाकिली भविष्यभूतभावना,
म्हणोनि वर्तणूक हे सभेसि बधुअगना. ।
प्रभूस भूत लागलें, त्वरीत झाडणी करा.
करा बहूत यत्न, यासि सर्व भूप सावरा." ॥ १८

कर्ण वीर, द्रोण, भीष्मदेव, सर्व भूपती,
तीर्थराज बैसले, परतु मद भारती. ।
एकली दिनासमान पापरूप गाजिती.
वाटलें मनासि दुःख दुष्ट काय बोलती ! ॥ १९

"अरे, कुरूप, पापरूप, दुष्ट भूप, दुर्जना,
अभाग्य, दीनदुर्बळा, पतीत हेत का मना ! ।
दुष्ट शीळ, दुर्मती, अनित्य पाप जल्पसी,
लघू अनाथ किंकरा, तुं काय शब्द बोलसी ? ॥ १२०

दुःशिला, खळा, दीर्घभावपा, । कंटका हिना, भारता नृपा, ।
दु.शिला, खळा, धिग्य, रे, जिणें ! । पापसागरा, काय बोलणें ! ॥ २१

शर्करा दुरी टाकिली सळें, । मृत्तिका मुखीं घातिली बळें; ।
तेपरी तुतें राज्य भोगिता, । आणिली सभे बधुभाज तां. ॥ २२

मानलें कसें, कूळपावका ! । भोगिसी कसी बंधुनायका ! ।
वाटलें तुतें काय, निष्ठुरा ! । टाकिली कसी वोळखी, खरा ! ॥ २३

कुटिल, कामलंपटा, मनासि चोज वाटलें.
द्रौपदीसि आणिता, रे, काय तूज भासलें ! ।
वायसासि प्राप्त केंवि राजहंसनायका ?
तेपरीच द्रौपदी, विचारिं, दुःखदायका. ॥ २४

पशु मातला, थोर कामांध झाला, । स्वमातेसि भोगी, नसे लाज त्याला; ।
तयाचेपरी तूं मदें मातलासी; । कशी वोळखी सांडिली, पापराशी? ॥ २५
ऋषीची वधू काय, रे, अंत्यजासी ? । अरे दुर्जना, केंवि शोभेल त्यासी? ।
असे चंद्रमा शंकराचे कपाळीं, । कसा साजिरा तो दिसे श्वानभाळीं?॥ २६
गौतमी त्यजी सिंधुतें जरी, । क्षुल्लका नद्या आदरें वरी. ।
पार्वतीपती वाधिजे सुतें, । मद चंद्रमा सीत मारुतें. ॥ २७
सिंहसुंदरी काय जंवुका ? । भेक इच्छिता व्यालनायका ! ।
रत्नमालिका काय, रे, खरा ? । काय कस्तुरी ग्रामसूकरा ? ॥ २८
वोणवा वनीं शिंपिता घृतें, । पामरा, जरी बाधिजे सितें ।
पूर्णिमा जरी साडिली वरी, । आदरें अमा चंद्रमा वरी. ॥ २९
टाकिजे धरा व्यालनायकें, । सांडिजे जरी दीप त्रिबकें, ।
साधिजे जरी सिंह जवुकें, । टाकिती अही आपुलीं विखें, ॥ १३०
करी खड्गधारा जरी चूर्ण वोटीं, । जरी वन्हि सोशील हे मेघवृष्टी, ।
जरी अंधकारीं बुडे तेजराशी, । जरी मूषकें भेदिजे कश्यपासी; ॥ ३१
कुरुपती, जरि हें इतुकें घडे, । तरि तुतें द्रुपदी सति नांतुडे, ।
तुज असे वधु सुंदर येकि, रे. । वरि दिसे वरवा शुभ अंक, रे. ॥ ३२
भूपती असे रम्य कामिनी; । दामिनी जशी साजिरी घनीं. ।
कांतिच्या तिच्या फांकती प्रभा, । होय ते तुझी प्राणवल्लभा. ॥ ३३
सुंदरी स्वयें शोभली असे, । शोणितें सदा चर्चिली दिसे, ।
दशनवेलिच्या फांकती प्रभा, । होय ते तुझी प्राणवल्लभा. ॥ ३४
नेटकी रूपें कंजलोचना, । घातला तिनें काळ आंकणा, ।
देखतां तितें कंप, रे, नभा, । होय ते तुझी प्राणवल्लभा. ॥ ३५
पद्मिनीपरी बोधवी मना, । देतसे कशी दुःख दुर्जना, ।
काळही मनीं शंकितो उभा, । होय ते तुझी प्राणवल्लभा. ॥ ३६

मक्षिते रजमांसशोणित, मारिते रजनीचरां.
दैत्यदानव, वीर मानव, त्यांसि अंतरिं भेदरा. ।
पामरा तुज तेपरी वरि अंकमंडित साजिरी,
राज्यवैभव, सूतबांधव, भोगिं संपति सुंदरी. ॥ ३७

जरा, मृत्यु नाहीं, गदा नाम तीचें. । करी सर्व निर्मूळ, नष्टा, चराचें. ।
तिचें नाम घेतां पडे घोर भ्रांती. । वसो तेचि अंकीं तुझे प्राणहर्ती. ॥ ३८

कुलांगनेसि इच्छितां सवेग मृत्यु पावसी.
सती सभेसि आणिली रणक्षितीसि लोळसी. ।
कुटीळ नेत्र जे, भरें रणांत गीध भक्षिती,
सुतें, विशाळ श्वापदें वनांत मांस वांटिती. ॥ ३९

बहु दुःख गंगासुतालागिं जालें । म्हणे, " भूपती; फार म्यां सीकवीलें. ।
मदाचेनि गर्वे, प्रभू, नायकेसी. । करें आपल्या लाविलें पावकासी. ॥१४०
बुद्धि हे तुझी वन्हिची खरी, । साह्य बंधु ते मारुतापरी; ।
काम ना वनीं वन्हि पेटला. । सांगतां तुतें कोप वाटला. ॥ ४१
प्रारब्धरेखा अति दुष्ट आहे. । केलें वरें संचित पूर्ण पाहें. ।
त्या सारिखें, रे, क्रियमाण आतां; । तें टाकिलें, रे, तुज सीकवीतां. ॥ ४२

कोपला भुपाळ काळक्रोधरूप बिंबले,
वमी विशाळ व्याळ काळकूट जेंवि आपुलें. ।
पाहिल्या विशाळ ग्रंथि भ्रूलतांसि सादरें.
बोलिला सभेसि काय द्रौपदीसि उत्तरें? ॥ ४३

सुंदरी, अगे, काय तूं सती? । भोगिसी कसे पांचही पती? ।
लोक हे तिन्ही नायका किती । देखती, तयां येकची पती. ॥ ४४
पूर्णता नव्हे येकल्या नरें, । कामुके, तुतें मानले बरें. ।
पांचही पती, साधिती तपें. । कोण, गे, सिमा सांग तूज पें? ॥ ४५
ति हें कसे मिरविसी जनीं? । तूजसारिखी कोण पापिणी? ।
द्ध, गे, तुझे बाण लागले, । विंधिलें बळें पूर्ण भेदिलें. ॥ ४६
द्ध ते विषापरि वमिसि कसे? । अणुमात्र कशी तुज भीड नसे,! ।
तिते, तुझि पाप वदे रसना. । करितां शतखंड नये करुणा. ॥ ४७
तेळतुल्य तनू करितां निकरें । तुज राखिल कोण? विचारिं बरें. ।
करितां ताडण तुज दुःख जरी, । तुज कोण सखा? खरें सांग तरी. ॥ ४८
पुडितां पदपाणिपयोधर, गे । कुटिले, मज तों क्षणही नलगे. ।
ति देखत, पापरुपे, तुज, गे, । निकरें मुख तोडुन टाकिन, गे. ॥ ४९

रक्षिता तुतें कोण सांग तो ? । साम्पता मतें कोण वीर तो ? ।
मारितां तुतें नीकरें करें, । वारिजे मतें कोणत्या विरें ? ॥ ५०

पापरूप भारती तयेसि आजि छेदितों,
परंतु बधुभाज, गे, म्हणोनि भीड राखितों. ।
विटंबितों सभेसि तूज सर्व भूप देखतां.
बळेंकरून कोण, गे, भुपाळ, सांग, वारिता? ॥ ५१

सभे श्रेष्ठ भद्रासनीं स्वामि तूझ । कसे बैसले, गे, सभे बधु माझे ?।
कृपाचार्य, गे, भीष्मद्रोणादिकाचा । श्रुती नाम राजा; नव्हे पाड त्यांचा. ॥ ५२
तुझें चैल घेता सभे देखता, गे, । तुलें देखती नग्न हे भूपती, गे. ।
तुझें गुह्य, गे, विश्व देखेल आतां. । तुला कोण, गे, रक्षिता, सोडवीता?५३
वदे भूपती दुष्ट, काळस्वरूपी; । वमी वीष जैसा अही दीर्घकोपी. ।
करी अवरीं गर्जना मेघ जैसा, । कुरूनाथ बोले सभेमाजि तैसा. ॥ ५४
अथानतरें काय दुःशासनातें । म्हणे? "रे, करीं नग्न दोषाचरीतें. ।
सभेमाजि बोलों सरे पापसिंधू । त्वरेनें तसा ऊठिला राजबंधू. ॥ ५५
भुजंगापरी दीर्घ वेणीस कांपे । करें नीकरें वेष्टिलें पापरूपें. ।
दुजा पाणि घाली निरीमोचनातें । किती होतसे दुःख साधू जनातें ! ॥ ५६
अथानंतरें ते करी स्तोत्र बाळा । मुकुंदा, हरी, माधवा मेघनीळा, ।
कृपाळा घन श्याम, गोविंद, शौरी, । चिदानंदआनंदकंदा मुरारी, ॥ ५७

गोपिवल्लभ माधवा, हरि, यादवा, मधुसूदना,
अच्युता, उपइंद्र, ईश्वर, कामिनीमनमोहना, ।
नंदनंदन, इंद्ररक्षण, श्रीहरी अरिमर्दना,
पूतनांतक, अंतकांतक, दासतारक वामना, ॥ ५८

शामजी, सखया, हरी, सभे सर्व अंतक बेसले.
धांव, रे, करुणाकरा, प्रभु; पाव सत्वर माउले. ।
केशरी असतां शिरीं अरि गांजिलें त्वरें धाव. रे,
चतूर, सुंदर, डोळसा, क्षण येक टाकुनि पाव, रे. ॥ ५९

रुक्मिणीपति, कर्णिकातिरवासिनी, यदुनायके,
श्यामले, मुरुमर्दने, कुळदैवते, वरदायके, ।

सांवळे, मुरलीधरें, कमळाननें, जगव्यापके,
गांजिलें मज दुर्जनीं सभें येकली, सुखदायके. ॥ १६०
ये त्वरें, यदुनायका, करुणानिधी; मज सोडवीं.
*श्यामसुंदर रूपडें समयीं असें ऑजि दाखवीं;* ।
ये हरी, धरिली गिरी, न दिसे उरी, जगजीवना.
भक्तवत्सळ हें ब्रिदें तुझि कायसीं मधुसूदना ! ॥ ६१
चिद्रुपा हरि, चिद्धना, चरणांबुजें तुझि चिंतिती,
देव, फणिवर, यक्ष, चारणलोक मुनिवर वंदिती. ।
जयजया जगव्यापका, नतपालका ऑजि ये हरी.
पाव सत्वर सिंधुजापति; सर्वथा न उरे उरी. ॥ ६२
अनाथनाथ, बंधुजें, क्षणीं विलंब लाविसी.
उशीर फार जाहला, हरी. मला न पावसी. ।
*जळीं गजेंद्र गांजितां, हरी, त्वरीत सोडिला.*
द्रौपदीसि गांजितां, रे, *काय लोभ आटला !* ॥ ६३
दयाळ देवराव, दीनबंधुराज, सोयरा.
इला समीर जीवनीं भरूनि तेज अंबरा. ।
फोडिला विशाळ स्तंभ, भक्तराज रक्षिला.
द्रौपदीसि गांजितां, रे, काय लोभ आटला ! ॥ ६४
मयोरपिच्छभूषणा, त्वरीत पाव, यादवा.
कृपाळु कृष्णबंधु मी, रे, पाव, पाव, माधवा. ।
मागतांचि क्षीर त्यास क्षीरसिंधु दीधला,
द्रौपदीसि गांजितां, रे, काय लोभ आटला ! ॥ ६५
मुकुंद, देव, वासुदेव, ज्यासि नाम चांगलें;
परंतु दीन येकलें सभेसि काय टाकिलें ! ।
ध्रुवासि राज्य दीधलें, विचार तूज मानला.
द्रौपदीसि गांजितां, रे, काय लोभ आटला ! ॥ ६६

पंकजानना, सुंदरा, हरी, । धांव, रे, सख्या; गांजिती अरी. ।
सर्वही सभे दुष्ट बैसले. । आजि तू त्वरें पाव, माउले. ॥ ६७
चिंतिती सदा द्रौपदी सती, । मानसीं तुझ्या 'पावणें किती ?' ।
हें जरी, हरी, मानलें तुतें, । सोडवी तरी कोण आमुतें ? ॥ ६८
छळीती, हरी, बाळकें माउलीतें, । न वाटे परी सीण तीच्या मनातें. ।
कदापी नव्हे माय निष्ठूरहेतू; । मुकुंदा, तसीं माउली आमुचि तूं. ॥ ६९

राज्यसौख्यसंपत्तीसि रातलासि, वामना ?
गुतलासि भोगितां, रे, कंजरीटलोचना ? ।
नश्वरासि, ईश्वरा, तुं लुब्धलासि काय, रे ?
अनाथनाथ, दीनबंधु, नाम वेर्थ जाय, रे. ॥ १७०
विधीनिमित्य मत्स्यवेशिं दैत्यनाथ शोधिला,
द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ।
तळासि जाय मेदिनी, रे, कूर्मवेश घेतला,
द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ॥ ७१
शूकरावतारिं हेमनाम दैत्य मर्दिला,
द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ।
भक्तभारतानिमित्य नारसिंह पातला,
द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ॥ ७२
भक्तराजद्वारपाळहेतु तूज मानला,
द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ।
बहूत वेळ हा भुगोळ सर्व दान दीधला,
द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ॥ ७३
श्रिराम पूर्ण ब्रह्म सर्वदेवबंद सोडिला,
द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ।
मुकुंदराज आठवा सभेसि आजि चिंतिला.
द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ॥ ७४
बौध्य अवतार बंधु द्वारकेसि राहिला;
द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ।

निःष्कळंक देवराव, लोभ सर्व टाकिला,
    द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ॥ ७५
शीणलें परंतु श्याम कामिनीसिं गुंतला,
    द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ।
कल्पवृक्षराज, आजि लोभसिंधु आटला,
    द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ॥ ७६
लागला उशीर तूज, कोण भक्त भेटला ?
    द्रौपदीनिमित्य तूज फार शीण वाटला. ।
दिना समान येकली सभेसि, भूप कोपला,
    कोणते कळेसि आजि देवराव गुंतला ? ॥ ७७
विधी, वरूण, इंद्र, चंद्र, ध्याइल्यासि शंकरें.
    फणींद्र, हे मुनींद्र तूज चिंतिताति सादरें. ।
सिमा श्रुतीसि नाकळे, रे, ' नेति नेति ' उत्तरें,
    सांवळ्या, त्वरीत पाव द्रौपदीसि आदरें. ॥ ७८
उदार, धीर माधवा, गणील कोण वैभवा !?
    व्रजांगनांत खेळणें, लिलाविलास. यादवा. ।
गोपिनाथ, पूर्ण ब्रह्म गोपवेश खेळणें;
    गाजिलें सभेसि आजि द्रौपदीसि पावणें. ॥ ७९
कोणत्या वनात आजि कामधेनु गुतली ?
    अंझुनी नयेचि देव, कारुणेश, माउली. ।
दुष्ट, बंधुराज, पापरूप चैल घेतसे,
    धांव, पाव, माधवा; कठीण वेळ जातसे. ॥ १८०
करी स्तोत्र नानापरी हाटकांगी. । घनःश्याम तो चालिला लागवेगीं. ।
खगेशासि सांगे, "त्वरें चाल तेथें,। असे पंकजाक्षी सभेमाजि जेथें." ॥ ८१
नभीं सूटला वायु पक्षद्वयांचा, । रजें दाटला प्रांत अष्टां दिशांचा. ।
मनोवेग तो टाकिला दूर मागें. । सभे पातला कान्हया लागवेगें. ॥ ८२
तिनें देखिली मूर्ति दामोदराची; । झुमी होतसे वृष्टि त्या लोचनांची. ।
म्हणे, "नाभि, गे, पावलों." द्रौपदीतें. । करें कान्हयें पूसिलें लोचनांतें. ॥ ८३

मुगुटमंडित माणिकें रवितेजराजित शोभली.
रेखिला मृगनाभि सुंदर, श्यामता किति बिंबली. ।
भ्रुकुटि शोभति कार्मुकापरि, सरळ नासिक साजिरें,
कमळलोचन, दशनराजित अधर, आनन गोजिरें. ॥ ८४

श्रवणिं डोलति कुंडलें मकराकृती विजुचेपरी;
मालिका नवरत्नराजित, केयुरें भुजि साजिरीं, ।
मुद्रिका वरि कंकणें, बरि ऊटिचर्चन केशरें,
शंख, अंबुज, चक्र, पट्टिश; पीतअंबर साजिरें. ॥ ८५

जडितमाणिकमेखळा कटिं शोभती लघुकिंकिणी.
आंदु नेपुरवांकिराजित ऊठती मधुरा ध्वनी. ।
गरुडवाहन, पंकजानन, पावला द्रुपदीप्रती.
जान्हवीसुत, भास्करात्मज, द्रोण देखति श्रीपती. ॥ ८६

द्रौपदी म्हणे, "बधुकेसरी, । सांवळ्या, बहू गांजिती अरी. ।
काय, रे हरी, लोभ टाकिला? कोणता तुतें छंद लागला? ॥ ८७

भक्तवत्सला, दुःखवारणा, । कोण हे रिती, आणिजे मना." ।
बोलतां कसा कंठ दाटला. । लोचनीं किती पूर चालिला. ॥ ८८

बोलिला हरी, "माय, ऊगली. । कौरवांसि, गे, ठाकली भुली. ।
भस्म हे पुढें होति सर्व, गे. । मातले मदें पापरूप, गे." ॥ ८९

धरेना पुढें क्रोध दुर्योधनातें. । वदे काय निष्ठुर दुःशासनातें? ।
"त्वरेनें हरीं, रे, इच्या अंबरातें, । करीं नग्न वेगीं, सख्या, पापिणीतें." ॥ ९०

असें बोलतां भूप संतापकोपें, । तसें चैल्य आंसूडिलें पापरूपें. ।
किती होतसे दुःख साधूजनांला । स्मरोनी हरी. लाविती लोचनांला. ॥ ९१

तसें चैल्य आंसूडितां लागवेगीं, । दुजें देखिलें हेमरंगी सुरंगी. ।
सभे मानिलें चोज तेव्हां भुपानें । म्हणे, "काय कौसाल्य केलें सतीनें?" ९२

वदे भारती त्या सभेच्या जनांसी. । "पहा बुद्धि पांचाळराजात्मजेसी. ।
परी कर्मरेखा कदापी टळेना. । दिसे घेतल्या चैल्य हें नग्न जाणा. ॥ ९३

दुःख रुजनांसि, सूख दुर्जनांसि वाटलें.
त्वरीत बंधुनायकें निशाळ वस्त्र वोढिलें. ।

कितेकांवरी पक्षि नानाविलासी; । किती येक तें हारिणी पाडसेसीं; ।
कितेकांवरी ते सभा वासवाची; । मनोबुद्धि विस्मीत दुर्योधनाची. ॥ २

आले द्राविड, गौड, कोंकण, कळा, कोल्हार, कासिंबरी,
अंगे, वंग, कलिंग, गुर्जर, गया, गांधार, कासीपुरी, ।
मारु, माधव, माळिवा, मधुमती, वैदर्भ, वैराटिका,
येती मागध, वागलाण, कनुजा, वैराट, कर्नाटिका. ॥ ३

मलेबार, वंगाल मंजूबुटींचीं; । खुरासान, नेमाड, जाळंधरींचीं, ।
महीपाळका, उत्तमें कैकटींचीं, । वळेंहार, तैलगणें, वर्वरींचीं. ॥ ४

वाळुकासि धूम्रगोड ब्रह्म, चीन, सोरटें,
कळावपारदेश हेमततु चैत्य चोखटें. ।
सभे गिरीसहीत भोट, वैन देश पातला.
नंदनादिदानदेश पारिजात देखिला. ॥ ५

द्राविडादि मूलतान, वत्रमूख देसिचीं
सीत वाढि चंद्रसेख कंजनाक्षि राजिचीं. ।
दक्षणेसहीत सर्व देश दिव्य अंबरीं,
पातळें विशाळ पूर सिंधुलोट जेपरी. ॥ ६

अतळ वीतळ सुतळ तळातळ रसातळहि तळें,
तगटि आकुश रत्नराजित सदटणें सरपातळें. ।
भुवन भूतळ मेरु मंजुळ कनकमडित अंबरें
नेसली द्रुपदात्मजा. कुरुनाथ देखत सादरें. ॥ ७

त्वरें पातलीं अंशुकें द्वारकेचीं. । असंभाव्य तें दिव्य मायापुरींचीं. ।
अयोध्यापुरी ते रघुनायकाची. । असंख्यातरंगें छिटें बंदरींचीं. ॥ ८

प्रतिष्ठान, पद्मावती पूर्णरंगें, । त्वरें पातलीं मैथिलीं लागवेगें. ।
सुरंगीत तें अंबरें पट्टणींचीं. । द्विपें सप्त लावण्य ते शीवकांची. ॥ ९

सभे लोटला सिंधु दिव्यांवरांचा; । तरीं लागला बंधु दुर्योधनाचा. ।
वळेंसीं किती अंबरें राजबंधू? । किती वोढितां भागला पापसिंधू. ॥ २१०

हरी येक अंशूक जों राजभ्राता, । चतुर्भूज तों नेसवी कंसहंता. ।
फिरे मागुता हस्त दुर्योधनाचा (?) । पुढें थाट तो नीट दिव्यांवरांचा.॥११

गिरीचेपरी ढीग दिव्याबराचे, । जसे मातले पूर भनूनिन्नीचे. ।
किती वोढिता भागला पापसिंधू. । निमाली मुखश्री, उभा राजबधू. ॥ १२
द्रोणादि भीष्म, शकुनी श्रवणाभिधानी
त्यातें म्हणे नृप कसा स्वबळाभिमानी. ।
"हे सुदरी कपटि, कूटिळ, कजनाक्षी.
मायाबळें सकाळ मोहित पकजाक्षी. ॥ १३
इनें बाधिली दृष्टि आधीं सभेची. । गती राहिली सर्वही लोचनाची. ।
इतें लक्षिता देह काहीं दिसेना. । इनें गोंविले चक्षु, काहीं सुचेना. ॥ १४
पहा, बधु माझा बळान्नीत मानें, । तुम्हा देखता जिंतिला इंद्र जेणें, ।
तया वोढिता अवरें शीण झाला. । महावीर तो भग्न होऊनि ठेला." ॥ १५
वदोनि हेंचि उत्तरें त्वरीत बधु वारिला.
वदिला भुपाळ; बधु सन्मुखेंचि वैसला. ।
बधुपच भूप धर्मराज दु ख पावला. ।
निकें म्हणोनि अतरीं मुकुंदराज चिंतिला. ॥ १६
अथानतरें द्रौपदी भूपतीतें. । म्हणे, " आणि, रे, द्यूतकर्मासि येथें. ।
तुवा जिंतिला धर्म कापट्यबुद्धी. । पुन्हा द्यूत खेळों, त्वरें आण आधीं." ॥१७
असें बोलता आणिले द्यूत वेगीं. । भुपाळापुढें माडिले त्या प्रसंगीं. ।
स्मरोनी हरी वैसली हाटकागी. । उभा राहिला कान्हया पृष्टिभागीं. ॥ १८
वैसली सभेसि देवि कजरीटलोचनी.
शोभली नभात जेवि दिव्यरूप दामिनी. ।
स्मरोनि देव अतरीं त्वरीत डाव टाकिला,
सोडवी पतींसि. भूप अतरास खोंचला. ॥ १९
आपणासि सोडवी त्वजूनी डाव दूसरा.
पाठिसी अनाथनाथ, दीनबधु, सोयरा; ।
म्हणोनि डाव जिंकिला, कळे जनासि कायसें ?
परतु काय जाणतील पापरूप बापसें ? ॥ २२०
पातला पुढें शकुनि आदरें, । भूपतीप्रती बोलिला बरें. ।
"कुळांगनेसि, हो, काय खेळणें?" । मेडिलें कर्म गूर दुर्जनें. ॥ २१

अथानतरें तो उठे पापसिंधू. । निघाले सर्वे सर्वही राजवधू. ।
असंख्यात वेष्टीत तो वीरमेळा । नृपाळासवें चालिला, लोकपाळा. ॥ २२
दिनाचेपरी देखिलें पांडवातें; । दयापूर आला कृपासागरातें. ।
करी लोम माया जसी बाळकातें, । करें कान्हयें पुसिलें लोचनातें. ॥ २३
धर्मजीप्रती प्रेम नावरे. । भूपती उभा राहिला त्वरें. ।
स्वजन, सोयऱ्या, सावळ्या, हरी, । जनक, माउली, आमुची खरी. ॥ २४
चिद्धना, हरी, देवनायका, । सगुण, श्यामला, विश्वव्यापका, ।
जय जया जया सिंधुजापती, । वर्णिता तुतें भागल्या श्रुती. ॥ २५
हरी, सिंधुजामात, देवा, समर्था, । कृपाळूपणें वारिसी भक्तचिंता. ।
तुझा पार नेणे स्वयें सृष्टिकर्ता. । त्रिदें साच केलीं तुवा आजि, ताता.॥ २६
कळेना सिमा हे धराधारकातें, । कळेना तुझें रूप वेदा स्मृतीतें, ।
कळेनासि ध्याता महायोगियातें, । असा पावसी भक्तभावार्थ जेथें. ॥ २७
मुकुंदें किती वारिला, बैसवीला. । समाधानवृत्ती स्वयें नीववीला. ।
चतुर्भूज सर्वोत्तमें धर्मजीतें । कृपाळूपणें वीज सांगीतले तें. ॥ २८
सभापर्विंची हे कथा पूर्ण जाली. । यदूनायकें सर्व संपूर्ण केली. ।
जयामाजि हे कीर्ति नारायणाची । जना तारिते भीम पाळी भवाची. ॥ २९
जैं तो शक वेदफणींद्रतिथी, ऋषिआत्मज तो परिधावि असे,
वर्षा ऋतु, श्रावण शुद्ध विजे, भृगुवार, मघा उडु पूर्ण वसे, ।
वर यान घटी शरवेद इती उदयीतनयेमिहि जन्म दिसे,
कवि रामसुतात्मज दास नवा रुप पद्मतळातळिं राजितसे. ॥ २३०
वसूची पुरी, ती तळीं ग्राम आहे; । जयाचें 'तुळा' नाम हें शोभताहे. ।
वसे मंडळी सर्वही सज्जनांची. । पहा वस्ति ते रामसूतात्मजाची. ॥ ३१
जयाचा पिता नाम वीनायकाचें, । यशोदा अभींधान मातेसि साचें. ।
मुळारंभ हा वेद सुदर्य आहे. । सुरारीरिपूचा गुरू गोत्र पाहें. ॥ ३२
प्रथम तरि क्षिराब्धी दीधला ज्यासि, पाहें.
सजन मित्रपणें हें दुजें नाम आहे. ।
यदुपतिवनितेचा तात ग्रामाभिधानीं.
प्रवर तिन तयाचे साजिरे दिव्य खाणी. ॥ ३३

कथा वाचितां, ऐकतां दोष जाती. । अवें नाशुनी, सर्व जाती दिगंतीं. ।
असे न्यून तें पूर्ण संतीं करावें. । पदप्रासअर्थी बरें वीवरावें. ॥ २३४

---

## २३. पुंडलीकचरित्र.

### ( वीरेश्वरकृत. )

पायकी करि सुखें पितरांची, । चाड जो न धरुनी इतरांची, ।
देउनी हरि अभीष्ट वरातें । तोषवी सतत त्या नृवरातें. ॥ १

पूर्वीं ब्राह्मण पुंडलीक म्हणुनी नामांथिला जो भला,
होता पावनभूमि पंढरपुरीं, विद्वद्गणीं शोभला. ।
पूजी दैवतबुद्धिनें स्वपितरां सानंद कायत्रयीं,
मानी तद्वचन प्रमाण अवघ्या कार्यीं, जशी कीं त्रयी. ॥ २

कोणी एक दिसीं विधातृसुत तो योगीश, भक्ताग्रणी,
गेला त्या यमुनातटा, हरि असे जेथें उभा गोगणीं. ।
त्यातें कृष्ण पुसे हळूच विनयें, "आलासि कां, पावना?"
तो बोले मग, "दर्शनार्थ तुझिया आलों, जगज्जीवना. ॥ ३

पथीं देखिला पुंडलीक, द्विजाती, । जया पाहतां पातकें सर्व जाती. ।
करी मायबापांचिया पूजनातें; । न लेखीच देवा तथा याजनातें. ॥ ४
तयाची कशी भक्ति ते, देवराया? । तुवां शीघ्र यावें परीक्षा कराया." ।
म्हणे कृष्ण हांसोनि "आतां चला, हो. । घडे आजि आम्हांसि सत्संगलाहो. ॥ ५
गोगोपवृंदसमवेत तया मुनीतें । आला पुढें करुनि भीमरथी धुनीतें. ।
तीच्या तटीं तरुतळीं हरि, चित्तिलासीं, ।थोपी स्ववत्सकळपांसि, तया मुलांसी. ॥ ६
तो सतोष मुरली मग वाजवी, । मंजुळ ध्वनिभरें नभ गाजवी. ।
लोक तेथिल समस्तहि तेधवां । येउनी द्रुत विलोकिति माधवा. ॥ ७
नमस्कारुनी सर्व ठेले पुढारी. । नसे पंढरीमाजि कोण्ही विढारी. ।
न देखोनि त्या पुंडलीकद्विजातें, । वदे तें ऋषी श्रीखगेशध्वजातें. ॥ ८
"पित्याहूनि तो श्रेष्ठ कोणा न मानी । पिता तूं जगाचा स्वभक्ताभिमानी. ।
गृहा जाउनी युक्तिनें, वासुदेवा, । विलोकीं, परीक्षीं तया भूमिदेवा." ॥ ९

मोदें नारदवाक्य ऐकुनि, तदा श्रीकृष्ण गोपांप्रति,
"गाई चारित सावधान अवघे येथें असा संप्रति; ।"
ऐसें बोधुनि चालिला ऋपिसवें, तो पावला त्या क्षणीं
विप्राच्या सदनासि, नित्य रत जो सद्भक्तसंरक्षणीं. ॥ १०

उभा ठाकला अगणीं दीनबधू. । पुढें जाउनी तो ऋपी ज्ञानसिंघू ।
कथी पुंडलीकासि वृत्तांत सारा. । "विलोकीं" म्हणे आदरें, "वेदसारा. ॥ ११
परब्रह्म जें बोलिजे पैं श्रुतींनें । निराकार, तें या मनुष्याकृतीनें ।
स्वमायाविलासें असे व्यक्त, पाहीं. । तुझ्या भक्तिनें यासि जाली कृपाही." ॥ १२
"अगा, मायबापांविना देव नाहीं. । दुजा तो न मानोचि माझ्या मनाही. ।
जगीं मायबापां म्हणोनीच लोकीं । सदा प्रार्थिजे दैवतातें, विलोकीं. ॥ १३
हो 'मातृदेव, पितृदेव' म्हणौनि वेदीं । कीं बोलिलें. कवण, गा, तुजला निवेदी ?।
देवर्षि तू विबुधवर्यहि, बोधराशी; । मी बाळ काय विनवू तुज ईश्वरासी?" ॥ १४
पिता तैं वदे आदरें नंदनातें. । "हरीला समर्पी वसूं आसनातें. ।
सुतें टाकिली इष्टका येक भारी. । उभा राहिला तीवरी कैटभारी. ॥ १५
म्हणे लोक तैं, "धीटता काय याची ? । पहा ईट हे पाय घांसावयाची
वसू दीधली निर्भयें या द्विजानें. । अहो, मानिली तुष्टचित्तें अजानें." ॥
उभा वाड वेळ प्रभू त्या समाजीं. । महाबाहु ठेवी करद्वंद्व माजीं. ।
द्विजें आपुली फार केली उपेक्षा, । तन्ही तो धरी दर्शनाची अपेक्षा
सोळा प्रकारें पितृपूजनातें । सारोनि, तो आंवरुनी मनातें, ।
यानंतरें येउनि माधवातें । वदी, तसा त्या विधिसंभवातें. ॥

भावें जोडुनि हात, ठाकुनि उभा, विज्ञापना तैं करी.
" पूजा श्रीगुरुची करीत असतां आलासि तूं [illegible]
होतां पूजन सर्वही लगवगें आलों तुझ्या संनिधीं.
केला म्यां अपराध; तू तरि नतत्राता [illegible]

"कृपासागरा, ऐहिकामुष्मिकांची । नसे कामना, देहगेहादिकांची. ।
पुरे पूर्वपुण्यॆंचि नेत्रांबुजाला । तुझ्या दर्शनाचा महालाभ जाला." ॥ २२

म्हणे नारद "ब्राह्मणा, माग कांहीं. । मला तोष वाटे, जगन्नायकाही. ।
जयाच्या प्रसादासि हे देव सारे । सदा वांछिती, तूं न वेसी कसा, रे ?" ॥ २३

मनीं जाणुनी नीट देवाशयातें । वदे आदरें, जोडुनी तो शयातें. ।
"मुकुंदा, करीं आपुली मात साची. । उभा तूं जसा येथ, राहीं तसाची. ॥ २४

तुझ्या दर्शनें पंडितां, पामरांसी । घडो मुक्ति देहावसानीं नरांसी. ।
वरी नामसंकीर्तनीं बुद्धि राहो. । स्वरूपानुसंधानयोगी स्थिरा हो." ॥ २५

"जैसें तू वदलासि, तेंवि अवघें होईल येथें पुरी.
जा आतां जनकासमीप. फळली त्वभक्तिवल्ली पुरी." ।
ऐसी ऐकुनि माधवोक्ति मग तो संतुष्ट आला गृहा.
जाला पात्र अपार पूर्वसुकृतें त्या ईश्वरानुग्रहा. ॥ २६

मूढांसही देउनि आत्मबोधा । तारी हरी, नासुनि जन्मबंधा. ।
याकारणें विठ्ठल नाम त्याचें । जालें, पहा, हो, त्रिजगत्पित्याचें. ॥ २७

भक्तत्राणालागिं त्या विठ्ठलानें । केला क्षेत्रीं वास सद्वत्सलानें. ।
तो पैं कर्ता जंगमस्थावरांचा, । त्राता, स्वामी, तोचि वीरेश्वराचा. ॥ २८

---

## २४. पारावतचरित्र.

### ( वीरेश्वरकृत. )

श्रीकृष्णस्वपदातें ध्याती जे जन, तदीय विपदातें ।
हरुनी शीघ्र, तयांतें पाळी, देउनि कृपेचि अभयातें. ॥ १

पशुपतगादिक जाती श्रीहरिचरणासि शरण जरि जाती; ।
त्यांचें संकट हरितो दीनदयाळु, प्रभू असा हरि तो. ॥ २

पूर्वी वनद्रुमातें आश्रयुनी, ध्यात भक्तिसुगमातें, ।
होता कपोत बरवा; त्याची जाया तशीच मजुरवा. ॥ ३

तेथें मांसाहारी आला, हो, भिल्ल, काननविहारी. ।
रंखावरि दीनातें पाहे तंव तो कपोतमिथुनातें. ॥ ४

सोडी श्येनखगातें त्यावरि, चापींहि योजुनि खगातें, ।
ठाके लक्षहि धरुनी, दीनपतगामिषीं स्पृहा धरुनी. ॥ ५
म्याला अंत:करणीं व्याधाची खग कळोनियां करणी. ।
बोले देवा स्मरुनी, " तारीं आम्हां, हरी, कृपा करुनी. ॥ ६
भूवरि भिल्ल, नभीं तो श्येन असे, त्यासि पाहुनी भीतो ।
आमुचा जीव. मुरारी, आता पाळीं कृपे, भृतदरारी. ॥ ७
नश्वर देह, विकारी, मोक्षोपायीं तथापि उपकारी, ।
जावो भगवत्स्मरणें, काळीं न पडो परतु दुर्मरणें. ॥ ८
पाळन निजदासाचें करणें जें, तें तुझें विरुद साचें. ।
त्याची विस्मृति पडली, यास्तव आम्हांसि गति असी घडली. ॥ ९
भवभयसागरपोता, तारीं, कृष्णा, कृपे द्रुत कपोता. ।
आता प्राण न तगती क्षणभरि. तुजवीण कोण आन गती!॥ १०
दुर्जनवारणहरिनें दीनखगोक्ती कृपाकरें हरिनें
परिसुनि, संकट सारें हरिलें येक्या क्षणीं, निगमसारें. ॥ ११
योढीं चापगुणातें भिल्ल बळें जें, तदीय चरणातें ।
डसला भुजग सहसा; पडला तो भूवरी अनोकहसा. ॥ १२
शबरकराधितपत्री सुटला, तेणेंचि गगनगत पत्री, ।
श्येनाभिध तो वधिला तें वानिति ते कपोत सुखनिधिला.॥ १३
आश्रयुनी नीडा या राहू अथवा नभातरिं उडाया ।
होतों भीत, मुकुंदा; तें भय हरिलें तुवाचि सुखकंदा. ॥ १४
एव श्रीहरिनुतितें पारावत ते करोनि, शुभमतितें ।
लावुनि भगवद्भजनीं, फिरते जाले जनीं तथा विजनीं. ॥ १५
ऐसा क्षिप्र करातें देउनि भक्ताचिया प्रकारातें, ।
भववारिनिधीं तारी वीरेश्वरविभु, अनेकअवतारी. ॥ १६

---

## २५. सोमवारचरित्र.

### ( वीरेश्वरकृत. )

श्रीपार्वतीजानिपदांबुजाता । वंदोनि भावें, श्रितपारिजाता, ।
याहीन मी वाक्सुममालिकेतें, । सतोषिजे जेणि दयानिकेतें. ॥ १

व्यासादिकीं सरसवाक्यसुवर्णमाला । ज्या अर्पिल्या कविवरीं विबुधोत्तमाला, ।
मी द्रोण नीरस सुमांप्रति अर्पितों, कीं । तो देव सर्वसम, जेंवि पिता स्वतोकीं. ॥२

भोळा शंकर तो भवाब्धि आपुल्या भक्तांसि रक्षी, पहा.
साना थोर, विमूढ, सुज्ञ न म्हणे, संसारसतापहा. ।
भक्तांचें यश वाढवी त्रिभुवनीं दावोनि लीला जनां,
भावें मी स्मरतों निरंतर तया देवा मनोरंजना. ॥ ३

पूर्वी ब्राह्मणपुत्र दुष्ट, कपटें होवोनिया दंपती
आले, हो, नळराजपौत्रगृहिणीसभासि ते दुर्मती. ।
त्यांचें स्त्रीपुरुषत्व तथ्यचि करी पूजोनि सीमंतिनी;
ऐका ते बरवी कथा निजमनीं श्रीशंकरा चिंतुनी. ॥ ४

पूर्वी येक पुरीं, विदर्भविषयीं, दोघे द्विजाती भले
होते; पंडित, शांत, दांतहि, सदाचारें बरें शोभले. ।
नामें विश्रुत वेदमित्र, दुसरा सारस्वत क्ष्मातळीं,
ज्याची मानसवृत्ति निर्मळ सदा तत्वोदकें धूतली. ॥ ५

वेदमित्रसुत जाण सुमेधा. । ईश्वरें दिधलि त्यासि सुमेधा. ।
तो पढोनिहि चतुर्दश विद्या । पावला बहु यशा अनवद्या. ॥ ६

सारस्वतात्मज पढोनि समस्त विद्या, । तो सामवंतहि भजे मग वेदवेद्या. ।
दोघे द्विजार्भक परस्पर मित्रभावें । येके स्थळीं वसति, बोलति सुस्वभावें.॥७

त्यातें देखुनियां गुरू म्हणति तें, "बाळो, द्वितीयाश्रमा,
जाणा, हा तुम्हि योग्य काळ; म दनीं राहोनि कां, गा, श्रमां ? ।
आतां जाउनिया, नृपा रिझवुनी, म गू नि आणा धनें.
आम्ही दुर्विध, वृद्ध, यास्तव असीं सांगीतलीं साधनें. ॥ ८

पितृमुखोद्गतें मञ्जुभाषणें । करुनियां सुखें कर्णभूषणें,
नमुनि, चालिले भूपपत्तना, । हृदयिं चिंतुनी त्या चिरंतना. ॥ ९

क्रमुनि मार्ग ते राजमंदिरा । झटिति पावले, जेथ इंदिरा ।
सकळसिद्धिदा नांदते भली, । शिरकुने बरी पूर्ण शोभली. ॥ १०

प्रतीहारिवाक्यें सभेमाजि जातां, । नमी भूप भावें तदंघ्रयंबुजातां. ।
सदा बैसवी आसनीं त्यां द्विजांला. । म्हणे, "आजि आम्हां महातोष जाला." ११

आशीर्वाद वदोनि, सर्व ऑपुला वृत्तांत पैं सांगती.
लग्नार्थ द्विज ते नृपासि विनय वस्त्रें, धनें मागती. ।
होणारापरि बुद्धि दैवगतिनें जाली कसी ते पहा.
मोहें छद्म मनीं धरोनिच करी तो भूप सल्लाप हा. ॥ १२

बोले नृपाळ, "महिषी निषधेश्वराची, । भावें मनीं स्मरुनि मूर्ति महेश्वराची, ।
सीमंतिनी करुनि दंपतिपूजनातें । देते अमूल्य पटभूषणगोधनातें. ॥ १३
तुम्हीं दपती होउनी त्याच देशा । सुखे गेलिया, मानुनी मन्निदेशा, ।
महालाभ होईल, संदेह नाहीं;। तदा तोष वाटेल माझ्या मनाही. " ॥ १४

विदर्भाधीशातें द्विज म्हणाति ते मानुनि भया,
" अशा या दुष्कर्में दुरितचि घडे, जाण, उभयां. ।
न चाले भक्तांसीं कपटत्व, जें हेतु नरका.
अयोग्या कार्यार्थी धरिल धिवसा सुज्ञ नर कां ?" ॥ १५

रोषें वदे पुनरपि क्षितिप द्विजांतें.
" मद्वाक्य नाइकिलिया दमितों प्रजांतें. ।
मातें न लेखुनिहि जाल कृतोपकारा,
दावीन मी द्रुत तुम्हांप्रति आजि कारा. " ॥ १६

म्याले ब्राह्मण, अंगिकारुनि, तदा ते जाहले दंपती.
तो सारस्वतपुत्र होय महिला, तीचा सुमेधा पती. ।
आज्ञा घेउनि चालिले त्वगवगें चंद्रांगदाच्या पुरा.
मार्गी चिंतिति कीं मनोरथ कसा होईल तेथें पुरा. ॥ १७

ते भीत भीत हृदयीं तरण द्विजाती-
मार्ग क्रमोनि निषधेंद्रपुरासि जाती. ।
द्वारस्थ येकहि तदा न तया निवारीः
आज्ञा तसी नृपतिची प्रतिसोमवारीं. ॥ १८

भार्येसवें राजगृहीं सुमेधा । भूदेवसंघीं बसुनी स्वमेधा ।
विद्या प्रसंगें कळवी समस्तां. । ते मानुनी हालविती स्वमस्तां. ॥ १९
सीमंतिनी सुनियमें मग दंपतीतें । पूजी, मनीं स्मरुनियां गिरिजापतीतें. ।
दे अर्घ्य, पाद्य, शुभचंदन, पुष्पमाळा. । वाटे अपार सुख भूमिसुरोत्तमाळा. ॥ २०

दावोनि धूप मग दीपहिं, भोजनातें । प्रत्येक ते करवुनी रिझवी मनातें. ।
तांबूल, वस्त्र, मणिभूषणनिष्कराशी । अर्पी, नमी सुमति, जोडुनियां करांसी. २१
त्यानंतरें कृत्रिम दंपतीतें । पाहोनि, हांसे; समजे मनीं ते. ।
आवाहुनी हैमवतीशिवातें । पूजी, नमी तत्पदपल्लवातें. ॥ २२

देवोनि भूषणदुकूलधनांसि, देवी
" जालें समर्पित " म्हणे मग " वामदेवीं. " ।
दे प्रार्थुनी द्विजवरांसि निरोप जाया..
मानी कृतार्थ ऑपणा वसुधेशजाया. ॥ २३

सुमेधा स्वमित्रासवें चालिला, हो.
म्हणे, "जाहला दैवयोगेंचि लाहो. ।
असत्कर्म केलें, अगा सामवंता;
महादुःख वाटे मना, बुद्धिवंता." ॥ २४

ऐसा व्याकुळ वेदमित्रसुत तो चाले पुढें काननीं,
तेव्हां सामवती, मराळगमना, घामेजली आननीं. ।
ती, पूर्वस्मृति सर्वही विसरुनी, मानी स्वयें कामिनी,
तो भर्ता आंपुला यथार्थचि; असा उद्बोध तीच्या मनीं. ॥ २५

म्हणे, "वल्लभा, सोडुनी घोर रानीं । पुढें धांवसी. मी तुझी मुख्य राणी. ।
पहा, येतसें एकली, प्राणनाथा. । मनीं जाण तूं त्वद्विना मी अनाथा. ॥२६
लता पुष्पिता भेटुनीयां द्रुमातें । दिसे हांसते कीं विलोकूनि मातें. ।
घनच्छायकुंजीं त्वरें ये रमाया. । नसे अंतरीं, सांग, का तूज माया ? ॥ २७
मंद प्रभंजन कसा यमदेशवासी । योषिद्प्रभंजनचि मंद मनोभवासी ।
होवोनियां दृढ सहाय, मदीय देहा । पोळीतसे. तुजविना सुख कोण दे हा ? ॥२८

काळा पिकद्विज विलोहितनेत्र; पापी,
वाल्यीं अरिष्टपरिपालित घोररूपी, ।
उन्मत्त, पावुनि मधु स्वर पंचमाचा;
बोलोनि मान हरितो प्रमदोत्तमांचा." ॥ २९

तें दीन वाक्य परिसोनि म्हणे स्वमित्रा.
" कां, गा, वृथा भ्रमसि, मद्हृदयाब्जमित्रा ? ।

तूं कीं युवा, पुरुष, पंडित, सामवंता;
ऐसा विनोद न करीं बहुबुद्धिमंता." ॥ ३०

" मी अंगना, सामवती; त्वदीया । भार्या; न वाणी लटिकी मदीया ।
देवोनि आलिंगनचुंबनातें । संतोषवीं शीघ्र कृपें मनातें. " ॥ ३१

सुमेधा तदा स्त्रीत्व त्याचें परीक्षी. । उरोजांवरा आंसुडोनी निरीक्षी. ।
पृथु, स्निग्ध वक्षोजकुंभद्वयातें । विलोकूनि, पावे मनीं तो भयातें. ॥ ३२

" हा हा ! कैसें पुंस्त्व गेलें ययाचें? । आलें स्त्रीत्व, स्थान जेंही भयाचें? ।
केलीं कृत्यें केंवि लोकां कथावीं ? । दुःखांभोधीं कीं बुडालों अथावीं. ॥ ३३

शिवीं भक्ति सीमंतिनीची कळोनी, । महापाप केलें नृपासीं मिळोनी. ।
तयाचें फळ प्राप्त आतांचि जालें. । विधीनें कसें घातलें मोहजालें. ॥ ३४

ऐसें ईश्वरकृत्य. येथ न सुचे कांहीं मना संप्रती.
गेहा जाउनियां कथूं सकळही वृत्तांत तातांप्रती. ।
ते ज्ञाते करितील यत्न" म्हणुनी निर्धार ऐसा करी.
सांगे सामवतीस " काम पुरवूं, ग्रामासि ये लौकरी. " ॥ ३५

ऐसें सामवतीस बोधुनि, पुरा आला सुमेधा भला,
जो निष्काम, शमादिसद्गुणगणें विद्वज्जनीं शोभला. ।
भावें वंदुनियां गुरूप्रति, तया तन्मित्रसारस्वता,
बोले, "दैववलें ऑम्हांसि फळली ते तूमची निस्वता."॥ ३६

सांगे तदा त्यां सकळा उदंता. । ऐकोनि सारस्वत तो स्वदंतां ।
चावोनि, बोले, " मज दुर्मतीनें । केला कसा घात महीपतीनें ? ॥ ३७

" आतां जाउनि त्यासि शिक्षिन," असें बोलोनियां, बांधवा
संगें घेउनि, पावला नृपसभे तो सत्वरें तेधवां. ।
कोपें कांपत भूपतीप्रति म्हणे, " मत्पुत्र हा नाशिला.
*यातें स्त्री करुनी शिरावरि वृथा कां घेतली, रे, शिळा ?* ॥ ३८

तुझा दोष, दुष्टा, किती, रे, वदावा ?
असा काय होता तुझा सांग दावा ? ।
तुतें शापुनी जाळितों आजि पाहा.
खरा बोल माझा, नृपा, जाण पां हा. " ॥ ३९

परुषवचन ऐसें ऐकुनी भूपतीनें,
नमुनि, विनविलें तैं भीतिसर्वाकृतीनें. ।
" अविहित घडलें हें कर्म माझ्या अदृष्टें.
द्रुत करिं अनुकंपा, पूर्ण होती त्वदिष्टें. ॥ ४०

वसुनि या पुरीं सर्वमंगळा । सतत देतसे सर्व मंगळा.
नतजनांप्रती रक्षिते, पहा, । शिवकुटुंबिनी हे भयापहा. ॥ ४१
भजसर्वे चला अंबिकाळया. । व्यसन तुमचें जातसे लया. " ॥
वदुनि यापरी त्या द्विजांसवें । त्वरित जाइंजे भूमिवासवें. ॥ ४२

येवोनि तो नृप करी गिरिजार्चनातें, ।
ठेवोनि तच्चरणवारिरुहीं मनातें. ।
प्रार्थोनियां मग म्हणे, " द्विजनंदनाळा
देवोनि पूंस्त्व, जननी, रिझवीं मनाला. ॥ ४३

केले म्यां अपराध मूढमतिनें; आतां करावी क्षमा.
त्वत्प्राप्तीकरुनी पहा म्हणविते सर्वंसहा हे क्षमा. ।
तूं सच्चित्सुखरूपिणी, श्रुतिनुता, देवी, जगत्साक्षिणी.
मी दीनाहुनि दीन जाणुनि, कृपे दे चित्त मद्रक्षणीं. " ॥ ४४
या रीती करित स्तुति त्रिदिन तो राहे महाभक्तिनें;
तेन्हां तोषुनियां रहस्य कथिलें रायासि चिच्छक्तिनें. ।
" मद्भक्तें कृत कार्य, तें अनृत पैं नोहेचि, गा भूपती.
हे नांदोत महीसुरात्मज सुखें होवोनि जायापती. ॥ ४५
सारस्वतासि सुत होइल पुण्यराशी. । यातां तुम्ही सकळ जा निजमंदिरासी. "।
ऐसें वदोनि गिरिजा मग गुप्त जाली. । तोषे अपार तंव भूप; तथा द्विजाळी.॥४६

अपार धन देउनी द्विजवरा पुरा पाठवी.
धरापति घरासि येउनि हरा मनीं आठवी. ।
म्हणे, " शिव निजाश्रिता भवभयांबुधीं तारितो.
तदीय शुभकीर्तितें त्रिभुवनांत विस्तारितो." ॥ ४७
सुमेधासि देवोनियां कन्यकेला । विवाह द्विजेंद्रें यथाशास्त्र केला. ।
शिवानुग्रहें त्यासि सत्पुत्र जाला. । मनीं तो स्मरे शंभुपादांबुजाला. ॥ ४८

ऐसें पवित्र शिवभक्तचरित्र भावें । जे कीर्तिती जन, तयांसि निजप्रभावें ।
संरक्षितो गिरिश पूर्णकृपे, विलोकीं; । वीरेश्वरप्रभु असा प्रथित त्रिलोकीं. ॥ ४९

---

## २६. सीताकल्याण.

( वीरेश्वरकृत. )

जें ब्रम्हवस्तु कथिलें निगमागमांनीं, । जें ध्याइलें स्वह्रदयीं मुनिसत्तमांनीं, ।
तें दैवत प्रगटलें रघुभूपगोत्रीं, । रामाख्य सुदर, जसा रवि पूर्वगोत्रीं. ॥ १

तो श्रीराम सबंधु गाधितनयें प्रार्थोनियां आणिला.
आनदें मिथिलापुरासि जनकें देखोनि वाखाणिला. ।
तेथें शंकरचाप बोढुनि करें जाला यशस्वी वरा.
घाली माळ गळां तया जनकजा, लाजोनि पीतांबरा. ॥ २

कौशिकासि तंव त्या जनकानें । बोलिलें, परिसतां जन कानें. ।
" आजि राघवविवाह कराया, । सांग यत्न मजला, मुनिराया." ॥ ३

" रामासि देतों सुगुणा स्वपुत्रिका. " । ऐसी लिहोनी शुभलग्नपत्रिका, ।
साकेतभूपाप्रति शीघ्र पाठवीं; । मैत्री मनीं पूर्विल नीट आठवीं. " ॥ ४

मुनिवचन नयज्ञें ऐकुनी भूपतीनें, । हित समजुनि केलें तेंवि त्या सन्मतीनें. ।
दशरथनगरातें चार ते शीघ्र जाती, । वसति निपुण जेथें तुष्ट सारे द्विजाती. ॥ ५

तें दौवारिक भूपतीस कथुनी चारांसि त्या मागुती
नेती सन्मुख. ते तयासि नमुनी वृतांत पैं सागती. ।
देती पत्र सकुंकुमांकित. सुखें वाचूनि राजा भला
बोले, " आजि अपार पूर्व सुकृतें सत्संग कीं लाभला." ॥ ६

चारांसि तोषवुनि, पाठवुनी पुढारीं,
आला जना पुसुनियां आपुल्या बिढारीं. ।
तेव्हां ससैन्य, सकुटुंब, महोत्सवानें,
राजा निघे अतिशयें निजवैभवानें. ॥ ७

मार्गे क्रमोनि मिथिलेसि समीपदेशीं,
योग्य स्थळीं उतरला निजसंपदेशीं. ।

गाधेय जाणुनि उदंत सतोष जाला.
आला पुढें करुनि शीघ्र तदात्मजाला. ॥ ८

गौतमसुत जनकातें बोले सानंद, " रामजनकातें ।
भेटाया जा नवसा द्या, हो, रामासि आजि जानवसा. " ९

वचन शतानंदाचें मानुनियां तें निधान आनदाचें, ।
त्या स्कंधावारातें आला घेवोनि सर्व परिवारातें. ॥ १०

हृदयीं पटवासाचें लावुनिया चूर्ण बहुत घासाचें, ।
भेटुनि, वैसति राजे, ब्राह्मणही सकळ. तैं सभा राजे. ॥ ११

गाधेय बोले मिथिलाधिपातें. । " सीतेसि रामाप्रति पक्षपातें ।
देसी जसा, तेंविच लक्ष्मणाला । दे ऊर्मिळेतें, शुभलक्षणाला. ॥ १२

दोघी बंधुसुता; तयांत भरता द्यावी तुवा मांडवी.
शत्रुघ्ना, श्रुतकीर्ति ते गुणवती, येक्याच त्या मांडवीं. ।
लग्नें चारि करोनि घे यश जगीं. हे, जाण, पात्रें भलीं.
वंशें आणि गुणीं तुम्हासि समता. भाग्यें असीं लाभलीं. " ॥ १३

तेव्हां तो मिथिलेश वदुनि, वदे. " हो तेंवि. आतां वरां
पूजाया मज दे निरोप, हृदयीं चिंतोनि लक्ष्मीवरा. " ।
ऐशी ऐकुनि ते सदुक्ति, अवघे तेथें तया वानिती.
आतां धीर, अभिज्ञ, यासम दुजा नाहीं असें मानिती. ॥ १४

शतानंदाज्ञेनें तव नृप गणेशार्चन करी.
वसिष्ठाला पूजी. मग सुवसनें दे झडकरी ।
वरांला त्या चौघां; बहुविध अलंकार करुनी,
मुद्या घाली बोटीं, रिझुनि हृदयीं हात धरुनी. ॥ १५

हातीं देउनि नारिकेल, चवघा अश्वांवरी बैसवी.
वाद्यें गानरवें सुवारवनितानाट्येंहि उल्लासवी. ।
व्याह्यांसीं समवेत तो हळुहळू चालोनि आला पुरा.
त्यातें हाटकमंदिरीं उतरवी. सतोष मानी पुरा. ॥ १६

आला गृहासि जनकप्रभु त्याच काळीं.
रात्रि क्रमोनि, उठुनी मग तो सकाळीं, ।

क्षाळी पदकमळातें. ओती भार्या विशुद्ध कमळातें. ।
मधुपर्काहि विधीतें आणुनिया दे तया मग सुधी तें. ॥ २६
लक्ष्मीपतितें स्मरुनी ठेले अतःपटा करीं धरुनी. ।
मंगळ अष्टक गाती. म्हणती भूसुर हरीच सांगाती. ॥ २७
तो हेरंब, समस्त विघ्न हरुनी, रक्षो तुतें सर्वदा.
गीर्देवी तुज वेदशास्त्रविषयीं हो अर्थदा, शर्मदा. ।
श्रीमद्देशिकवाक्यद्धृत असो. जावोत मायामळें.
ब्रह्मेशादिसुरौघ नित्य तुजला, रामा, करो मंगळें. ॥ २८
गौरीशंकर जेंवि नांदति, रमाविष्णुप्रभू ज्यापरी,
यावच्चंद्रदिनेश तेंवि आपुल्या भार्येसवें भूवरी, ।
रामा नांद सुखें. निशाचरगणा शिक्षीं सदा दोर्बळें.
पाळीं दीन जनां कृपे. प्रतिदिनीं होती तुला मंगळें. ॥ २९
मुहूर्तविद झालर त्वरित वाजवी त्याक्षणीं.
द्विजीं पटहि काढिला रघुवराचिया वीक्षणीं. ।
सुखावलि महीसुता, पतिस अक्षता वाहुनी,
तसाचि मग रामही बहु रिझे तितें पाहुनी. ॥ ३०
कन्यादान दिलें अभिज्ञ जनकें निष्युक्त त्या राघवा.
झाला मानवसंघ तुष्ट बरवा. त्या उत्सवें आघवा. ।
रामें मंगलसूत्र भूमितनयाकंठीं करें बांधिलें.
स्वर्गी बोलति देव कार्य आमुचें या ईश्वरें साधिलें. ॥ ३१
दोघां कंकण बांधुनी द्विजवरीं, त्या बोहलीं बैसुनी,
लाजाचा मग होमही करविला अत्यंत उल्हासुनी. ।
ऐसे चारि विवाह एकसमयीं श्रीमंदिरीं जाहले.
तेथें उत्सव पाहुनी जन तदा मोदाबुधीं पोहले. ॥ ३२
पाहू सूनमुखें तिघीहि विहिणी प्रार्थोनिया आणिल्या.
पाटाऊ हिरवे, सकंचुक, बरे, देवोनि सन्मानिल्या. ।
अर्की घेउनिया सुनासि, चपकें गोक्षीर तें पाजुनी,
देती अंबरभूषणें. निरखिती श्वश्रूस त्या लाजुनी. ॥ ३३

स्थापावया त्वरित त्या कुलदैवतातें
सांगे, वळावुनि तया स्वपुरोहितातें. ॥ १७
भार्येसमेत मग न्हाउनि संप्रदायें,
पुण्याहवाचन करोनि, समर्पि दायें. ।
ऐकोनि मात वरवी स्वपुरोहिताची,
तो स्थापना करि तदा कुलदैवताची. ॥ १८
तैसाचि पंक्तिरथही कुलदैवतातें
पूजी, मनीं समजुनी आपुल्या हितातें; ।
ज्याला वसिष्ट गुरु, बोधक तंत्रमंत्रीं,
राहे सदा जवळि सुज्ञ सुमंत मंत्री. ॥ १९
करवुनी द्विजबांधवभोजना, । सरस अन्न दिलें इतरां जनां; ।
मग सुपीतपटेंचि सुवासिनी । बहुत भूषविल्या पुरवासिनी. ॥ २०
आनंदें दुसरे दिनीं जनक तो घेवोनि त्या बांधवां
जातां पंक्तिरथालया, सकळ ते येती पुढें तेधवां. ।
बुक्का लावुनियां, परस्पर उरीं आलिंगुनी, भीतरीं
वेगें जाउनि, पंक्तिनें बसुनियां, उल्हासती अंतरीं. ॥ २१
शेले आंथरुनी तळीं बसविले ते नोवरे, गोजिरे.
पागोटीं, पटके, झगेहि दिधले ते भर्जरी, साजिरे. ।
मोठे हार, तुरे, सुगंधहि विडे देवोनि लोकांसही,
तैसें आदरिलें नृपें न चुकतां दाटींत येकासही. ॥ २२
सारे बाहेरि आले. मग वर चववे पाहुनी योग्य वाहां,
हातें त्यां केसरातें धरुनि वळँघले. चालिले त्या विवाहा. ।
वाद्यांचे घोष होती बहुविध; गणिका नाचती राजवाटे;
गाती गाणीं स्वरानें; परिसुनि वरवा तोष सर्वांसि वाटे. ॥ २३
त्या द्वारदेशीं कुटिलालकांता । ओंवाळिती पाहुनि विप्रकांता. ।
ते नोवरेही उतरोनि खालें; । श्रीमंडपातें मग शीघ्र आले. ॥ २४
चौरंगीं रामातें बैसवुनीयां, मनोभिरामातें, ।
गौतमतनयोक्तीनें पूजितसे तो क्षितीश भक्तीनें. ॥ २५

क्षाळी पदकमळातें. ओती भार्या विशुद्ध कमलातें. ।
मधुपर्काहि विधीतें आणुनिया दे तया मग सुधी तें. ॥ २६
लक्ष्मीपतितें स्मरुनी ठेले अंतःपटा करीं धरुनी. ।
मंगळ अष्टक गाती. म्हणती भूसुर हरीच सागाती. ॥ २७

तो हेरंब, समस्त विघ्न हरुनी, रक्षो तुतें सर्वदा.
गीर्देवी तुज वेदशास्त्रविषयीं हो अर्थदा, शर्वदा. ।
श्रीमद्देशिकवाक्यवृद्धत असो. जावोत मायामळें.
ब्रह्मेशादिसुरौघ नित्य तुजला, रामा, करो मंगळें. ॥ २८

गौरीशंकर जेंवि नांदति, रमाविष्णुप्रभू व्यापरी,
यावच्चंद्रदिनेश तेंवि आपुल्या भार्येसवें भूवरी, ।
रामा नांद सुखें. निशाचरगणां शिक्षीं सदा दोर्बळें.
पाळीं दीन जनां कृपे. प्रतिदिनीं होती तुला मंगळें. ॥ २९

मुहूर्तविद झालर त्वरित वाजवी त्याक्षणीं.
द्विजीं पटहि काढिला रघुवराचिया वीक्षणीं. ।
सुखावलि महीसुता, पतिस अक्षता वाहुनी;
तसाचि मग रामही बहु रिझे तितें पाहुनी. ॥ ३०

कन्यादान दिलें अभिज्ञ जनकें विध्युक्त त्या राघवा.
झाला मानवसंघ तुष्ट बरवा. त्या उत्सवें आघवा. ।
रामें मंगलसूत्र भूमितनयाकंठीं करें बांधिलें.
स्वर्गी बोलति देव कार्य आमुचें या ईश्वरें साधिलें. ॥ ३१

दोघां कंकण बांधुनी द्विजवरीं, त्यां बोहलीं बैसुनी,
लाजांचा मग होमही करविला अत्यंत उल्हासुनी. ।
ऐसे चारि विवाह एकसमयीं श्रीमंदिरीं जाहले.
तेथें उत्सव पाहुनी जन तदा मोदाब्धीं पोहले. ॥ ३२

पाहूं सूनमुखें तिघीहि विहिणी प्रार्थोनियां आणिल्या.
पाटाऊं हिरवे, सकंचुक, बरे, देवोनि सन्मानिल्या. ।
अंकीं घेउनियां सुनांसि, चपकें गोक्षीर तें पाजुनी,
देती अंबरभूषणें. निरखिती श्वश्रूस त्या लाजुनी. ॥ ३३

आंबा शिंपवुनी, वधू मिळुनि त्या पूजोनि गौरीहरा,
आनंदें करवूं हळेदउटणें तेथें तयां वोहरां, ।
सान्या बैसुनि बोलती, "नृपसुते, घेईं हरिद्रा करीं.
लावीं भर्तृपदासि. नाम वरवें घे आदरें लौकरी." ॥ ३४

देईं म्हणे त्यास पदांबुजातें, । भावें नमस्कारिति लोक ज्यातें. ।
राहे उगा तो मग रामराया. । 'दे दे' वदे ते 'मज उद्धराया.' ३५
लावोनियां चंदन, पुष्पमाला । घाली गळां त्या पुरुषोत्तमाला. ।
श्रीरामही घेउनि नाम तीचें, । तोषें करीं तैं उटणे सतीचें. ॥ ३६
कांचोळीची गांठि ते राघवानें । डाव्या हातें फेडिली लाघवानें. ।
सीता पाहे त्या जगन्नायकाला. । वाटे मोठें चित्र त्या वायकांला ! ॥ ३७

त्यानंतरें जनक तो अजनंदनाला
देवोनि अक्षत, तथा सकळां जनांला, ।
"यावें तुम्हीं द्रुत समस्तहि भोजनातें."
ऐसें वदोनि मग ये स्वनिकेतनातें. ॥ ३८

मांडोनि स्वर्णपात्रें, बहुविध वटकें, शाकसूपान्नभक्ष्यें,
वाढी सूदोघ खीरी, घृत; तंव जनकें सर्वकार्यार्थदक्षें ।
त्याही जामातृलोकां बसवुनि विनयें, ब्राह्मणां येक रीती,
"घ्यावें आपोशनातें" म्हणुनि विनवितां, तेहि तैसें करीती. ३९

जनकाची ते भार्या सादर विहिणींस बैसवि सभार्या-
त्याही भोजन करिती. श्रीरामातें सदा मनीं स्मरती. ॥ ४०
उठिले भोजन करुनी, बैसविले ते सभेसि आदरुनी. ।
तांबूलगंधसुमनें दिधलीं रायें, हिमांबुही, सुमनें. ॥ ४१
या रीती दिन चारी आदरिले ते अनेक उपचारीं. ।
साडेही करवीले, रात्रीं नवरे सतोष मिरवीले. ॥ ४२
जो थोर लोकपाळीं, बांधी बासिंग त्यासिच कपाळीं; ।
हार गळां, दों हातीं गजरे घाली; तयां जन पहाती. ॥ ४३
सुंदर नवरा, नवरी शोभति ते थोर, मत्त हस्तिवरी. ।
सुटती बाण फुलांचे, प्रकाश सर्वत्र बहु हिलाळांचे. ॥ ४४

सुमुहूर्तीचि निशांतीं  सारे तेव्हां प्रवेशुनि निशांतीं, ।
श्रीदेवीचें पूजन  करितां, सानंद जाहलें स्वजन. ॥ ४५
येंडे ते नाचविले,  देवुनि वस्त्रें स्वबंधु भूपविले. ।
पूजन कुळदेवाचें  केलें, तैसेंचि भूमिदेवांचें. ॥ ४६
श्रीसीतारामाचें  केलें कल्याण, सौख्यधामाचें. ।
वीरेश्वर सल्लोकां  वंदुनि, बोले, "कृपेचि अवलोका." ॥ ४७

---

## २७. रुक्मिणीस्वयंवर.

( वीरेश्वरकृत. )

श्रीकृष्ण तो पुरुष, सर्वसाक्षी,
तच्छक्ति भीमतनया, नवसारसाक्षी; ।
ते दंपती प्रथित कारण या प्रपंचा.
वंदूं तयां सतत जाणुनि निष्प्रपंचां. ॥ १

प्रकृतिपुरुष भैमीकृष्ण ते पैं अनादि.
करिति स्तुति तयांची देव पद्मासनादि. ।
सकळ जगहि, देखा, त्यांविना आन नाहीं.
निगमगुरुमुखें हें जाणिजे सज्जनांहीं. ॥ २

परमेश्वर, ही माया  मानवरूपेंचि भूवरि रमाया ।
येकपणें जे होते  जाले भैमीजनार्दन, अहो, ते. ॥ ३

पूर्वील सोय धरूनी  भैमी हरितें वरी मनीं स्मरुनी; ।
तेचि कथा परिसावी,  सज्जनहो, फार आवडि असावी. ॥ ४

पूर्वी भीमक भूप कुंडिनपुरीं होता यशस्वी, वरा,
मोदें ध्यात हृदंबुजीं सतत जो जाणोनि पीतांबरा, ।
ज्याला नंदन पांच, येक दुहिता, लक्ष्मीपरी सुंदरी.
जाया शुद्धमती, प्रमोदभरिता, साध्वी असे मंदिरीं. ॥ ५

विप्रोत्तमीं गुण अनेक जनार्दनाचे
जे वर्णिले स्वसदनीं, अरिमर्दनाचे; ।

त्यातें नृपें परिसुनी, 'निजकन्यकेला
श्रीकृष्ण कांत,' दृढ निश्चय हाचि केला. ॥ ६

रुक्मी ऐकुनि, वासुदेवसुगुणां, जाणोनि पित्राशया,
बोले दुर्मति, धीट तो न धरुनी कांहीं मनीं संशया. ।
" आभीरार्भक, चोर, जार, हरि जो सारे जगीं जाणती,
त्याला भूपतिनें सुता जरि दिली, तैं कीर्ति हे कोणती? ॥ ७

राजासीं जरि सोयरीक करिती राजे, तरी श्लाघ्यता.
येरासि करिताचि ते जनपदीं जाईल, जी, योग्यता. ।
आता जो शिशुपाल भूपति, तया मी आणितों बाहुनी;
कन्यादान करूं; मुहूर्त वरवा नेमा तुम्ही पाहुनी. ॥ ८

ऐसें बोलुनि मागधादि सकलक्ष्मापालकां, बांधवा,
पत्रें कुंकुममंडितें लिहुनिया तो पाठवी तेधवां. ।
आनंदें सकुटुंब कुंडिनपुरा ते पावले लौकरी.
त्यातें भेटुनि भीमभूपति भला हा आदरातें करी. ॥ ९

भैमी अग्रजकृत्य ऐकुनि म्हणे, "आता करूं काय मी?
कैसा तो हरि पावतो मज, जया ध्याती मनीं संयमी? ।
माझा आशय कोण जाणवुनिया आणील त्या श्रीधरा?"
ऐसें चिंतितसे. उगी चहुंकडे पाहे सुबिंबाधरा. ॥ १०

तदा पाहुनी आप्त विप्रोत्तमातें, । म्हणे त्यासि "रक्षीं कृपें आजि मातें. ।
बळागोनि आणावया वासुदेवा, । तुवां शीघ्र आताचि जावें सुदेवा." ॥ ११

लिहुनि निजउदंता, देउनी पत्र हातीं,
हळुच मग म्हणे ते. " लोक कोणी पहाती? ।
झडकरि, सखया, जा. घेउनी ये मुकुंदा.
नमिन तव पदातें, भेटवीं सौख्यकंदा. ॥ १२

" येतों साधुनि कार्य शीघ्र " म्हणुनी भैमीप्रति बोलिला.
धैर्ये तो मग कास नीट कसुनी वायूपरी चालिला. ।
वाचे बोलत कृष्णनाम नपवे कांहीं पथीं श्रांतितें.
आला द्वारवतीपुरासि हृदयीं तैं ध्यात चिन्मूर्तितें. ॥ १३

हर्म्य, प्रासाद, शाळा निरखित नगरीं चालिला तांतडीनें.
गेला श्रीकृष्णगेहा, अळस न करितां, दर्शनीं आवडीनें. ।
तेव्हां शौरी तयातें नमुनि, बसवुनी आसनीं, पूजनातें
भावें नानोपचारीं करुनि, सुखवि त्या ब्राह्मणाच्या मनातें. ॥ १४

मग पुसे हरि ' आगमनाचें । कवण काज, अभीष्ट मनाचें ?' ।
विनवि तो द्विज यादवराया, । नतमनोरथपूर्णकरा, या. ॥ १५

" सुमति जे नृपभीमकपुत्रिका । दिधली येक तिनें शुभपत्रिका. ।
समज अर्थ मनीं द्रुत वाचुनी. । तिस रुचे न दुजा तुजवाचुनी." ॥ १६

करीं घेउनी पत्र वाची मुरारी, । तदा त्यासि रोमांच आंगीं थरारी. ।
मनीं जाणुनी होय भैमी स्वजाया, । करी यत्न तो तीकडे शीघ्र जाया. ॥ १७

" माझा बंधु, कुबुद्धि, आणि नृप हे चैद्यादि सारे पुरीं
मातें रक्षिति, निंदिती तुज सदा मोहांध नानापरी. ।
दाटा देउनि जंबुकांसि, ऑपुला ने भाग जैसा हरी,
तैसा शिक्षुनियां नृपांसि मजला नेईं बळें तूं हरी. ॥ १८

आप्तांसीं सह अंबिकार्चन करूं बाहेरि मी येतसें.
तूंही त्यासमयींच येईं, न कळे जैसें नृपांला तसें. ।
तैं रक्षोविधिनें वरीं, लगबगें मातें रथीं बैसवीं.
येती भूपति सोडवूं तरि तयां शिक्षोनि उल्हासवीं. " ॥ १९

अशी वाचुनी पत्रिका रुक्मिणीची, । मनीं जाणुनी प्रीति योषामणीची, ।
"नृपां दाखवूं आपुल्या कौतुकातें," । म्हणे, तेधवां बाहुनी दारुकातें. ॥ २०

" अगा जावया आजि त्या कुंडिनातें । क्षणामाजि आणीं निजस्यंदनातें." ।
शिरीं वंदुनि सूत तो तन्निदेशा, । करी तेंवि तैं येउनी द्वारदेशा. ॥ २१

विप्रासवें चढला हरि तो रथातें, । भैमीचिया पुरवुं सर्व मनोरथातें. ।
आज्ञा विचारुनि सुसारथि योग्य वाहां । हांकी जवें समजुनी प्रभुच्या विवाहा. ॥ २२

ते शैब्यादि तुरंग च्यारि बरवे वायूपरी धांवती.
आयासेंविण भीमभूपनगरापाशीं त्वरें पावती. ।
तेव्हां कृष्ण म्हणे मदागमन हें भैमीस सांगावया
जाईं, भूमिसुरोत्तमा, तुजवरी संतुष्ट ते व्हावया. ॥ २३

येरीकडे नृपसुता हरिच्या वियोगें
चिंता करीत असतां, तंव दैवयोगें ।
बाहु स्फुरे, नयनही निजवामभागीं.
मानी मनीं सुखद चिन्हचि तें शुभांगी. ॥ २४

देतांचि आज्ञा गरुडध्वजानें । येवोनि सद्मासि तया द्विजानें, ।
भैमीस सारी कथिली प्रवृत्ती; । तोषे तिची ऐकुनि चित्तवृत्ती. ॥ २५

गेला रथीं बसुनि एकट चक्रपाणी,
हें ऐकुनी स्वपुतनायुत सीरपाणी ।
आला स्वबंधुनिकटीं. धणि यादवांचा
तोषे मनीं निरखुनी प्रिय जो शिवाचा. ॥ २६

तो भीम जाउनि समोर यदूत्तमातें,
विप्युक्त पूजुनि सुहृत्सुखकृत्तमातें, ।
तौर्यत्रिकासहित आणुनि पत्तनातें,
तेथें तया मिरवुनी, रिझवी जनातें. ॥ २७

तेणें सुंदर मंदिरें वसतिला पैं दावितां पट्टणीं,
बोले कृष्ण, " यया जनांसि ऑमुच्या होईल, जी, दाटणी. ।
आम्हां ठाव उमाळया परिसरीं पूर्वी असे पाहिला.
ऐसें सांगुनि, येउनी मग पुराबाहेरि तो राहिला. ॥ २८

भैमी ते दुसरे दिनीं सुनियमें नाहोनि अंबालया
आली, पाहुनि लोक सर्व म्हणती, ' हे होय पद्मालया. ' ।
चौघे बंधु समागमेंचि तिजला रक्षावया पातले.
कृष्णातें न गणूनियां निजबळें मोहांध ते मातले ! ॥ २९

भावें अंबाचर्नातें करुनि, बहुविधें देउनी वायनातें
विप्रांच्या बायकांला, मग निरखुनियां ते पुढें चिद्घनातें, ।
घाली अंभोजमाला, वळखुनि बरवें त्याच सर्वोत्तमाला.
तीतें घेवोनि आला, भ्रमवुनि मग तो सर्व भूपाधमांला. ॥ ३०

आला भैमीसमेत श्रितसुखद रथीं बैसला कैठभारी.
डका ठोकोनि, ठेले 'जय जय' म्हणुनी भृत्य ते शूर भारी. ।

तेथें रुक्मी स्वसेतें तंव न निरखुनी, फार उद्विग्न जाला.
बोले घेवोनि गेला ठकवुनि सहसा कैंचि राजाप्रजांला ? ॥ ३१
जरासंघचैद्यादि राजे प्रतापी । करूं युद्ध आले भले शत्रुतापी. ।
हलीनें, गदें ताडितां बाणजालें । अहो, सैन्य सारें तदा भग्न जालें. ॥ ३२
राजे होउनि ते पराजित, पुरा गेले महाभीतिनें.
रुक्मी नेणुनि शौर्य, धैर्य हरिचें बोले तदा भ्रांतिनें. ।
"या कृष्णासि न जिंकितां स्वनगरा मी सर्वथा जाइना.
भैमीवांचुनि एकलाचि गुरुची मी भेटिही घेइंना." ॥ ३३
ऐशी मौर्ख्यें प्रतिज्ञा करुनि, मग रथीं बैसुनी, तो निघाला.
आला घाळावयाला हरिवरि, महिमा नेणुनी, थोर घाला. ।
ताडी बाणें ललाटीं निरखुनि समरीं गोपिकाकामुकातें.
छेदी शौरी विलासें खरतर विशिखें त्याचिया कार्मुकातें. ॥ ३४
हातीं घेवोनि खड्ग, द्रुत उतरुनी, धांवतां शौरिपाशीं,
बाणीं खंडोनि खड्गा, कँचळुनि हरिनें बांधुनी त्यासि पाशीं, ।
तच्छीर्षी पंचचूडा खरतर विशिखें कल्पितां, अग्रजातें
धाकें पाहोनि, भैमी विनवि नमुनियां कांतपादांबुजातें. ॥ ३५
"येणें मनीं न समजोनि तुझ्या प्रभावा,
केले अनेक अपराध, महानुभावा. ।
आतां क्षमा करुनि, सोडुनि बंधनातें,
संतोषवीं सकल आप्तसुहृज्जनातें." ॥ ३६
"बापा, बंधन सोयऱ्यांसि करणें नोहे बरें, केशवा.
युक्तायुक्तविवेक टाकुनि, तुवां कीं दाविलें शैशवा." ।
ऐसें बोलुनि, सोडुनी नृपसुता, सन्मानुनी, तो हली
सांगे, "खेद नको करूं, गति अशी दैवें पहा जाहली." ॥ ३७
त्या भैमीसहि बोधुनी बहुपरी, आज्ञापुनी सैनिकां,
श्रीकृष्णासि पुढें करोनि, नगरा तो चालिला, हो, निका. ।
भेरी, दुंदुभि वाजती घनरवें, वाखाणिती भाट ते.
जातां मोदभरें तयांसि गमली थोडीच पैं वाट ते. ॥ ३८

वार्ता ऐकुनियां पुरस्थ मनुजीं शृंगारिली द्वारका.
ते वैकुंठसमा समस्त विबुधां भासे जनोद्धारका. ।
संलग्नीं नगरीं प्रवेशुनि सुखें आला हरी मंदिरा.
आली तेंवि समागमेंचि सुमुखी ते रुक्मिणी, इंदिरा. ॥ ३९

गृहास पावतां मुकुंद आणि भीमपुत्रिका,
सतोष शूरपुत्र तो लिहोनि लग्नपत्रिका, ।
सुकुंकुमांकिता, विदर्भभूपतीस तेधवां
ससंप्रदाय पाठवी, समस्त मित्रबांधवां. ॥ ४०

विलोकितांचि पत्र भीम भूप तुष्ट होउनी
निघे कलत्रपुत्रमित्रबांधवांसि घेउनी. ।
ससैन्य पावला क्षणांत त्याच पुण्यपत्तना.
तसेच सर्व लोकही स्मरोनि त्या चिरंतना. ॥ ४१

त्यावीर भीमक भूप, सभार्य, यथाविधि नाहुनि, विघ्नहरातें
पूजुनियां, कुलदैवत, मातृगणांप्रति, तेंविच भूमिसुरांतें, ।
भूषवि देउनि दिव्य, सकंचुक, पीतपटादिक भूसुरदारा.
भोजनही करवी; तंव तोपुनि वानिति ते मग त्याच उदारा. ॥ ४२

तैं दयितेसह तो वसुदेव सनंदन नाहुनि मंगळघोषें,
ऐकुनियां स्वपुरोहित वाक्य करी गणनायकपूजन तोषें. ।
जाणुनि शास्त्रविधान, कुलोचित धर्महि, मातृगणार्चन, नांदी ।
साधुनि, जें कुलदैवत त्याप्रति भक्तिपुरस्सर पूजुनि वंदी. ॥ ४३

भीमनृपें दुसरे दिवसींच यथाविधि पूजुनि यादवराया,
अर्पियली सहिरण्य जलें स्वसुता द्विजबंधुगणीं सुखदा या. ।
दुंदुभि वाजवुनी त्रिदिवीं सुर वर्षति त्या नगरीं सुमनातें.
नाचति वारवधू, मृदुगानरवें तंव रंजविती सुजनांतें. ॥ ४४

लग्नाचे बहु सोहळे पुरविले सर्वांसि चारी दिनीं.
साडेही करवोनियां, निरविली त्यां आपुली नंदिनी. ।
तैं मानी कृतकृत्य आपण मनीं तो भीम राजा भला,
बोले तो वसुदेवही, "स्वसुकृतें सत्संग कीं लाभला." ॥ ४५

ऐसा विवाह जगदादिम दंपतीचा
म्यां वर्णिला निजविलासधृताकृतीचा. ।
हे चिंतितां सुखविती बहुधा मनातें,
**वीरेश्वर** द्विज म्हणे 'परिसा' जनांतें. ॥ ४६

---

## २८. पंचाक्षरीमाहात्म्य.

( वीरेश्वरकृत. )

**श्री**शिवपदजलजातें आठवितां, दुरित तें सकळ जातें. ।
महिमा शिवदेवाचा न कळे हृदया. कशी वदे वाचा? ॥ १
समजे गुरूपदिष्टें शिवमंत्रें जन शिवस्वरुप दिष्टें; ।
म्हणुनि तयाला जावें शरण सुभावें, मनीं न लाजावें. ॥ २
'**पंचाक्षर**'मंत्रातें जपुनी दाशार्ह नृप, पवित्रातें, ।
पापापासुनि सुटला. त्याचा भवबंध सर्वही तुटला. ॥ ३
**सूतें ' स्कांद '**पुराणीं तेचि कथा कथिलि पावन, पुराणी. ।
रचिली मायाश्लोकीं. श्रोतीं अवधारिजे महाश्लोकीं. ॥ ४
स्वामी तो मथुरेचा, दाशार्हाभिध नृपोत्तम धुरेचा. ।
रथहयअनेकपाळी सुभटकदंबहि तसे बहू पाळी. ॥ ५
जिंकुनि भूपतिनिकरा निजसामर्थ्येंचि, फार घेउनि करा, ।
जेणें भूमिसुरांसी पूजुनि, दिधली सतोष वसुरासी. ॥ ६
त्या भूपा, विनतनया, नेउनि गेहासि, आपुली तनया ।
देउनि, काशीपतिनें केलें तैं लग्न सर्वसंमतिनें. ॥ ७
तो श्वशुरादेशातें घेउनि, भार्येसह स्वदेशातें ।
येउनि, दे धनदानें विप्रांला, जेंवि लाजिजे धनदानें. ॥ ८
मग नृपति बरा रातीं मंचीं वसतांचि, शंकराराती ।
पाहुनि दुसऱ्या प्रहरीं निजबाणें त्यासि सत्वर प्रहरी. ॥ ९
तेव्हां कळावतीतें बाहे क्रीडू महा गुणवतीतें. ।
ते विनवी, "व्रतशीला मी. न शिवावें तुम्हीं मज तशीला. ॥ १०

रोगयुता, जे दीना, प्रीतिविहीना, वधू गुणविहीना, ।
पुष्पवती त्यागावी, गर्भवती तेंवि ते न भोगावी. ॥ ११
मी व्रतयुक्त; नवोढा भार्या तुमची, तरी न मज वोढा. ।
करितें, हो, नमनातें. आता धैर्यें धरा निजमनातें. ॥ १२
जे धर्महि, कुल टाकी, भोगियली ते अखड कुलटा कीं. ।
सतत वेश्यागमनें पाप तुवा जोडिलें सरागमनें." ॥ १३
कामजतापदरातें पावुनि तो नृप, धरोनि पदरातें, ।
योडुनि भेटे तिजला. आशय तीचा तयासि न समजला. ॥ १४
अगस्पर्श सतीचा होता, सतप्त देह नृपतीचा ।
जाला, तव घाबिरला; सोडुनि तो तीस मानसीं विरला. ॥ १५
"हें देह *अधिकारी. मी भोगाया नव्हेंचि अधिकारी.*" ।
म्हणुनि हळूच भयानें तीस पुसे यादवेश विनयानें. ॥ १६
ते तव बोले नमुनी. " पुर्वी दुर्वास थोर, सुज्ञ, मुनी
माझ्या पितृभवनाला आला, जो वद्य तीनि भुवनाला. ॥ १७
तेणें करुणानिधिनें दिधला मज शैवमत्र तो विधिनें. ।
जपता पापें सरलीं. चित्तीं चिन्मूर्ति सर्वदा स्फुरली. ॥ १८
पंचाक्षरीजपानें जालें परिशुद्ध मानस तपानें. ।
महिमा थोर शिवाचा. वारी ससारखेद जीवाचा. " ॥ १९
भूप म्हणे, " उपदेशीं मत्रातें तू यया प्रथित देशीं. " ।
वदुनि ते पदकमला. बोले, " तू कात होशि देशिक मला. ॥२०
आमुच्या नगराजवळी राहे गर्गाख्य योगिराज, वळी. ।
तेथें सत्वर जावें, त्याच्या वचनें रहस्य समजावें." ॥ २१
तेव्हाचि तीव्रगतिनें भूप निघाला कलत्रसगतिनें. ।
*पाहे तो उटजातें, पाहे सर्वत्र फुल्ह कुटजातें.* ॥ २२
मग वदुनि मुनिचरणा, जोडुनि करयुग्म त्या सदाचरणा, ।
सागे आपुली वार्ता. "स्वामी, तारीं" म्हणे "भवदवार्ता. "॥२३
सन्मुख जोडुनि पाणी राहे, वाहे दृगबुजीं पाणी. ।
त्यातें तव ऋषि पाहे. बोले, "का करिसि खेद, बापा हे ? ॥२४

चंदना, आसेचनका, बाष्पें वायांचि कारिशि सेचन कां ? ।
पूर्जी नित्य शिवातें. लोकीं न पवसि कदापि (अ)शिवातें." ॥ २५
सांगुनि शिवभजनातें, संगें वेवोनि त्याच सुजनातें, ।
कालिंदीतीरासी आला ऋषि तो महा तपोराशी. ॥ २६
स्नानहि संध्या करुनी वसतां सारे, शिवा मनीं स्मरुनी, ।
ऋषि करि उपदेशातें, राया नेउनि विविक्त देशातें. ॥ २७
तो षोडशोपचारीं पूजुनि गुरुतें, सुमंत्र उच्चारी; ।
देहांतुनि त्या काळीं निघती भरडत अनेक काकाळी. ॥ २८
कांहीं गगनीं उडती, होउनियां भस्म ते तळीं पडती. ।
पाहुनि अद्भुत, गुरुतें नमुनि पुसे भूप, दाससुरतरुतें. ॥ २९
गर्ग म्हणे तैं, "दुरितें, जन्मशतीं जें तुवांचि आचरितें, ।
करटाकारें मिळुनी गेलीं तें आजि आघवीं जळुनी." ॥ ३०
गुरुवाक्पीयूषातें प्राशुनि पावे महीश तोषातें. ।
"श्रीदेशिकावतारी" मानी ऐसें "जनासि शिव तारी." ॥ ३१
शांतिवधूसंयोगी येउनि उटजासि गर्ग तो योगी, ।
नृपतिस अनुग्रहातें करुनि, सुखें पाठवी मग गृहातें. ॥ ३२
पूजा गुरुची करुनी; हृदयीं त्याचीं पदांबुजें धरुनी, ।
भार्येसहित स्वपुरा आला, जाला म्हणोनि काम पुरा. ॥ ३३
तेणें गुणाकरानें धरिली कांता करीं निजकरानें. ।
जैशी चंदनपुतळी, शीतळ तनुतें तशीच जाणितली. ॥ ३४
मग शंकरगुरुभजनीं होउनि तत्पर, वसे नृप स्वजनीं. ।
ऐसी सुकथा कथिली सूतें, हे बादरायणें ग्रथिली. ॥ ३५
जे जन शिवमंत्रातें जपती नतरक्षणस्वतंत्रातें, ।
ते शिवरूप. तयांतें वीरेश्वरकवि नमी सहृदयांतें. ॥ ३६

---

## २९. चंडेश्वरकथा.

( वीरेश्वरकृत )

श्रीशंकरचरणातें पूजिति जे, दृढ धरोनि करणातें, ।
त्याच्या दुष्कृतविपदा वारुनि, देतो तया शिव स्वपदा. ॥ १

पूर्वी सद्भृगुगोत्रीं सभूत, प्रथित माल्यनद्यीत्रीं ।
होता कणभद्र मुनी. ध्यात शिवातें मनादिका दमुनी. ॥ २

करुनी मनोजयातें सेविति भार्या, तथा सुत जयातें, ।
त्या दोघांसहित भला राहे तो ऋषि शिवार्चनीं निभला. ॥ ३

तेथेंचि दैवगतिनें येउनि, वैदर्भ, सुज्ञ भूपतिनें ।
पूजुनि त्यातें विधिनें, दिधलें गोशत मनोज्ञगुणनिधिनें. ॥ ४

बोलुनि मृदु वचनातें, देउनि ताबूलहेमवसनातें, ।
त्याच्या नमुनि पदातें, गेला भूपाळ तो जनपदातें. ॥ ५

धेनु सदा चाराया सांगे ऋषि तो सुता, सदाचारा, या. ।
सुज्ञ तदर्भक हा कीं वेगीं तें काननासि त्यातें हाकी. ॥ ६

रानीं सरिदुपकंठा आला, हृदयीं स्मरोनि शितिकंठा ।
मग तो तेथें रोधीं साऱ्या गायींसि धावुनि निरोधी. ॥ ७

पाजुनि त्यांसि पयातें, दुहुनी मृण्मयिंच भाजनीं पयातें, ।
सोडी, तव त्या चरती, कोमलयवसस्थळींच संचरती. ॥ ८

नाहुनि तटिनीभुवनीं, जो शिव विख्यात या तिहीं भुवनीं ।
मूर्ति तयाची करुनी, पूजी दृढ भक्ति मानसीं धरुनी. ॥ ९

पढताचि रुद्राध्याया, क्षीरें अभिषेक करि अबाध्या या. ।
चंदनवन्यसुमातें अर्पी जपत सुसहस्रनामातें. ॥ १०

धूप, तथा श्रुतिनेद्या दावुनि दीपहि, फलादि नैवेद्या, ।
तांबूलाद्युपचारीं पूजुनि, मग शैवमंत्र उच्चारी. ॥ ११

मोदें सकलशिवातें स्थापुनि हृदयीं तया तव शिवातें, ।
उरल्या दुग्धघटातें घेउनि तो चालिला गिरितटातें. ॥ १२

त्या धेनुवासरासी हाकुनिया शीघ्र पावनि घरासी. ।
मातृकरीं कलशातें देउनि, चित्तीं स्मरे महेशातें. ॥ १३

जाउनि नित्य वनातें, गाई चारोनि, तो त्रिनयनातें ।
पूजुनि, ये सदनातें. क्रमिता जाला अशा बहु दिनांतें. ॥ १४
येके दिवसीं माता त्यासि पुसे ते, वदोनि मृदु माता. ।
"गाई असती शंभरि; आणिसि कां दूध येक कुंभभरी ?" ॥१५
बापहि त्यासि दटावी. " तूझी करणी नसे ऑम्हां ठावी. ।
प्राशिशि, देशी इतरां ? सांग यथार्थचि नको सवूं पितरां." १६
जें पिउनि वांसरांनीं उरलें, तें पय न वेंचिलें रानीं. ।
केलें नाहीं प्राशन. काय नसे मज, वदा, वरीं अशन ? ॥ १७
संशय कांहीं न धरा. जाणति मानस उमामहेश, धरा. ।
ऐशा तद्वचनातें ऐकुनि, ते म्हणति " जाइं विपिनातें. " ॥ १८
पुनरपि तो प्रेमानें गाई चारित, तसाचि नियमानें ।
शिवलिंगातें पूजी; घालुनि तत्क्षीरसंग्रहीं पूजी. ॥ १९
स्वसुता पाहुनि विसर, ब्राह्मण तो, चरति जेथ गोविसर, ।
आला त्याच अरण्या. पाहे पुत्रा. शिवा, श्रितशरण्या, ॥ २०
अभिषेकुनि देवा या येणें पय सर्व वेंचिलें वायां. ।
केला लटिका शपथ. "प्रवळहि धरिला" म्हणे "कसा कुपथ ?" २१
कुविपयधृतानुरागें ऋषिनें मग त्या सुतावरिल रागें ।
पूजेचीं उपकरणें, जाउनियां जवळि, लोटिलीं चरणें. ॥ २२
तेणें कृतपापाचा केला प्रच्छेद तूर्ण बापाचा. ।
पडिला तो तंव सहसा, भूवरि हतमूल, पृथु अनोकहसा. ॥ २३
पाहुनि अद्भुत करणी भक्ताची, शिव रिझोनि अंतःकरणीं, ।
प्रकटुनि, त्यासि वदे तो. "वांछित जें, सांग. तेंचि विभव देतों."२४
ऋषिसुत वंदुनि विनवी. " स्वामी, तूझीच भक्ति, नित्य नवी ।
संतत सेवाहि घडो. मानस हें विषयचिंतनीं विघडो. " ॥ २५
ईश म्हणे, " कैलासीं राहीं मजजवळि संतत विलासीं. ।
होसी प्रमथगणांचा नायक तूं, निधि अनेक सुगुणांचा. ॥ २६
तूं चंडकोप, बाला. ताडुनियां पीडिलें तुवां बाला. ।
'चंड' म्हणुनि नाम तुला होइल, मद्भक्तिही, जगीं न तुला."॥२७

ऐशा शुभ वचनांतें ऐकुनि, तो मग वदे त्रिनयनातें. ।
"मद्विरहदुःख जाया, देई जनकासि नंदन दुजा या." ॥ २८
"या तूझ्या जनकातें, जननीतेंही मदीय लोकातें ।
तुजसह दिव्य विमानीं वसवुनि नेतों. यथार्थ हें मानीं. " २९
ऐसें त्या अनघातें बोलुनि, तेव्हांचि सत्वर तिघांतें ।
यानीं वसवुनि वरवे आणी गेहासि ईश वायरवें. ॥ ३०
देऊनि गाणपत्य, स्वभक्त चंडासि मानुनि अपत्य, ।
स्थापी शिव निजऐक्यीं. पूर्ण कृपे त्यासि नित्य अवलोकी. ॥ ३१
ऐशी कथा पुराणीं प्रथिता हे शिवरहस्य सुपुराणी. ।
"पढतां पातक नुरवी," वीरेश्वरकवि म्हणे,"मति स्थिरवी."॥३२

---

## ३०. उपमन्युचरित्र.

( वीरेश्वरकृत. )

श्रीशंकरप्रभु, अपारसुखांबुराशी,
रक्षी श्रितांसि जननीपरि लेंकरासी. ।
दे भुक्ति, मुक्ति, बहुसंपदभीष्टदानें.
ऐसी पुराण कथिते गिरीशापदानें. ॥ १

व्याघ्रपाद सुत तो उपमन्यु. । बोधिला स्वजनकें गतमन्यु. ।
दे म्हणे पुरहरासि पयातें. । तोषवी शिवहि शीघ्र तयातें. ॥ २
कथा तेचि पौराणिकी आयिका, जी, । सहाय प्रभू होतसे सर्वकार्जी. ।
जगीं येक मध्यंदिनाख्य द्विजाती । सदासक्त होता शिवांघ्र्यंबुजातीं. ॥ ३

सुमति सुत तयाचा, पंडित, ब्रम्हचारी,
निपुण पढुनि शास्त्रें आणि ते वेद चारी, ।
नमुनि विनवी बापा. " जाउनी पुण्यदेशा
करिन तप. अपेक्षी चित्त हें त्वन्निदेशा ." ॥ ४

वदे तात तेव्हां, " तपाला न जावें. । सदा भक्तिनें ईश्वरातें भजावें. ।
मनीं जाणुनी सर्वभूताविभक्ता, । करीं ध्यान; तारील, हो, कीं, स्वभक्ता.॥ ५

पुण्यक्षेत्र प्रथितचि असे पुंडरीकाख्य लोकीं,
जेथें शंभु प्रकट विलसे लिंगरूपी; विलोकीं. ।
दावी मोदें नटन आपुलें आदितेया मुनींद्रा.
शार्ङ्गी ईशालयपरिसरीं तो करी योगनिद्रा. ॥ ६

पुर्वी वाकाळि (?) दैत्य जिंकुनि सुरां, स्वर्गांचिया संपती
भोगी. तो पुरुहूत जाणुनि मनी संरक्षिता श्रीपती, ।
क्षीरांभोधितटासि येउनि जगन्नाथा तया अच्युता
भावें वंदुनियां, म्हणे. 'अभय दे आम्हांसि नाकच्युतां.' ॥ ७

'जाई सत्वर पुंडरीकनगरा तेथें तपें तूं करीं.
दैत्यातें वधुनी स्वराज्य तुजला देईन मी लौकरी.' ।
'स्वामी, पीडिल दुष्ट तो. मजसवें येईं कृपे, माधवा.'
मोदें सेंद्र उपेंद्र ईशभवना आला भला तेधवां. ॥ ८

तया क्षेत्रा जाई. सुखकर महादेवचरणां
मनीं ध्यायीं, पूजीं, नियमुनि सदा सर्व करणां. " ।
अशा तातोक्तीतें परिसुनि नमस्कार करुनी,
त्वरें आला माध्यंदिनि दृढ मनीं प्रेम धरुनी. ॥ ९

तीर्थी स्नान करूनि, पूजुनि शिवा विध्युक्त, भावें मनीं
सप्रेम स्तवुनी, म्हणे " भज कृपे रक्षीं; पहा, दीन मी. ।
स्वामी, भक्ति तुझी वरी दृढ असो, देवा, मृडानीवरा.
सेवा नित्य घडो, पदीं मन जडो, निर्विघ्न देई वरा. " ॥ १०

प्रार्थुनी आदरें शंकरातें, । विचारूनियां तेथिंच्या भूसुरातें, ।
येक वांधोनियां राहिला, हो. । मनीं तैं म्हणे "जाइला थोर लाहो." ११

नाना धन्य सुमें स्वयें प्रतिदिनीं आणोनि पूजी शिवा.
आनंदें द्विज नामकीर्तन करी, भक्तांसि जें दे शिवा. ।
तो येके दिवशीं म्हणे " भ्रमर, हे काल्पीं सुमीं भोंवती;
रात्रीं मी जारि गेलिया वनचरें सत्वें वरी धांवती. ॥ १२

भृंगोच्छिष्टें सुमें कैंवि । वाहूं मी ईश्वराप्रती ? ।
प्रसादें त्याचिया कांहीं । करावा यत्न संप्रती. ॥ १३

ऐशी आलोचना चित्तीं । करोनि, शिवसन्निधीं ।
येवोनि, तो वदे मोदें, । " तारीं मातें घृणानिधी. ॥ १४
हे पाणिपाद मज होत मृगादनाचे, "
ऐसें सुखें वदत विप्र समोर नाचे ।
'होतील तेंचि' म्हणतांचि पिनाकपाणी,
जाला ऋषी तव तरक्षुनरात्रिपाणी. १५

तो व्याघ्रपादाभिध विप्र जाला. । तेव्हा वदे त्या वृषभध्वजाला. ।
" नमाम, देवा, तुझिया पुरा हो. । हे कीर्ति लोकीं बहुकाळ राहो." ॥ १६
असें प्रार्थुनी, तो यथापूर्व देवा । मनीं ध्याय, पूजी सुखें वामदेवा. ।
तदा तत्पिता पातला आश्रमातें, । सुता पाववू त्या द्वितीयाश्रमातें. ॥ १७
देखुनी पितृपदाप्रति वदी. । व्याघ्रपाद निजवृत्त निवेदी. ।
तो म्हणे, " स्वकुलनारिजमित्रा, । हो सुखी सकलसज्जनमित्रा. ॥ १८
ब्रह्मचर्ये तथा श्रीशिवाराधनें । मान्य तू या जगीं जाण सत्साधनें. ।
ऐकुनी वाक्य माझें गृहस्थाश्रमा । पाव फेडावया शीघ्र देहश्रमा. ॥ १९

तो निष्काम, तथापि वाक्य गुरुचें मानोनी माध्यदिनी
गेला शीघ्र तयासवें निजगृहा तेव्हा पहा त्या दिनीं. ।
मोदें येउनिया वसिष्ठ ' भगिनी देतों ययाला ' म्हणे,
पीयूषापरि मानिलें वचन तें मध्यदिन ब्राह्मणें. ॥ २०

तदुपरि सुमुहूर्ती पूजुनी त्या वरातें,
विधिनिपुण वसिष्ठें चिंतुनी ईश्वरातें, ।
अवनिसुरसमाजीं कन्यकादान केलें.
सविनय दिधलीं तैं भूषणें आणि चैलें. ॥ २१

ऐसा होता विवाह, द्विजवर अवघे वधुगेहासि जाती,
तेव्हा तो व्याघ्रपाद स्थिर करुनि मना शंभुपादानुजातीं ।
तेथें घस्रें कितेकें क्रमुनि, पुनरपि श्रीनटेशोपकंठीं
आला, घेवोनि संगें त्वरित गुणवती, गेहिनी, कंबुकंठी. ॥ २२

यथापूर्व होवोनिया क्षेत्रवासी, । महाभक्तिनें नित्य पूजी शिवासी. ।
तदा दैवयोगें तया पुत्र जाला । दिसे मानुसा द्रष्टृनेत्राबुजाला. ॥ २३

ठेवोनि नाम उपमन्यु म्हणोनि पुत्रा, । तें वृत्त पाठवि सुखें गुरुबंधुमित्रां, ।
आली वसिष्टगृहिणी तंव तांतडीनें, । पाहे शिशूप्रति तया बहु आवडीनें.॥२४

योगक्षेम विचारुनी ऋषिवरा, तद्देहिनीतें भली
बोले वाक्य अरुंधती, " शिवकृपें सतुष्टता लाभली. ।
जाला पुत्र, परंतु पोषण घडे कैसें दुधावांचुनी ?
नेतें यास्तव मद्गृहा बहु घृतें म्या ठेविलीं सांचुनी. " ॥ २५

मोदें व्याघ्रपदें बरें म्हणितलें. तें घेउनी लेंकरा,
आली ते निजमंदिरा स्वहृदयीं चिंतूनियां शंकरा. ।
तेथें पाजवि कामधेनुपय तें साज्य त्रिकाळीं सती.
पाळी वर्षचतुष्क यापरि. तया देखोनि उल्हासती. ॥ २६

होतां वत्सर चारि तो ऋषि सुता घेवोनि आला गृहा.
मानी सन्मति पात्र होइल भला लोकीं शिवानुग्रहा. ।
माता त्या तनयासि देखुनि म्हणे, " बाळा, मनोरंजना,
जाला फार उशीर आजि तुजला; येई त्वरें भोजना. " ॥ २७

मोदें तेव्हां पाहुनी नंदनातें । पात्रीं वाढी वन्यधान्योदनातें. ।
" माते, क्षीराबीण हें पैं रुचेना. । या शुष्कान्ना भोजिल्याही पचेना."॥ २८
ते सखेदचि वदे पृथुकाला, । " माग दूध तुझिया जनकाला. " ।
तो म्हणे मग सबाष्प तयातें, । " दे कृपा करुनि शीघ्र पयातें. " ॥ २९
" कैंचें, बापा, दूध आम्हां दरिद्रां ? । निष्कामें म्यां पूजिलें, जाण रुद्रा. ।
आहे, नाहीं, हें कळे काय बाळा ? । मागावें जें पाहिजे तेंचि बाला. ॥ ३०
जे ज्या कामें पूजिती श्रीशिवातें, । ते प्राणी त्या पावती वैभवातें. ।
तूंही आतां माग त्याला स्वभावें. । तो इष्टार्था देइल स्वप्रभावें." ॥ ३१
" कोठें असे तो शिव शीघ्र दावीं, । हे कामना ज्यासि मियां वदावी. " ।
" हा लिंगरूपी प्रभु तूं विलोकीं, । दाता, दयाळु, प्रथित त्रिलोकीं." ॥ ३२

तो बाळ, धीर, उपमन्यु तया शिवातें
पाहोनि, वंदुनि, सतोष करी स्तवातें. ।
" शंभो, मृडा, पशुपते, श्रितपारिजाता,
दे दूध; दाखवि तुझ्या पदवारिजाता. ॥ ३३

भिक्षा मागसि तूं, तथापि सकळां देसी महासंपती.
देसी तें अमृत श्रितां, गरळ तूं खासी, मृडानीपती. ।
मोदें नाचसि तूं दिगंबर; तुझे हे भक्त दिव्यांबरें
लेती; अद्भुत हें चरित्रचि तुझें भासे तुला कीं बरें. ॥ ३४

केयूरहारकटकादि विभूषणातें
नेघें तुझां दिधलिया जनभीषणातें. ।
नाहींच चाड मजला भवडंबराची.
देई तुझी अचल भक्ति चिदंबराची. ॥ ३५

दे क्षीरान्न कृपा करोनि मजला या देहसंरक्षणीं.
आतां तूं जरि नेदिसी, त्यजिन मी प्राणासि पैं ये क्षणीं. " ।
ऐसें ऐकुनि वाक्य तो प्रगटला तेथेंचि दिव्याकृती,
आम्नायप्रतिपाद्य, चिन्मय, विभू, जो नेणवे प्राकृतीं. ॥ ३६

आनंदें उपमन्यु देखुनि, नमी भावें भवानीवरा.
अंकीं घेउनि त्यासि ईश्वर म्हणे, " मागें त्वदिष्टा वरा. " ।
" देई दूध सदा. दुजें मज नको, स्वामी, कृपांभोनिधी.
साक्षी तूं मतिचा, कसें अनृत मी बोलूं तुझ्या संनिधीं ? " ॥ ३७

तेव्हां उमारमण सस्मित, चिद्विलासी
दुग्धाब्धि देउनि तया रिझवी मुलासी. ।
बोले " सुखें असुनि भूवरि, नित्य मातें
भावें भजें निजमनीं अमरोत्तमातें." ॥ ३८

तो यापरी कथुनि भूमिसुरात्मजाला,
तेथेंचि सर्वगत ईश अदृश्य जाला.
ऐसाचि होउनि सदा सगुणावतारी
वीरेश्वरप्रभु कृपे स्वजनांसि तारी. ॥ ३९

## २१. ध्रुवचरित्र.

( नरहरितनयकृत. )

गोविंदचरणीं रमतां, ये शाश्वत निजसुख हाता. ॥ मग कैंची संसृति-चिंता ? ॥ ध्रुवपद. ॥

परीक्षितीप्रति तो शुकयोगी ॥ बोले प्रेमें, विषयविरागी. ॥ भूपति सुकथा हे तुजजोगी. ॥ परिसें मन ठेउनि श्रीरंगीं. ॥ पूर्वी होता चक्रवर्ति उत्तानपाद नृप. त्याच्या दोघी कुटुंबिनी, पतिदेवता, सती, निजतनुकांतिविजितरतिरूपा. सुनीति नाम्नी ज्येष्ठा, तैसी सुरुचि कनिष्ठा, युवतिवरिष्ठा, पतिशुश्रूषणरता. तयांप्रति पुत्र जाहले बहुत चांगले. तयां निरखुनी अवनीजानी मनिं संतोषुनि मानी निज-भाग्योदय जाला. परंतु ससुता वडिल गेहिनी नावडे तया. कोण्ही येका दिनिं भद्रासनिं द्वितीय गृहिणीसहित बैसुनी कनिष्ठात्मजा उत्तमाप्रतीं खेळवीत असतां, तंव तेथें सुनीतिसुत तो अकस्मात पातला. विलासें, प्रीतिपडिभरें तया निजांकीं वसवी राजा. तेव्हां अति रोषवती सुरुची त्यातें बोले. "ऐकें, ध्रुवा विमूढा, वरें. वनीं राहुनी व्रतें, तपें आचरुनी नियमें, हरिचा प्रसाद संपादिसि जरि, पावसि शेवीं शाश्वत राज्यपदासि, अर्भका. ये रिति मातृ-वचन ऐकुनियां वदे शिशू तो "वना जातसें आतां." ॥ १ ॥

सापत्नांवाचन स्वहिता ॥ मानुनियां, त्यजि सकळहि ममता. ॥ विषयविरागें दंडुनि चित्ता, ॥ भावें आठवि तैं भगवंता. ॥ निज जननीतें वंदुनि, तीची आज्ञा घेउनि, वना निघाला. मार्गी सारासार विचारा करि हृदयीं तो. "जीव कोण? शिव कोण? सर्व जग कैंचि जाहलें? कर्ता यासि कवण? नेणें मी. कर्म, धर्म, निजवर्मेहि न कळे. आतां आर्तत्राणपरायण, शरणागतवत्सल, करुणावरुणालय, श्रीमन्नारायण-चरणाविण आन नसे गति मजला." ऐसा निश्चय करुनि, विवेकें नृपबालक काननीं चालिला. बहुत भागला; भुके पीडिला; दिवाकरकरें पोळला भला; तथापि अवलंबुनि धैर्यातें वेगें जातां, तेथ शचीपति धरुनि मनीं लोकाची भूति नृपतोकाची स्थिति वळखाया, घेउनि जननीचा वेष, पाठिसीं त्वरें पातला. म्हणे. "बांसरा,

कां, रे, मातें येकलितें मोकलुनी जासी? न कळतांचि म्यां निरोप दिधला तुजला. बाळा, आतां वियोगलव न साहवे. तुजसाठीं बहु-साल नयसही केले. बापा, सवतीनें निजवैर साधिलें, तुला बोधिलें, दुर्वाक्यशरें मजहि विंधिलें; यास्तव आलें वना लगबगां. राहीं, राहीं. परतुनि पाहीं. तान्हूल्या, बहु पान्हा दाटुनि तटतटती कुच." यापरि मोहक वचन वदे पुरुहूत. तरी ध्रुव निश्चलमानस, केवळ लक्ष्मीवल्लभांघ्रिकमलध्यानीं तो तत्पर होउनि, न लेखीच तद्वचनातें. तंव लाजुनि बलरिपु गेला सुरलोकासि. म्हणे मग, "भगवद्भक्ता नसे मोह, भय, ममता." ॥ २ ॥

ऐसा एकट तो ध्रुव विपिनीं ॥ विचरे. कामक्रोधां वधुनी, ॥ शमादि साधनंही साधूनी, ॥ मुमुक्षु जाला सादर भजनीं. ॥ अकस्मात तंव विपश्चिदुत्तम, अच्युतचिंतननिश्चलचित्त, विपंचीवादनचटुल, सुरार्चित विरिंचिनंदन तूर्ण पातला. म्हणे,"बाळका, काय अपेक्षा धरुनि मनीं, या वनीं हिंडसी?" ऐसें वचन मुनीचें ऐकुनि, नृपतितनय तो वंदुनि चरणा, सविनय विनवी. "स्वामी, माझा परिस मनोरथ. गमनागमनरहित सुखधाम असे जें, त्याप्रति मातें पावविं. संसृतितारक पोत तूंचि. मी पोत नेणता. तात, माय तुजवीण नसे मज." ये रिति मात तयाची परिसुनि, वदे ऋषी तो, "श्रीपतिभजन करीं भावें, मग तरसिल, बापा." "स्वामी, मजला मंत्र, तंत्र तें किमपि कळेना. पूज्य हरी तो, पूजक मी कैसा जालों? हे गति उमजेना." तंव ऋषिराज रिझुनि निज चित्तीं, द्वादशाक्षरी मंत्र तया उपदेशी. स्नेहें महावाक्य वाक्यार्थहि बोधी. मग तो शिष्य ध्रुव बहु विनयें पुसे. "सद्गुरो, ब्रह्मीं माया जन्मली कशी? जीवशिवांचें ऐक्य केंवि? हें सांगें. करुणा करीं" म्हणुनियां नमुनि मुनिवरा, हात जोडुनी उभा राहिला, स्मरुनि मनीं भगवंता. ॥ ३ ॥

नारद सांगे नृपतनयातें. ॥ "परिसें, बाळा, निर्मल चित्तें. ॥ छेदुनि समस्त संदेहातें ॥ पावसि शाश्वत आत्मपदातें. ॥ पूर्ण ब्रह्म, सनातन, निर्गुण, नित्य, निरंजन, तेथें जाली अहंस्फूर्ति ते माया जाणें. सूर्यी जैसी प्रभा विराजे, रत्नीं जेंवि असे कीं; कील स्व-

रूपीं तसी अभेदेंचि चिच्छक्ति शोभते. तीच्या योगें ईश्वर म्हणती. सांख्यविद तया प्रकृतिपुरुष म्हणुनी व्यवहारिति. जगदुपादान तोचि समज तू. सर्वनियंता, समस्तकर्ता, सर्वज्ञाता, सर्वसाक्षि, सर्वांतर्यामी, ऐसा ईश्वर अविद्यावशें जीवहि म्हणवी. निजस्वरूपा विसरुनि, मग तो 'मी देही, मी स्थूल, कृश, सुखी, दुःखी, माझीं गृहसुतदाराक्षेत्रपशुधनें' म्हणोनि वरे सद्गुरुवचनेंकरुनि महावाक्यार्थ विचारुनि सोपें द्विज हे जहदजहल्लक्षणा करुनिया तदेतद्देशकाळ त्यागुनि, पुरुषमात्र तो घेइजे जसा, तेंविचि उभयत्रहि वाच्यांशा त्यजुनि, बरा लक्ष्यांशचि घेता, निरुपाधिक निर्जपदासि पावे" ये रिति गुरुनें बोधिता, तदा 'ब्रह्मैवाह' ऐसा अनुभव बाणला तया. तदुपरि तो ध्रुव देशिकचरणा वंदुनि बोले. "स्वामी, मातें मज भेटविलें. मद्भिना दुजें न दिसे, नसेचि." एव परमानदीं निमग्न होउनि निश्चळ स्वेदकपरोमांचबाष्पगद्गदस्वरादिक अष्टभावयुत, पुनरपि तो ते दशा जिरवुनी, वदे मुखें "श्रीकृष्ण, विष्णु, सुखदाता" ॥ ४ ॥

जाला ध्रुव तो पूर्णज्ञानी.॥ तत्पर अखंड भगवद्भजनीं.॥ आज्ञा सद्गुरुंची घेवोनी ॥ आला यमुनातटासि मौनी ॥ तेथें पावन वनीं राहुनी, धरुनि नियम, दृढ करी तपातें. कितेक दिन मग सुकलीं पानें भक्षुनि राहे. निर्मळ नीर प्रसृतिपूरक प्राशन करुनी क्रमिले कतिपय वासर. तदुपरि पवनाहारी होउनि, आत्मध्यानपरायण असता, तेव्हा दिविपदभिनुत, त्रिलोकपोषक, सुजनतोषक, श्रीपुरुषोत्तम, शंखसुदर्शनकौमोदकीसुपंकजविलसतपचशाख, सुखदायक विश्वंभर प्रगटला. निरखुनि देवा, भावें वदन करुनी, बालक स्तवावया असमर्थ यास्तव स्वहस्त जोडुनि उगा सन्मुख स्तब्ध राहिला. वासुदेव तव कंबुकोटिनें तालुवरी कुरवाळी स्नेहें. तत्क्षणींच औत्तानपादि नुति करी यथामति. म्हणे, "मुकुंदा, चित्सुखकंदा, मुचकुंदोद्धारक, वृंदारकवंदितांघ्रि, वदारुलोकमदार, पाहि मा." ये रिति स्तवें तोषुनि माधव आलिंगुनि बोले मग. "बाळा, सांग मनोरथ. देइन वर तुजला, मम वत्सा." 'स्वामी, तवपदभजनाविण मज नसे

अपेक्षा." पुनरपि देव वंदे. " तू भूवरि षट्त्रिंशत् दशशत संवत्सर करूनि राज्या शेवटीं शाश्वतपदा पावसी." ऐसा वर देऊनि श्रीहरी गुप्त जाहला. नृपसुतही निजसदना येउनि जननीजनकां वृत्त निवेदु-नि, सुखें राहिला. ऐशी भगवद्भक्तकथा जे कथिती, ऐकति त्यांते संतति, संपति देउनि, तारी सतत नरहरितनयत्राता ॥ गोविंद-चरणीं रमता, ये शाश्वत निजपद हाता. ॥ मग कैंची संसृतिचिंता? ॥ ५ ॥

---

## ३२. मार्कंडेयचरित्र.

( नरहरितनयकृत. )

गौरीश, करुणासिंधू, निजभक्ताचा कैवारी, ॥ दुस्तरभवभीति निवारी. ॥ ॥ ध्रुपद ॥

पूर्वी मृकंडु नामक मुनी ॥ होता, सादर शंकरभजनीं, ॥ पंडित, समर्थ इंद्रियदमनीं, ॥ सात्विक, शुद्ध, ब्रह्मज्ञानी, ॥ यजनादिकषट्कर्म-निरतही, नित्यानित्यपदार्थविवेकी त्याची भार्या शीलवती, अनुकू-ल, सुशीला, अतिविमलांगी, कुशला, निर्मल, कुळजा, बाला, वंदुनिया निजपतिपदकमला, जोडुनि करनल, मृदुलवचन. बोले. " जी, स्वामी, संतानेविण संताप मनीं, चिंता सतत वाढतसे कीं; यास्तव श्रीभगवताप्रति तुम्हि मागा संतति." यापरि विनती. करुनि, शुभमती सती उभी ते सन्मुख असता, प्रत्युत्तर दे तीस ऋषीश्वर. " कांते, मात यथार्थचि हे, परि दाता ईश्वर. येथें आमुची शक्ति न चाले. प्रजेकडुनि तो मनुष्यपूर्ण, प्रसिद्ध ऐसी श्रुति प्रपंचीं, प्रबोधविरहित निष्प्रगौरव, प्रसूनहीन क्रीडाका-नन, प्रतापरहित प्रजेश जैसा, पानीयाविण जशी प्रपा कीं; प्राणाविण हें जेंवि कलेवर, व्यर्थ तसें कुल अपुत्रमगळ. पाहुनि चंचल जालों व्याकुळ. आता रक्षिल तो त्रिपुरारी, मनोविहारी, पन्नगहारी, शंभु, शर्व, अविकारी. ॥ गौरीश० ॥ १ ॥

मृकंडु बोले निजगृहिणीतें. ॥ ' जातों, कांते, आजि तपातें ॥ राहे सदनीं प्रमुदित चित्तें. ॥ ईश्वर पुरविल मनोरथातें " ॥ यापरि बोलुनि

भाव विचारुनि येइन लवकरि." "बरें, तसें हो." म्हणतां देवें, मनोजवें ऋषिराज निघाला, गृहासि आला, कथी प्रियेला वनीं वर्तली कथा आपुली सारी. ॥ गौरीश० ॥ ३ ॥

परिसें विनती प्राणनाथा. ॥ "कुपुत्रसंगति जाणिजे वृथा. ॥ धरिल अन्हांटा, त्यजिल सुपंथा; ॥ अकीर्ति येइल ऑमुच्या माथां. ॥ सज्जनसुमनोरंजन नंदन तो हरिचंदन अल्पायु जरी, श्रीशिवभजनें चिरंजीव होइल; हा निश्चय. वंदिन तुमच्या पदारविंदा. जा. सुखकंदा, वंदारुजनानंददायका मागा सुंदर, सद्गुणमंदिर पुत्र शाहणा." आकर्णुनि तद्वचन तूर्ण तंव पूर्णज्ञानी शर्वाणीरमणामलचरणस्मरण करित ऋषि वना पातला. त्रिनेत्राप्रती नमुनि म्हणे, "दे, देवा, सुंदर तनय मज भला." गीर्वाणप्रभु, "तथास्तु" म्हणुनी अदृश्य झाला. पुनरपि विप्र, प्रजाकाम, तो प्रसन्नहृदय, क्षिप्र गृहा येऊनि प्रियेला वृत्त निवेदी. तदुपरि दोघें एकांतीं ऋतुकाळीं तोषें रमतां, शीलवंती गर्भातें धरिती झाली. तातें भर्ता पुसे विनोदें, "कांते, सांगें तुझे डोहळे; करिन सोहळे" हांसुनि लज्जावती सती ते म्हणे "करा शिवकीर्तन संतत. शिवकथामृत प्राशन करवा." तोषुनि तंव तो गृहिणीतें आलिंगी प्रेमें. ये रीती नव मास पूर्ण भरतां, सुमुहूर्ती पुत्र जाहला बहुत चांगला; शिवें दीधला म्हणुनी. करि ऋषि जातकर्म; मग मार्कंडेय असें द्विजसमंत नामहि ठेवी. बाळ वाढतां, अस्फुटाक्षर तद्वचनें तें अमृतसमें आवडिनें सेवी. पंचम वर्षी उपनयन करी. तदनंतर मार्कंडेय मुनी वास करूनी बहु नियमानें सांगवेदपारग तो झाला. षट् शास्त्रें आणि सर्व पुराणें पढुनि निपुण सद्गुणीं शोभला. द्विजीं वानिला. जनीं पूजिला. गर्वरहित दृढभावें निशिदिनिं भजे मनीं त्रिपुरारी. ॥ गौरीश० ॥ ४ ॥

देखुनि पितर मुखें तनयाला, ॥ मानिति भूषण निजान्वयाला; ॥ परंतु पंचदशाब्द वयाला ॥ जाले, उरला येक ययाला; ॥ म्हणुनि दचकती, धैर्य साडिती, रुदन मांडिती, त्यापुढें बळें दुःख कोंडिती, धरिल भीति यास्तव हें वृत्त तयासि न सांगति. श्रमत [illegible] कितेक इंगित

जाणुनि मार्कंडेय पुसे, पितरांप्रति वंदुनि, मजपासुनि सेवेंत उणें पडलें असलीया, क्षमा करावी. बाळ नेणतें लडिवाळपणें करी जरी अपराधकोटितें मनिं न धरावें." "ऐसें सविनय वचन परिसुनी, मृकंडु मुनि बोले, "रे पुत्रा, परमपवित्रा, विमलचरित्रा, कोमळगात्रा, वारिजनेत्रा, तुजपासुनि अपराध कदापि नसे मम वत्सा. त्यजि विचिकित्सा. स्वच्छहृदय तूं मच्छासनींच वर्तसि, बाळा. ऐकें शोकाचें कारण हें. अपुत्रें मियां दुश्चर तप तें करितां विपिनीं, उमाकलत्र, श्रीदमित्र, तो त्रिनेत्र, शंभू प्रसन्न होउनि, "अगा मृकंडो, पडित, षोडशवार्षिक; मूर्ख, शतायू; या दोघांत रुचे जो तो देइन." म्हणतां, तैं सुंदर, बुधचूडामणि सुत मागितला. तोचि तूं मनीं जाण निश्चयें. मार्कंडेय म्हणे, "बहु बरवें झालें. जन्मविलें ज्या देवें, तो मज काय उपेक्षिल, बापा? स्वस्थ असें नपवसि परितापा." ये रिति जननीतें, जनकातें समजाउनि मुनिनंदन वेगें, विषयविरागें, शुभांतरगें, स्मरत शिवपदें निघे वना सुविचारी. ॥ गौरीश० ॥ ९ ॥

ऐसा मृकंडुनंदन भला ॥ सदसद्वस्तुविवेकी, भोळा, ॥ इहामुत्रफलभोगसुखाला ॥ तृणसम लेखुनि, मुमुक्षु जाला. ॥ शम, दम, उपरति, तितिक्षा, दृढश्रद्धा, सम्यक् समाधान इत्यादि साधनें संपन्न मुनी, ब्रह्मज्ञाना अधिकारी होऊनि, विचक्षण सद्गुरुचरणा शरण जाउनी, करुणा संपादुनि, तद्वाक्यश्रवणेंमननिदिध्यासें, तो स्वरूपसाक्षात्कारा पावुनि, स्वानुभवें ऋषिराज वदे तैं. ब्रह्मैवाहं. देहप्राणादिक जड दृश्य, विकारी, मायाकार्य, अशाश्वत. हें मी नव्हें कदापि. सदाशिव, साक्षी, चिन्मय, अज, अव्यय, मी." ऐसी प्रतीति बाणली तया; तथापि मीतूंपणावीण शिवभक्तिही करी. ऐसा शीलवतीनंदन तो सकळ तीर्थयात्राही करुनी; कवेरतनयादक्षिणतीरीं, श्वेतारण्यीं असतां तेथें, आयुष्याचा चरम दिवस समजुनी, विवेकें निर्मल तटिनीजळीं नाहुनी, तिळ, तंदुळ, जळ, कोमळ विल्वदळें, कल्हारसुबकुलपाटलीकुसुमादिक पूजासामग्री संपादुनियां, यथाविधि श्रीशिवार्चन करूं बसतां प्रेमें, चंडभानुसुत, दंडधर, तदा प्रचंड दूतां म्हणे.

" शीघ्र जा. मृकंडुतनया चोढुनि आणा " आज्ञा मानुनि थ
चाट भट ते मार्कंडेयानिकट पातले. पाहुनिया शिवमूर्ति परतले.
शमनासमीप येउनि म्हणती, " स्वामी, आमुचा यत्न न चाले."
त्यातें धि कारुनि, बहुरोषें लुलायावरी बळेंघुनि, लवकरि कालमेघ
नीलच्छवि काळचि आला कोलाहल वारित रवें. भालविलोचनभक्त
बालका लक्षुनि जाळें गळा घालुनी, बळें वोढितां, ऋषिश्रेष्ठ शि-
वपादपद्मीं मिठी देउनी म्हणे, "धूर्जटी, इष्टदायका, या संकटीं
धाव धाव, मज तारीं. " ॥ गौरीश० ॥ ६ ॥

आकर्णुनि मुनि दीनावाणी, ॥ कळवळुनि मनीं, पिनाकपाणी, ॥ बद्धा-
दर जो नतसंरक्षणीं. ॥ प्रगटे शिवलिंगीं तेचि क्षणीं. ॥ गंगाधर, शर्त-
पतगसुप्रभ, भुजगभूषण, कुरंगधर, घृतमतंगाजिन, त्रिलोकनायक
सर्वमंगलालिंगिताग, सुरपुंगव तो अतिरागें वामपदें शमनातें, ताडुनि
वक्षस्थळीं, भूतळीं पाडी वेगें. तव यमाकिंकर चळचळ कांपत
तळपति दाहि दिशाप्रति धाके. प्रसन्नवदन, मृडानीवल्लभ, दयानिधी
मुनिवरा भेटुनी, "दीर्घायुर्भव, दीर्घायुर्भव." म्हणे तेधवा. त्वरसा
नुसा धीर मुनी तो नमुनि शिवपदें, सन्मुख मोदें उभा राहि
ला. ऐसा शंकरविलास निरखुनि, परमेष्ठीप्रमुखामर सर्वहि जय-
जयकार करित, अति विनयें प्रणतार्तिहरा प्रणाम करुनी म्हणती,
" स्वामी, तुवा दीधला वर. " षोडश वत्सर आयु यया. " चरम
दिवस हा समजुनि शमनें; महादेव, तव सेवा केली. तू जगदीश,
नियंता. ऐसें तुवा केलिया सांगों कवणा ? " हासुनि गौरीरमण
वदे, " मद्भजन करिति जे, तया सज्जना जननमरणभय लेशां
नाहीं, जाणा निश्चय." ये रिति सर्व सुरा समजावुनि, स्वस्थळाति
पाठवुनि, स्नेहें मृकंडुतनया अभीष्ट देउनि. अदृश्य झाला, क
रोनि लीला, महेश, भोळा, नरहरिसुतसुखकारी. । गौरीश, करुण
सिंधू, निजभक्ताचा कैवारी, ॥ दुस्तरभवभीति निवारी. ॥ ७ ॥

---